# लंकेचें वर्णन.

हें पुस्तक

कृष्णाजी भिकाजी गोखले

यांनीं केलें

तें

मुंबईंत

"निर्णयसागर" छापखान्यांत छापिलें.

---

इ. स. १८८५.

---



---

किंमत एक रुपया.

श्री. रा.

जयसिंगराव आबासाहेब

घाटगे सरजेराव वजारतमाब

कागल संस्थानचे

अधिपति

व

कोल्हापूरचे रीजंट

यांस

हें पुस्तक

ग्रंथकर्त्यानें

परमप्रीतीनें व आदरानें कृतज्ञतापूर्वक नजर

केलें आहे.

# PREFACE.

It is not my object to dilate upon the benefits which are derived by travel. Travel is considered one of the means which give a finish to education. Not to speak of travelling in foreign countries and see the lions thereof, it is a matter of regret that my countrymen have no curiosity to visit the island of Ceylon which is full of curiosities and next door to us.

When I was a boy I was amused to hear the myths regarding Ceylon and other stories from Rámáyaṇa. In after life I felt inclined to pay a visit to the island but how was it to be done without sufficient means? I, therefore, had recourse to secure an English work on Ceylon and partially gratifying my desire, delivered a lecture at one of the meetings held in connection with the Kolhapur Native Library, at which time I told the audience that my information was gathered from books; but that gained from an actual visit to the island would be more valuable. A few years after this, I had the advantage of visiting the island in company of Shreemant Jayasingrao Abasaheb Ghatge, chief of Kagul

(now Regent of Kolhapur). After returning from my journey to the island, I delivered a lecture a second time on the same subject before the meeting. Then some of my friends suggested that there was a great want of works on Ceylon and if these lectures were compiled and published, they would supply a great want and form a valuable addition to Marâthi literature which contained no book upon the history of Ceylon; accordingly I undertook the publication of this work. It should not be supposed that I have personally seen all that I have described in the volume; I have given all that I have seen and added a great deal from books written on Ceylon in the English language. I now beseech my countrymen to read this book and if the desire for acquiring more information about the island should be increased by the perusal, I shall consider myself amply repaid. My beloved brother Mr. Ramchandra Bhikaji Gokhale gave me valuable assistance in writing this book for which I take this opportunity to make special acknowledgements and to express my gratitude.

*Mahabaleshver,*
*10th April 1885.*

K. B. GOKHALE.

# अनुक्रमणिका.

## प्रकरण पहिलें.

### भाग १ ला.

## भाग आठवा.



## भाग नववा.



## भाग दहावा.



## भाग अकरावा.



## भाग बारावा.

भाग तेरावा.



भाग चवदावा.



भाग पंधरावा.



भाग सोळावा.



भाग सतरावा.



भाग अठरावा.

भाग एकोणीसावा.



भाग विसावा.



भाग एकविसावा.



भाग बाविसावा.



भाग तेवीसावा.

भाग चोवीसावा.



भाग पंचवीसावा.



भाग सव्विसावा.



भाग सत्ताविसावा.



भाग अठ्ठाविसावा.

## प्रकरण दुसरें.

### भाग पहिला.

## भाग दुसरा.



## भाग तिसरा.

## भाग चौथा.

### इंग्रजांची कारकीर्द.

पृष्ठ.

## प्रकरण तिसरें.

भाग आठवा.



भाग नववा.

# प्रकरण पहिलें—भाग पहिला.

## सामान्य माहिती.

### लंकाद्वीपाचें महत्त्व.

कोणत्याही देशास किंवा स्थलास महत्त्व येण्यास त्याची सृष्टिजन्य रचना हें मुख्य कारण आहे; ह्मणजे त्यांतील पर्वत अथवा डोंगर, नद्या, सरोवरें, खनिज पदार्थ, वनस्पति, पशुपक्षी, हवापाणी, आणि देखावे इत्यादि गोष्टी होत. ह्या सर्व गोष्टींच्या संबंधानें पाहिलें असतां सृष्टिकर्त्यानें ह्या द्वीपाविषयीं विशेष पक्षपात केला आहे असें ह्मटलें पाहिजे. कारण ह्या द्वीपाशीं बरोबरी करणारे देश फार थोडे सांगतां येतील; असें पुढील अपूर्व माहितीवरून वाचकांच्या सहज लक्षांत येणार आहे. ह्या सर्व गोष्टींचें वर्णन समयानुसार पुढील भागांत येतच आहे. परंतु ह्या द्वीपांत किती अपूर्व व मनोरंजक पदार्थ आहेत, हें दाखविण्याकरितां प्रस्तुत आह्मी तेथील खनिजपदार्थांपैकीं एका माणकाचें वर्णन करितों. ग्रीक लोक ह्या बेटास माणकाचें द्वीप ह्मणत तें अगदीं यथार्थ होतें.

अशी कथा सांगतात कीं, तेथील राजाजवळ तळहाताएवढें एक माणीक असे त्यांत कांहीं एक व्यंग नसून त्याचें तेज तर अवर्णनीय असे. कदाचित् हें सर्व खरें नसेल, तत्रापि ही गोष्ट निर्विवाद आहे कीं, ह्या द्वीपांत स्याफ्रगामनांवाचा एक प्रांत आहे; त्यांत माणीक व दुसरीं

रत्नें इतकीं विपुल सांपडतात कीं, त्यांवरून त्या प्रांतांतील मुख्य शहरास रत्नपुर हें नांव पडलें आहे. ह्याचा मुख्य अर्थ माणकाचें शहर होय. हीं रत्नें एवढ्याच प्रांतांत सांपडतात असें नाहीं; तर ह्या द्वीपाच्या अनेक भागांत सांपडतात; पण मुख्यत्वें वरील प्रांतांतील मोठ्या टेंकड्यांच्या पायथ्यांशीं गाळानें झालेलीं मैदानें आहेत त्यांत मिळतात. हीं रत्नें उत्पन्न होणारीं प्रसिद्ध स्थलें रत्नपुरच्या आग्नेयेस बलांगोडीच्या भोंवतालच्या सपाट प्रदेशांत आहेत. तेथें रत्नें सांपडणारीं स्थलें ( खाणी ) आजमितीस दोन अडीचशें आहेत.

आतां प्राचीनकाळच्या इतिहासाच्या संबंधानें पाहिलें असतां ह्या द्वीपाची योग्यता विशेषच दिसते. एका इंग्रजी ग्रंथकर्त्यानें असें ह्मटलें आहे कीं, ह्या द्वीपानें भिन्न भिन्न देशांतील प्राचीन किंवा अर्वाचीन ग्रंथकारांचें जसें लक्ष वेधिलें आहे, त्याप्रमाणें पृथ्वीवरील कोणत्याही द्वीपानें वेधिलेलें नाहीं आणि ह्या ह्मणण्यास आमचें ग्रेटब्रिटन सुद्धां अपवाद नाहीं.

तसेंच प्राचीनकालीं सुधारणुकीकरितां किंवा व्यापाराकरितां प्रसिद्ध असलेल्या देशांतील लोकांस ह्याची माहिती होती एवढेंच नव्हे, तर त्या लोकांचा लंकेंतील लोकांबरोबर व्यापार चालू होता. हें पुढील वर्णनावरून वाचकांच्या लक्षांत येणार आहे.

ह्या द्वीपाविषयीं मुसलमान लोकांचें मत असें आहे कीं, आदम आणि ईव ह्यांस स्वर्गांतून हांकून दिल्यानंतर स्वर्गभ्रष्ट झाल्याचें दुःख वाटूं नये ह्मणून त्यांस राहण्याकरितां प्रतिस्वर्ग उत्पन्न केला तो हें द्वीप. ह्या-

प्रमाणें सृष्टिजन्य रचनेच्या योगानें मात्र ह्या द्वीपास अद्वितीयपणा आला आहे असें नाहीं तर कृत्रिम गोष्टींनीं ही ह्या कामीं मोठी मदत केली आहे. त्यांचें वर्णन पुढें येणार आहे. सांप्रतकालीं देखील हें द्वीप किती महत्त्वाचें मानितात ह्याजविषयीं आह्मी एक गोष्ट सांगतों. देशपर्यटन करून पृथ्वीवरील चमत्कार पाहण्याची आणि ज्ञानवृद्धि करून घेण्याची ज्या लोकांस इच्छा आहे, ते हजारों कोसांवरून बुद्धचा ह्या द्वीपांतील चमत्कार पाहण्यास येतात. आपल्या महाराणीसाहेबांचे उभयतां पुत्र आपल्या देशास आले होते तेव्हां हें द्वीप पहाण्यास मुद्दाम ते गेले होते. नंतर त्यांचे प्रिय नातू ( प्रिन्सअलबर्त आणि प्रिन्स जार्ज ) हे देशपर्यटन करीत असतां आपल्या देशांत आले नाहींत; पण ह्या द्वीपांत जाऊन तेथील बरेच चमत्कार पाहून स्वदेशास परत गेले.

ज्या कालीं आपल्या व दुसऱ्या देशांत पर्यटन करून त्यांतील चमत्कार पाहून ज्ञानवृद्धि करण्याची आह्मां हिंदूंतील विद्वान व पुढारी लोकांस इच्छा उत्पन्न होईल तेव्हांपासून आपल्या देशाचा ऊर्जित काळ येण्यास आरंभ झाला असें समजलें पाहिजे. सांप्रत आपल्या देशांतील स्थितीचा विचार केला असतां ती कांहीं वेगळीच दिसते. जे आपणांस विद्वान ह्मणवितात, त्यांजविषयीं पाहिलें असतां असें दिसतें कीं, त्यांस इंग्लंद बेटांतील बहुतेक गोष्टींची जी माहिती असते, तिचा एक दशांशही आपल्या देशाची नसते. परक्याच्या घराचे कोनेकोपरे ठाऊक असावे आणि आपल्या घराचें तोंड कोणत्या दिशेकडे आहे, हें ठाऊक नसावें ही गोष्ट मोठा

खेद मानण्यासारखी आहे. पहा, साक्षात् भगवंताचा अवतार जो रामचंद्र, त्याची प्रिया जी सीता ह्मणजे केवळ जगन्माता हिला चोरून नेणारा जो निशाचराधीश महाबली रावण, त्याच्या राज्याविषयीं थोडी बहुत माहिती नसणें ही मोठी उणीव आहे. ती कांहीं अंशीं दूर करावी ह्मणून आमचा हा प्रस्तुत यत्न आहे.

दळणवळण.

हें बेट प्राचीनकाळापासून भिन्नभिन्न राष्ट्रांत वेगवेगळ्या नांवानें प्रसिद्ध होतें. ही गोष्ट, ह्या द्वीपाची अलौकिक कीर्ति असल्याची आणि ह्याच्याशीं पूर्वकालापासून प्रसिद्ध देशांचें दळणवळण असल्याची सूचक आहे. ग्रीक व रोमन लोक ह्यांच्या प्राचीन लेखांवरून असें दिसतें कीं, सिकंदर बादशाहानें आमच्या देशावर स्वारी केली तेव्हांपासून युरोपांतील लोकांस ह्या द्वीपाची माहिती होण्यास आरंभ झाला. ॲरिस्टाटल ह्मणून जो प्रख्यात ग्रीक तत्त्ववेत्ता होऊन गेला त्याच्या लेखांत ह्या द्वीपाच्या नांवाचा उल्लेख झालेला आढळतो. टालमी नांवाचा जो प्रसिद्ध ग्रीक विद्वान झाला त्याच्या ग्रंथांत तर लंकेविषयीं बरीच माहिती दिली आहे. तसेंच प्लीनी नांवाचा रोमन इतिहासकर्त्ता असें लिहितो कीं, रोमचा क्लादियस बादशाहा ह्याजकडे सिलोनांतील राजाकडून एक वकील गेला होता. इसवीशकाच्या आरंभीं युरोपखंडाच्या दक्षिणेकडील देश आणि आपला देश ह्यांत व्यापारनिमित्तानें तांबड्या समुद्रांतून दळणवळण चालू होतें, ही गोष्ट इतिहासज्ञ लोकांस अवगत आहेच.

पुढें इ. स. च्या साहव्या शतकांत सोपेतर नांवा-

चा ग्रीक व्यापारी ह्या द्वीपास आला होता. त्यानें दिलेल्या माहितीवरून कासमास नांवाच्या इजिप्त देशाच्या व्यापाऱ्यानें ह्या बेटाविषयीं ग्रंथ लिहिला. तेव्हां लोकांस लंकेविषयीं विशेष माहिती झाली. सोपेतर लंकेंत गेला तेव्हां तेथें कुमारदास राज्य करीत होता. ह्या राजाविषयीं अधिक माहिती प्राचीन इतिहास प्रकरणांत पुढें येईल. ह्या वेळीं इराण देशाचें लंकाद्वीपाशीं दळणवळण होतें. ग्रीक व्यापाऱ्यानें रोमन बादशाहाचें मुद्रक तयार केलेलें सोन्याचें मोठें नाणें राजास दाखवून त्याची अशी खात्री केली कीं इराणच्या शहापेक्षां पादशाहाची शक्ति फार मोठी आहे. कारण त्याचें नाणें रुप्याचें होतें, व तें फार लहान असून सुरेख नव्हतें. कुमारदास आणि सोपेतर ह्यांच्या भाषणांत राजानें त्या व्यापाऱ्यास रूमी नांवानें संबोधिलें. त्याचा अर्थ असा समजण्याचा कीं, हिंदुस्थानांतील लोक प्राचीनकालापासून कान्स्तांतिनोपल येथें राज्य करणारांस रूमी लोक ह्मणत; मग ते रोमन असोत अथवा यवन असोत. व्यापारी लोक लंकेंतून रत्नें, हत्ती व त्यांचे दांत, मोतीं, दालचिनी इत्यादि पदार्थ आपल्या देशांत घेऊन जात आणि त्यांच्या बदली इराणांतील घोडे, व दुसऱ्या देशांतून कापड किंवा रोख पैसा पाठवीत असत.

ह्याप्रमाणें फार प्राचीनकालापासून युरोपखंडांतील देशांचें ह्या द्वीपाशीं दळणवळण चालत आलेलें आहे, तेव्हां एशियाखंडांतील चीन, अरबस्थान, इराण आणि आपलें हिंदुस्थान ह्यांचें दळणवळण त्यांच्या फार अगोदरपासून चालू आहे असें ह्मणण्यास

हरकत नाहीं; व त्याविषयीं पुरावेही पुष्कळ आहेत. नौकागमन विद्या माहित होण्यापूर्वीं **लंकेंतील** लोक आपल्या देशांत येऊन हिमालयाकडून **तिबेटांतून चिनांत** जात होते, व **चीनचे** आणि **तिबेटचे** लोक बौद्धधर्माचीं पुस्तकें व बुद्धाच्या मूर्ति मिळविण्याकरितां व त्या धर्माचीं मतें समजून घेण्याकरितां **लंकाद्वीपांत** जात असत. दक्षिण हिंदुस्थानांतील शेंकडों लोक हमेषा व्यापाराच्या निमित्तानें **लंकेंत** जाऊन परत येत असत.

---

## भाग दुसरा.

### लंकानांवाचा विचार.

ह्या बेटाविषयीं आह्मा लोकांच्या वेगवेगळ्या कल्पना आहेत. कांहीं लोक असें समजतात कीं, ह्या बेटावर जातां येत नाहीं. कांहीं असें ह्मणतात कीं, हें द्वीप बुडवून टाकिलें आहे. कांहींचें मत असें आहे कीं, इंग्रज लोक ज्यास **सिलोन** ह्मणतात ती खरी **लंका** नव्हे, व तिचा शोध अद्यापि बरोबर लागलेला नाहीं. ह्या सर्व कल्पना अडाणी ह्मणजे गैरमाहितगार लोकांच्या किंवा जे लोक केवळ पुराणें वाचून त्यांतील ज्ञानानें पृथ्वीवरील सर्व माहितीचें आकलन करूं पाहतात त्यांच्या होत; कारण सर्व पुराणांचे कर्त्ते यांजविषयीं धर्मबुद्धीनें किंवा त्यांच्या संस्कृत ज्ञानाच्या संबंधानें विचार केला असतां ते मोठे पूज्य मानिले पाहिजेत. पण भूगोलज्ञानाच्या संबंधानें पाहिलें असतां त्यांचें ज्ञान फार कोतें

दिसतें; ह्मणजे हिंदुस्थानाबाहेरची त्यांस फारशी माहिती होती असें त्यांच्या पुराणग्रंथावरून दिसत नाहीं. हे ग्रंथ सांगणारे जे पुराणीक ह्यांचें सर्वच ज्ञान किती भिक्षुकावस्थेंत असतें हें विचारीजनास माहितच आहे.

तत्राप सांप्रत ज्यास **सिंहलद्वीप** ( **सिलोन** ) ह्मणतात तेंच लंका बेट हें दाखविण्यास पुष्कळ आधार आहेत. त्यांपैकीं आह्मी येथें कांहीं देतों. मागील भागांत **ग्रीस, इतली, चीन, इराण** इत्यादि देशांचें ह्या द्वीपाबरोबर दळणवळण असल्याचें सांगितलेंच आहे. त्या देशांतील ग्रंथकारांनीं ह्या द्वीपाविषयीं माहिती दिली आहे; तिजवरून पूर्वकालीं ह्याच बेटास लंका ह्मणत होते असें दिसतें. शिवाय **पालीभाषेंत महावंश, राजावलि, राजरत्नाकरी** इत्यादि मोठे जुने ग्रंथ आहेत. हे सर्व ग्रंथ मुख्यत्वें **लंकेंतील** माहितीविषयीं लिहिलेले आहेत. त्यांत या बेटास लंका असें पुष्कळ स्थळीं ह्मटलें आहे. ह्यांतील वर्णन आणि वर सांगितलेल्या लोकांनीं दिलेली माहिती ह्यांत पुष्कळ गोष्टींत चांगला मेळ आहे. **महावंश** ग्रंथांत तर असें स्पष्ट लिहिलें आहे कीं, **विजय** राजाचे अनुयायी ह्यांनीं ह्या बेटास प्रथम **सिंहल** ( **सिंहाचें स्थान** ) असें नांव दिलें. **सिंहलापासून** पुढें सिलोन हें नांव पडलें. **विजयराजाचें** वर्णन पुढें इतिहास प्रकरणांत येईल. हा राजा लंकेंत प्रथम आला तेव्हां तेथें **यक्ष** व **नाग** असे दोन जातींचे लोक राहत होते. **यक्ष** लोकांच्या राजधानीस लंकापुर असें नांव होतें, असें ही वरील ग्रंथांत लिहिलें आहे. **लंकापुर** नांवाचें एक गांव ह्या द्वीपांत

आहे. लंकाविस्तार्य नांवाचा एक जुना ग्रंथ सिंहली-भाषेंत आहे. ह्या ग्रंथाचें नांवच ह्या द्वीपास **लंका** ह्मणत असतील असें सांगतें. लंकेंतील प्राचीन ऐश्वर्याचा जो भाग सांप्रत दृष्टीस पडतो, त्यावरून वरील ग्रंथांतलें वर्णन खरें असावें असें सहज वाटतें. त्यांतील वर्णन वाचूं लागलें म्हणजे फ्रान्स देशांतील पारिस शहरचें वर्णन आपण वाचतों आहों असा कांहीं भास होतो. **ग्रीक व रोमन्** लोक ह्या द्वीपास **ताम्रपर्णी** अथवा तांब्रपाणी ह्मणजे ताम्रवर्णी ( तांबड्या वर्णाचा देश) ह्मणत. कारण येथील मातीचा रंग तांबडा आहे. **गुजराथेंतील गिरनार** पर्वतावर **अशोक** राजाचे शिलालेख आहेत; त्यांत ह्या द्वीपास **तांब्रपानी** असें ह्मटलें आहे. ह्यास सैरंद्र किंवा सुरेंद्र द्वीप ह्मणत; तें असुरेंद्र द्वीप ह्मणते तर बरें होतें; कारण असुरांचा राजा रावण येथें राज्य करीत होता. आह्मां हिंदु लोकांत **लंका** ( तेजःपुंज ) ह्या नांवानें प्रसिद्ध आहे तें यथार्थच आहे. वर दाखविलेल्या आधारांशिवाय ह्या द्वीपांतील कित्येक गोष्टींचें वर्णन पुढील भागांत दिलें आहे, त्यावरून **रावणाची लंका** ह्मणतात ती हेंच द्वीप; असें वाचकांच्या सहज लक्षांत येणार आहे. आतां एक गोष्ट सांगून आह्मी हा विषय पुरा करितों. कोणत्याही देशाचें अगर स्थलाचें प्राचीन नांव काय होतें, हा विचार ठरविणें झाल्यास परस्थ लोकांनीं आपल्या घरांत बसून त्याजविषयीं वादविवाद करण्यापेक्षां तेथें सांप्रतकालीं राहणारे जे विद्वान असतील त्यांचें मत या ठरावांत अधिक महत्त्वाचें समजलें पाहिजे. ह्या नियमास अनुसरून **सिलोन** द्वीपांतील विद्वान लोक

रावणाची लंका ह्मणावयाची ती हेंच बेट ह्मणून सांगतात. वरील प्रकरण लिहिल्यानंतर आणखी एक आधार मिळाला आहे तो वाचकांनीं पाहावा. (रामायणचंपूकांड ६ श्लोक ३२ च्या पुढचें गद्य पहा; त्यांत ही ह्या बेटास लंका असें नांव लिहिलें आहे.)

ह्या शिवाय ह्या बेटांतील कल्याणी ह्मणून गांव आहे ती बिभीषणाची राजधानी होती असें द्वीपस्थ लोक सांगतात व त्याचा उत्साह ही तेथें होतो.

---

## भाग तिसरा.

### देखावे.

ह्या द्वीपास कोणत्याही बाजूनें जाऊं लागलें असतां जो देखावा दृष्टीस पडतो तो इतका भव्य आणि मनोरंजक आहे कीं, त्याचें साम्य करण्यासारखीं स्थलें सृष्टींत थोडींच सांपडतील. आगबोटींत बसून द्वीपाच्या जवळ जवळ जाऊं लागलें ह्मणजे त्याची अप्रातिम शोभा व वृक्षांच्या पर्णांनीं व पुष्पांनीं आच्छादित झालेले त्यांतील डोंगर पाहून मनास अत्यंत आल्हाद होतो; आणि असें वाटतें कीं, हें द्वीप वसंताचें जणूं काय आवडतें स्थानच असून त्यानें ह्यांतील उच्चनीच प्रदेशावर नानाविध पुष्पांचे चित्रविचित्र गालीचे पसरून ठेविले आहेत. येथील अति रम्य देखावे आणि दुसऱ्या गोष्टींचें ऐश्वर्य पाहून एका बौद्ध कवीनें असें ह्मटलें आहे कीं, हिंदुस्थानरूप जी ललना तिच्या भालावरील हें द्वीप तिलक आहे.

आह्मी द्वीपांतील बंदरांत जाऊन उतरल्यावर आमच्या नजरेस प्रथम जो देखावा पडला त्याचें वर्णन पुढें येईल. आपल्या देशांतील तुतुकुडीय बंदर येथें आह्मी आगबोटींत बसून लंकेंतील कोलंबो नांवाच्या बंदरावर जाऊन उतरलों. हें बंदर येथील सांप्रतची राजधानी आहे. आपणास मैनारची खाडी ओलांडावी लागते; त्यास बेवीस तास लागले. खाडीची रुंदी सुमारें १५० मैल आहे. बंदरापासून तीन मैलांवर दालचिनीच्या शेंकडो बागा आहेत.

आतां आह्मी वर सांगितलेल्या देखाव्याचें वर्णन देतों. कोलंबो येथें आह्मी आगगाडींत बसून क्यांदी (नुवर) शहरास गेलों. हें शहर कोलंबो येथून सुमारें पाऊणशें मैल आहे. ही प्राचीन राजधानी होती. जातेवेळीं आह्मास असें वाटलें कीं, आह्मी एका विस्तीर्ण बागेंतून जात आहों. रस्त्याच्या दोहों बाजूंस एकसारखी दाट झाडी लागून गेली आहे. मधून मधून अनेक जातींचे ताडवृक्ष आपलीं डोकीं वर करून डुलत आहेत. कोठें कोठें नानाप्रकारच्या पुष्पलता वृक्षांस आलिंगन देऊन राहिल्या आहेत. वाटेंत आह्मास कांहीं बोगदे लागले; एक बोगदा ओलांडून पुढें जाऊं लागलों तों पहिल्यापेक्षां वेगळा पण रमणीय देखावा दृष्टीस पडत गेला. कांहीं ठिकाणीं शोभायमान पिसाऱ्याचे पक्षी लहान सरोवरावर क्रीडा करीत होते. कोठें डोंगरावरून स्वच्छ पाण्याचे ओहोळ दाट वृक्ष वेलींतून खालीं उतरत असलेले दृष्टीस पडत. कोठें एके बाजूस पर्वताच्या निळ्या टेंकड्या वृक्षांतून चमकत असलेल्या दिसत. मध्यें

मध्यें स्टेशनावर आगगाडी थांबे तेथें उत्तम प्रकारचीं पिंवळे रंगाचीं शाळीं व केळीं व हिरवे आननस विकावयास लोक आणीत, तीं फळें फार रुचकर असत. शाळ्यांत अमृतासारखें गोड पाणी शेर दोनशेर पर्यंत असे, तें अत्यंत गोड लागे. श्री. रा. आबासाहेब, श्री. रा. सुधोळकर राजेसाहेब, व त्यांचे गुरु व आमचे मित्र रा. रा. विठल खंडेराव कीर्तिकर व आह्मी एकमेकांस हा देखावा पहा, ती मौज पहा असें बोलत चाललों असतां आह्मी क्यांदीशहरास जाऊन पोहोंचलों तेव्हां आह्मांस असें वाटलें कीं, एवढ्या वेळांत आह्मी इतके दूर आलों तरी कसे? ह्याप्रमाणें त्या दिवशीं आमचा वेळ जलदी गेला. ह्या द्वीपांत बारा महिने पाऊस पडतो; दर महिन्यांत थोडा थोडा पडतो ह्यामुळें सर्व जमिनीवर नेहमीं हिरवें गवत उगवलेलें असतें. आह्मी कोलंबोहून क्यांदीस जातांना व येतांना पाऊस मधून मधून पडत होता. कोलंबो आहे समुद्राचे काठीं व क्यांदी आहे उंच प्रदेशावर ह्यामुळें कोलंबोहून क्यांदीस जावयाचें ह्मटलें ह्मणजे डोंगर चढून आगगाडी जाते व येतांना डोंगर उतरून येते; खंडाळ्याजवळ बोरघाटांत जसे बोगदे आहेत तसेच ह्याही घाटांत आहेत. आह्मास आगगाडींत सिंहली भिक्षुक भेटले होते. जातांना व येतांना पर्जन्य फार पडत होता ह्यामुळें डोंगरांतील देखावा रमणीय दिसत असे व डोंगरांतील सपाट प्रदेशावर चहाचीं शेतें दृष्टीस पडत व तालीपत्र ताड त्या वेळेस फुलला होता त्याचा वास सुंदर येत होता.

आतां क्यांदी शहरांत ज्या विशेष गोष्टी आमच्या अ-

वलोकनांत आल्या त्यांजविषयीं येथें थोडेंसें वर्णन देतों. प्रथम आह्मी पेरादेनिय येथील बोव्यानिकलगार्डन ( वनस्पतीसंग्रहाची बाग ) पहावयास गेलों. ही मोठी विस्तीर्ण आहे. येथें नानाप्रकारचे वृक्ष आणि वेली आहेत. त्यांपैकीं कांहीं विशेष सांगतों. ट्र्यावेलर्स-पाम ( प्रवाशाचा ताड ) ह्याचीं पानें केळीच्या पानासारखीं असतात; तालीपट ताड, ह्याचें वर्णन पुढें वृक्ष आणि वेली ह्या प्रकर्णांत दिलें आहे; ज्यापासून कोयनल उत्पन्न होतें तीं झाडें, प्रचंडवेळू, जायफळ, रबर, आयर्नवुद, चाकोलेट, लवंग, चहा, खारीक, हीं झाडें व शेंकडों जातींचे ताड व निवडुंग व नानाप्रकारच्या वेली पाहिल्या त्यांचें वर्णन करावें तितकें थोडेंच; ह्या बागेचा खर्च सालीना वीस हजार रुपये आहे.

नंतर गुणतिलकनांवाचा एक मोठा विद्वान आहे, त्यास भेटावयास आह्मी गेलों होतों, त्यास आठ भाषा येतात. सिद्धांतकौमुदी, मनोरमा, शेखर, व महाभाष्य हे ग्रंथ त्यास चांगले येतात. व्याकरणशास्त्रांत ह्याचा मोठा बाणा आहे. सांप्रत हे पंडित पाणिनीच्या अष्टाध्यायी ग्रंथाचें इंग्रजींत भाषांतर करीत आहेत. ह्यांचे पूर्वज थोर कुळांतील बौद्धधर्मी होते; परंतु यांच्या बापानें ख्रिस्ती धर्म स्वीकारिला; तेव्हांपासून हे पंडित त्याच धर्मानें चालतात. यांचा निरोप घेऊन आह्मी येथील बुद्धाचें देवालय पहावयास गेलों. त्याचें वर्णन पुढें देवालय प्रकरणांत येईल.

येथें थोडें विषयांतर झालें. ह्या शहराजवळ एक टुमदार देखावा आहे, त्याचें थोडेंसें वर्णन देतों. शहरच्या

बाजूस एक मैलावर एक मोठा तलाव आहे. त्यांत एक छोटें पण सुरेख बेट आहे. येथें पूर्वींच्या राजांचा जनानखाना असे. तलावाभोंवतीं लहान मोठ्या मजेदार टेंकड्या आहेत. ह्यांतील एकीवर उभें राहून पाहिलें ह्मणजे खालच्या बाजूस शहराचा देखावा मोठा सुंदर दिसतो. पूर्वेकडच्या बाजूस डुंबीऱ्याचा दरा असून त्यांतून महावेली गंगा मोठ्या डौलानें वाहत जाते. गार व रम्य झाडींतून तिचा प्रवाह सूर्यकिरणांनीं चमकत चाललेला पाहून मनास मोठा आनंद होतो. एका स्थळीं असें ह्मटलें आहे कीं, ज्यानें क्यांडीशहर पाहिलें नाहीं त्यानें ह्या पृथ्वीवर कांहीं पाहिलें नाहीं. वरील देखावा पाहून हा लेख त्यानें लिहिला असावा असें वाटतें. त्याप्रमाणें हा सुंदर व रमणीय आहे खरा परंतु तारीफ केल्याइतका अपूर्व आह्मास भासला नाहीं.

आतां ग्यालपासून कोलंबोपर्यंत जो ७० मैल रस्ता जातो, त्याच्या देखाव्याचें वर्णन करतों. त्याच्या दोहों बाजूंस एकसारखे दाट व उंच अनेक तऱ्हेचे ताडवृक्ष लागून गेले आहेत. मधून मधून नानाप्रकारच्या पुष्पलतांनीं शोभायमान झालेले वृक्ष दृष्टीस पडतात; पुढें जावें तों शोभायमान पिसाऱ्यांचे पक्षी जलाशयावर स्वेच्छ क्रीडा करीत असतात. कोठें चित्रविचित्र रंगाचीं लहान पांखरें उडत असतात. तऱ्हेतऱ्हेचे लहान कृमी हिरव्या गार पर्णावर बसून काजव्याप्रमाणें चमकत असतात. एके बाजूस आदमसूपीकचीं शिखरें डोकीं वर काढतात, व त्यांच्या पलीकडे क्यांदीपर्वताच्या जांबळ्या टेंकड्या दिसतात. डाव्या बाजूस नीलवर्णाचा स-

मुद्र चमकत असतो आणि त्यांतून वर आलेल्या खड-कांवर बनलेलीं बेटें ज्यांवर समुद्राच्या लाटा बडवून त्यांच्या फेसानें शुभ्र झालेलीं चमकत असतात. किना-ऱ्याकडे पहावें तों पिवळ्या वाळूनें आणि वृक्षांच्या हिरवेपणानें ते प्रफुल्लित झालेले दिसतात. असा देखावा पाहून रममाण होणार नाहीं असा शून्यहृदयी कोण आहे.

ह्याप्रमाणें सुंदर आणि रमणीय देखाव्यांचीं स्थलें ह्या द्वीपांत अनेक आहेत; त्यांपैकीं आणखी एक दोनींचें वर्णन आमच्या वाचकांच्या मनोरंजनार्थ देऊन हें प्रकरण आह्मी पुरें करितों. पाइंतदीग्याली येथील देखावा मोठा मनोहर आहे. येथें एकाद्या उंचवट्यावर उभे राहून वायव्यदिशेकडे पाहूं लागलें ह्मणजे समुद्राचें पाणी नीलरत्नाप्रमाणें लखाकत असून सर्व किनारा ताज्या पुष्पांनीं जसा काय रत्नाच्छादित झाल्याप्रमाणें चमकत असून उजवेबाजूस उंच टेंकड्या जांबळ्या रं-गाच्या दिसतात. त्यांच्या शिखरांवरून पाण्याचे ओ-होळ मंजुळ शब्द करीत खालीं उतरत असतात. ह्यांच्या पलीकडे आदमस्पीकचीं शिखरें मेघाच्छादित झालेलीं पाहून मन अगदीं रमून जातें आणि देखावा पहातच उभें रहावें असें वाटतें. ह्या देखाव्यानेंच केवळ या स्थळास महत्त्व आलें आहे असें नाहीं; तर पृथ्वीवर परदेशांशीं व्यापार करण्याचीं जीं प्रसिद्ध स्थलें आहेत त्यांत हें एक मोठें मान्य धारिलें आहे.

मृगजलाचा एक देखावाच आहे, तो आपल्या दे-शांत कोठें कोठें नजरेस पडतो. पण ह्या द्वीपांतील

मृगजलाचा देखावा विशेष मौजेचा आहे; करितां त्याचें थोडेंसें वर्णन देतों. जापने व त्रिकोमाली यांच्या दरम्यान कोकिल नांवाचा एक तलाव आहे. याच्या भोंवतीं गर्द झाडी आहे. तींत रानरेडे, हरिणें, डुकरें, कोल्हे, ससे इत्यादि प्राणी पुष्कळ आहेत. हें स्थल पाहून शिकारीलोकांस मोठा आनंद होणार आहे. झाडींतून बाहेर पूर्वेस गेलें ह्मणजे गंधर्वसृष्टि म्हणतात ती दृष्टीस पडते. आपण पुढें ज्या स्थलीं जाणार तें जलानें आच्छादित दिसतें आणि त्यांत आपलया समोर वृक्षांनीं शोभायमान झालेलें एक गंधर्वबेट आणि त्या वृक्षांची छाया प्रतिबिंबित झालेली दिसूं लागते. आणखी थोडें पुढें गेलें कीं हा सर्व गौडबंगाल खेळ दिसेनासा होतो. तेव्हां मनांत असा संशय येतो कीं सर्व प्रकारें पूर्ण असा जो देखावा मीं नुक्ता पाहिला तो भ्रम तरी कसा ह्मणावा. आह्मीं सर्व हिंदुस्थानांत पर्यटण केलें त्यांत असे रम्य देखावे आह्मांस अन्यत्र दिसले नाहींत.

---

## भाग चौथा.

### द्वीपाची लांबीरुंदी व हवामान इत्यादि.

उत्तरेस पाइंतपेद्रोपासून दक्षिणेस दांदिराहेदपर्यंत लांबी २७१$\frac{१}{२}$ मैल, आणि पश्चिमेस कोलंबोपासून पूर्वेस सांगमनूकांदपर्यंत रुंदी १३७$\frac{१}{२}$ मैल आहे. द्वीपालगतचीं पोटबेटें धरून याचें क्षेत्रफळ २५,३६५ चौरस मैल आहे. येथील लोक सुमारें २७,५९,७३८ आहेत. ह्यांपैकीं किती लोक कोणत्या जातीचे, धर्माचे व धंद्याचे आहेत ह्याचा तपशील करून खालीं दाखवितों.

## जातीप्रमाणें तपशील.

| जात. | पुरुष. | स्त्रिया. | एकूण. |
|---|---|---|---|
| युरोपियन. | ३१८१ | १६५५ | ४८३६ |
| युरेझियन व वर्घर. | ८९२७ | ८९५९ | १७८८६ |
| सिंहली. | ९६२४३० | ८८४१८४ | १८४६६१४ |
| तामिल. | ३८०४९० | ३०६७५८ | ६८७२४८ |
| मूर. | १०३८०४ | ८०७३८ | १८४५४२ |
| मलयलोक. | ४७३९ | ४१५६ | ८८९५ |
| वेद्दाज. | ११७७ | १०५१ | २२२८ |
| इतर. | ४८०५ | २६८४ | ७४७८९ |
| एकूण. | १४६९५५३ | १२९०१८५ | २८२७०३८ |

## धर्माप्रमाणें तपशील.

| | | | |
|---|---|---|---|
| ख्रिश्चियन. | १३९६५८ | १२८३१९ | २६७९७७ |
| बौद्धधर्मी. | ८८८३५७ | ८०९७१३ | १६९८०७० |
| हिंदु. | ३२८७७९ | २६४८५१ | ५९३६३० |
| मुसलमान. | १११३३९ | ८६४३६ | १९७७७५ |
| इतर. | १४२० | ८६६ | २२८६ |
| एकूण. | १४६९५५३ | १२९०१८५ | २७५९७३८ |

धंद्याप्रमाणें तपशील.

| जात. | पुरुष. | स्त्रिया. | एकूण. |
|---|---|---|---|
| विशेष प्रकारचे धंदे करणारे. | ३१८३६ | १४६६ | ३३३०२ |
| घरकाम करणारे. | २९३८८ | ६२७३२९ | ६५६७१७ |
| व्यापार करणारे. | ५४५६६ | ८७६६ | ६३३३२ |
| शेतकी करणारे. | ५७९३३६ | ६४९४८ | ६४४२८४ |
| उद्योगी. | ९४८५० | ६३९६१ | १५८८११ |
| निरुपयोगी व दुसरे. | ६७९५७७ | ५२३७१५ | १२०३२९२ |
| एकूण. | १४६९५५३ | १२९०१८५ | २७५९७३८ |

ह्यापैकीं सुमारें १४६९५५३ पुरुष आणि १२९०१८५ बायका आहेत.

ह्या द्वीपांत अति उन्हाळा होतो तेव्हां पारा ८९ अंशांवर असतो आणि हिंवाळ्यांत फार कडक थंडी पडते तेव्हां ५२ अंशांवर उतरतो. येथें बाराही महिने पावसाळा असतो ह्मणण्यास हरकत नाहीं. येथें अति कडक उन्हाळा किंवा थंडी पडत नाहीं. येथील लोकांस तुफान किंवा धरणीकंप फार करून ठाऊक नाहीं. ह्या द्वीपांत देशाच्या उच्च नीच प्रदेशाचे मानानें २५ पासून

१९९ इंचपर्यंत पाऊस पडतो. एप्रिल, मे, अक्टोबर व नोवेंबर ह्या चार महिन्यांत विशेष पडतो. त्यांत शेवटल्या दोन महिन्यांत तर फारच पडतो. येथें झाडी फार असून नारळीचे वृक्ष तर अति विपुल असल्यामुळें विद्युत्पात फार विरळा होतो.

येथील हवा, ऋतु आणि वातावरण ह्या संबंधानें कांहीं मौजेच्या गोष्टी दृष्टीस पडतात; त्यांचें थोडेसें वर्णन देतों. कांहीं गाळाच्या प्रदेशांत जेथें आपणांस आतां वरच्या बाजूस कोरडी जमीन मात्र दिसत असते तेथें थोडा ओलावा पोहोंचला कीं तीच जमीन चोवीस तासांत हिरवें गार मैदान दिसूं लागतें. तसेंच पाणी अटून गेलेल्या तलावाच्या पात्रांतून आज धुरळा उडत असतो आणि त्यास ओलावा मिळाला कीं थोड्या दिवसांत तेथें पुनर्जीवन पावलेले मासे व दुसरे जीव इकडून तिकडे फिरूं लागलेले नजरेस पडतात. येथें ऋतूच्या बदलण्याप्रमाणें हवेंत एकदम मोठा फेरफार होत नाहीं; ह्यामुळें एकाच वृक्षाच्या कांहीं फांद्यांवरील पर्णें सुकून वाळूं लागतात तों दुसऱ्यांवर किरमिजी रंगाचीं लाल पानें आलेलीं दिसूं लागतात. तसेंच फांदीच्या एके बाजूस उमळणारे कळे आणि दुसऱ्या बाजूस त्या कळ्यांचीं बनलेलीं फळें एकाकालीं पाहून मनास मोठी मौज वाटते. आरोग्य राहण्यास आपल्या देशांतील समशीतोष्ण प्रदेशाची हवा चांगली आहे. पण लंकेंतील याहीपेक्षां चांगली आहे. **न्युरेलिया** हें मुंबई इलाख्यांतील **महाबळेश्वराप्रमाणें** हवा खाण्यास जाण्याचें येथील लोकांचें स्थान आहे. येथें ऐन दुपारीं बाहेर

फिरावयास गेलें असतां उन्हापासून त्रास होत नाहीं. येथील उदक मोठें मधुर असून चांगलें पाचक आहे. देखाव्याकरितां जीं स्थलें द्वीपांत प्रसिद्ध आहेत त्यांतील हा डोंगर आहे.

वातावरणसंबंधानें ह्या द्वीपांत एक चमत्कार दृष्टीस पडतो, त्याचें थोडेंसें वर्णन येथें देतों. प्रातःकालीं सूर्य क्षितिज्यानवळ असून त्याचा प्रकाश लखलखीत पडतो आणि आपली सावली दंवानें आच्छादित गवतावर पडलेली स्पष्ट दिसते, तेव्हां दंवाचा प्रत्येक कण द्विगुण परावर्तन पावतो; तेणेंकरून आपल्या मस्तकाभोंवतीं तेजाचा पुंजका आहे असें भासूं लागतें. ह्या तेजास बुद्धलोक बुद्धाचे किरण असें मानितात. हा चमत्कार बंगाल्यांत क्वचित् स्थलीं दिसतो.

---

## भाग पांचवा.

### पर्वत व डोंगर.

ह्या द्वीपाच्या आकारमानानें पाहिलें असतां येथील पर्वत बरेच उंच असून ह्यांनीं दक्षिणेकडील पुष्कळ भाग व्यापिलेला दिसतो. त्यांची उंची सुमारें साहा हजार फुटींपासून आठ हजारपर्यंत आहे. त्यांतील मुख्यांचीं नांवें सांगतों. **पेद्रोतलेगला**, याची उंची सुमारें ८२०० फूट आहे. हा सर्वांत उंच आहे. **किरिगलापोता, तोतापिला, आदमसपीक, नाम्नुनीकुलीकांदा,** आणि **न्युरेलिया** इत्यादि आहेत. न्युरेलिया हा सर्वांत लहान आहे; ह्याची उंची सुमारें ६२०० फूट आहे. येथें लोक हवा खाण्यास जातात हें पूर्वीं सांगि-

तलेंच आहे. ह्या डोंगरांतील बहुतेकांवरील देखावा मोठा रम्य आहे. येथें पावसाळा बाराही महिने असल्यामुळें पर्वतांच्या कड्यांवरून जलौघ नेहमीं वहात असून ते खालच्या दऱ्यांत जाऊन पडतात आणि तेथून नद्यांस किंवा समुद्रास जाऊन मिळतात. ह्या पर्वतांच्या पायथ्याकडील भाग नारळींच्या आणि वरील प्रदेश ताड व दुसऱ्या वृक्षांनीं सुशोभित झालेले आहेत. ह्यांशिवाय महीतल, सामी इत्यादि टेंकड्या पुष्कळ आहेत. महीतलावरील लेण्यांची व देवालयांची आणि सामी येथील शिवालयाची कथा पुढें येणार आहे.

लंकाद्वीपांत पाहण्यासारख्या वस्तु शेंकडों आहेत. त्यांतील आदमस्पीक ही एक होय. येथील देखावा मोठा मनोहर असून प्रसिद्ध आहे. याजपेक्षां उंच पर्वत पुष्कळ आहेत; परंतु याजवरून आपली नजर पोहोंचेपर्यंत मध्यें कांहीं आड न येतां जलावरील व भूमीवरील सर्व देखावा एककालीं दृष्टीस पडतो. उत्तरेकडे व पूर्वेकडे क्यांदीचे डोंगराच्या उंच टेंकड्या क्षितिजास मिळालेल्या दिसतात, आणि पश्चिमेकडे चढतीं उतरतीं मैदानें असून त्यांमधून रुप्यासारख्या शुभ्र पाण्याच्या नद्या वहात जाऊन हिंदिमहासागरास मिळतात. त्यांच्या प्रवाहावर सूर्यकिरणें पडून ते दाट झाडींतून चमकत जात असलेले पाहून मनास कांहीं विलक्षण आनंद होतो. आपल्या पुराणांत ज्यास स्वर्गारोहण ह्मटलें आहे, तो हाच पर्वत. ह्याच्या शिखरावर एक देवालय आहे. त्यांत खडकांत खोदलेलीं दोन स्वयंभू पाउलें आहेत; वर जाण्यास दोन वाटा आहेत पण त्या फार

बिकट आहेत, कारण पर्वताचे कडे तुटलेले असून अ-गदीं उभे आहेत. दोहोंपैकीं एका वाटेस बाबाची आणि दुसरीस मातेची ( आडम आणि ईव ) वाट ह्मणतात. अशा बिकट वाटेनें शिखरावर चढतां यावें ह्मणून एके बाजूस दहा लोखंडी साखळदंड लोखंडी खुंटे मारून त्यांस अडकविलेले आहेत.

आतां ह्या सांखळदंडांविषयीं व पावलांविषयीं कांहीं चमत्कारिक माहिती दिली आहे ती थोडक्यांत सांगून हें प्रकरण पुरें करितों. इराणांतील अशरिफ नांवाचा ग्रंथकार आपल्या कवितेंत असें लिहितो कीं, सिकंदर पादशाहा लंकेंत आल्यानंतर त्यास ह्या शिखरावर चढतां यावें ह्मणून मार्गाच्या बाजूस लोखंडी खुंट्या मारून त्यास सांखळदंड जोडले होते, तेच हे असावे अशी कल्पना करितात. पादशाहा द्वीपांत आल्यानंतर ह्या पर्वतावर गेला होता ह्मणण्यास आणखी एक आधार दिसतो तो असा कीं, पर्वताच्या पायथ्याजवळ बादशाहाच्या नांवाचा एक मनोरा आणि एक झरा आहे. असो. सांखळदंडास धरून शिखरावर गेलें ह्मणजे तेथें एक ४० फूट उंचीची लोखंडी शिडी आहे. ती चढून भाविक लोक पादुकांच्या दर्शनास जातात. आपले हिंदुलोक त्यांस शंकराचीं पाउलें ह्मणून मानितात. बुद्धीलोक बुद्धाचीं ह्मणतात; चिनीलोक फोचीं, यवन, आदमचीं, पोर्तुगीजलोक सेंत् तामसचीं ह्मणून मानितात. तेथें जाणारे लोक पादुकांचें दर्शन घेऊन त्यावर फुलें वाहतात; आणि तीर्थ घेऊन वर घांट टांगलेली आहे ती वाजवून माघारे परततात.

---

## भाग सहावा.

### धातु.

ह्या द्वीपांत सोनें, लोखंड, कथील व ढंबेगो (शिशासारखी) ह्या धातु सांपडतात. **लंकेंत** सोन्याच्या विटा आहेत, अशी जी ह्मण आपल्या लोकांत पडली आहे, त्या मानानें येथें सोनें अगदीं सांपडत नाहीं, असें ह्मटलें तरी चालेल. तथापि त्या ह्मणीस थोडासा आधार दिसतो. **महाओ या** नदीच्या व कोलंबोपासून ४० मैलांवर **रंगवेली** (सोन्याची वाळू) नदीच्या वाळवेंत सोन्याचे कण सांपडतात. मध्य प्रांतांत **रांगगला** (सोन्याचा) नांवाचा पर्वत आहे. तेथून सहा मैलांवर पाऱ्यांच्या खाणीचा नवीन शोध लागला आहे. येथील एक मूठभर माती घेऊन ती धूऊन साफ केली ह्मणजे तींत एक रुपया किंमतीचा पारा सांपडतो. हिजवर इंग्रजसरकारानें पहारा ठेविला आहे.

येथें लोखंडाची मिश्रधातु पुष्कळ सांपडते. तिजपासून उत्तम जातीचें लोखंड पैदा होतें. ह्या द्वीपांत लोखंड पूर्वीं विपुल सांपडत होतें असें दिसतें, कारण त्याच्या जुन्या भट्ट्या अद्यापि कोठें कोठें दृष्टीस पडतात. सुमारें वीस शेर अशोधित धातु घेतली असतां तिजपासून दहा शेर शुद्ध लोखंड निघतें. हें लोखंड मोठें टणक असून त्याचीं हत्यारें, भिंगें वगैरे कापण्यास हिरकणीसारखीं उपयोगीं पडतात. सिंहलीलोक लोखंड शोधून तयार करण्यांत मोठे हुशार आहेत. मिश्रधातु भट्टींत घातल्यापासून तीन तासांत लोखंड तयार करि-

तात. त्याचा रस रुप्याचे रसाप्रमाणें चमकतो. त्याची मिश्रधातु येथें थोड्या श्रमानें मिळते. **स्याफ्रेगान** प्रांतांत लोखंडाची एक खाण आहे ती पंधरा मैल लांब गेली आहे.

छंबेगो ह्मणून शिशासारखी एक धातु आहे. ही **नांब्रिपेन** नांवाच्या टेंकड्या आहेत त्यांच्या दक्षिणभागांत सांपडते. ह्या धातूच्या शिसपेनासिली करितात. ही दरसाल एक हजार टनांहून अधिक बाहेर देशीं विक्रीस जाते. सोरमीठ येथें पुष्कळ सांपडतें. एक **स्याफ्रेगान** प्रांतांत ६० पेक्षां अधिक खाणी असल्याचें येथील लोक सांगतात. पण लोक अडाणी असल्यामुळें तें तयार करीत नाहींत आणि थोडें लागलें तरी ह्या देशांतून नेतात.

---

## भाग सातवा.

### रत्नें.

येथील पर्वतास महत्त्व येण्याचें मुख्य कारण ह्मटलें ह्मणजे त्यांतील रत्नांच्या खाणी होत. कांहीं नद्यांच्या पात्रांत ही रत्नें व सोनें सांपडतें. **तांब्रोपेन** ( लंका ) येथील रत्नें आणि मौक्तिकें ह्यांजविषयीं मोठी कीर्ति असून प्राचीनकालचे लोक येथील संपत्तीवर गाणीं गात. **आरेबियननाइट्स** नामक मनोरंजक ग्रंथांत **सेरिन** द्वीप येथील रत्नें ह्मणून जो लेख आहे, त्याचें मूळबीज हेंच असावें असें वाटतें. बौद्धलोकांत **पराहरा** नांवाचा एक वार्षिक सण आहे, त्या वेळीं रत्नपूर येथें जत्रा भरते, तींत मुख्य व्यापार रत्नांचा होत असतो; अशी

जत्रा अन्यत्र भरत असल्याचें उदाहरण आह्मास तर माहीत नाहीं. ह्यावरून व सांप्रत जीं रत्नें येथें सांपडतात, त्यावरून ग्रीकलोक ह्या द्वीपास रत्नद्वीप ह्मणत तें योग्यच होतें. तसेंच रामायणचंपूत "माणिक्यमंदिरभुवां" ह्मणून जें लिहिलें आहे, ती अतिशयोक्ति तर खरीच, पण त्यास कांहीं आधार होता असें, सांप्रतकालीं जीं रत्नें येथें सांपडतात त्यावरून ह्मटलें पाहिजे. त्यांतील कांहींचीं नांवें सांगतों; कारण त्या सर्वांस मराठी शब्द नाहींत असें वाटतें; निदान आह्मास तरी ते माहीत नाहींत. उदाहरण, **स्पिनल** (निळ्या हिरव्या रंगाचें माणीक इत्यादि) **क्याट्सआय** (मांजराचा डोळा) **सिनामन्स्टोन** दालचिनीचा दगड, ह्यांस मराठींत शब्द आह्मास माहीत नाहींत. स्पिनल-क्यांदीजवळ **महावेली गंगेच्या** पात्रांत सांपडतें; ह्यांत फार सुंदर रंग दिसतात. क्याट्सआयचा रंग मांजराच्या डोळ्याप्रमाणें चकचकीत हिरवा असतो, व यावरील पैलू बारीक किरणाप्रमाणें चमकतात. सिनामन हा याकूताचा एक भेद आहे. हें **मातर** येथें आणि **पाइंतदीग्यालीपासून** थोड्या मैलांवर पूर्वेस **बेलिगम** येथें सांपडतें.

आतां ज्या रत्नांचीं नांवें माहीत आहेत त्यांविषयीं थोडेंसें वर्णन देतों. माणीक, नील, पुष्कराज, लसण्या, याकूत, चंद्रकांत, आणि मौक्तिक इत्यादि रत्नें येथें पुष्कळ सांपडतात. त्यांत मौक्तिकाविषयीं पुढें वेगळेंच वर्णन देणार आहों. माणकें सांपडतात तीं स्थळें पूर्वीं सांगितलींच आहेत. कांहीं वर्षांपूर्वीं एथील एका इं-

ग्लिश कामगाराच्या स्वयंपाक्यास एका पक्ष्याच्या पोटांत वाटाण्याएवढें माणीक सांपडलें होतें. तसेंच इ० स० १८९३ सालीं रत्नपूरपासून थोड्या मैलांच्या आंत एक नीळ सांपडला. तो कोलंबो येथील एका मूर जातीच्या व्यापाऱ्यानें विकत घेतला. त्याची किंमत चाळीस हजार रुपयांपेक्षां अधिक झाली होती. माणीक, नीळ, आणि याकूत यांच्या बारीक चुण्या दक्षिणेकडे वाहणाऱ्या नद्यांच्या वाळवेंत इतक्या विपुल सांपडतात कीं, तेथील मणेर ( रत्नें तयार करणारे लोक ) ती चूर्णिका मिश्रित वाळु आणून तिनें रत्नें व हस्तिदंत हीं घांसून तयार करितात.

ही गोष्ट मात्र चमत्कारिक आहे कीं, ह्या द्वीपांत माणकांपेक्षां नील अधिक सांपडतो; पण त्याचा अद्यापि बरोबर शोध झालेला नाहीं; तत्रापि रत्नांच्या शोधाकडे अलीकडे लोकांचें विशेष लक्ष लागत चाललें आहे, आणि त्याप्रमाणें करागोदी व त्रिराळुपा येथें नवीन स्थलें सांपडलीं आहेत; त्यांत मोठ्या आकारांचीं आणि किंमतींचीं रत्नें मिळूं लागलीं आहेत. हीं रत्नें खरेदी घेऊन तयार करणारे लोक मूरजातीचे आहेत. ते हीं रत्नें घेऊन त्यांच्या बदली कापड व मीठ देतात. हे लोक तीं तयार करण्याचे कामीं चांगले हुशार नाहींत व त्यांचीं हत्यारेंही सुबक नाहींत. माणीक, नीळ इत्यादि अधिक मोलाचीं रत्नें तयार करणारे लोक कलुतर आणि कोलंबो येथें राहतात. माणकाचा रंग कबुतराच्या रक्तासारिखा लाल असावा. त्यावर काळा छटा असला तर कांहीं कृत्रिम आंच देऊन तो हे लोक

काढूं शकतात. माणीक व दुसरीं रत्नें जमिनीच्या पृष्ठ-भागापासून दहा फूटपासून वीस फूटपर्यंत खालीं खणलें ह्मणजे सांपडतात. रत्नांचा शोध दिसेंबरपासून मार्च महिन्यापर्यंत करितात.

रत्नें ज्या प्रदेशांत सांपडतात ते प्रदेश पहावयास लोक गेले ह्मणजे आपणास एकादें रत्न मिळावें ह्मणून पाहूं लागतात, आणि त्यांचा यत्न बहुतकरून अंशतः सफल होतो. त्यांस अगदीं लहान माणक्या ज्यास चुण्या ह्मणतात त्या किंवा निळाच्या चुण्या सांपडतात. **रत्नपूर** येथें माणकाच्या चुण्या थोड्या किंमतीस मिळतात. ह्या द्वीपांत जीं रत्नें सांपडतात, त्यांतील एक चतुर्थांश, द्वीपांतील श्रीमान् लोक विकत घेतात, सुमारें एक द्वितीयांश आपल्या देशांत येतात; आणि बाकीचीं यूरोपखंडांत जातात. अलीकडे **स्याफ्रेगान** येथील लोक श्रीमंत होत चालले आहेत, त्यामुळें उत्तम जातीचीं रत्नें सांपडतात, तीं फारशीं बाहेर विक्रीस न पाठवितां आपणच घेऊन ठेवितात. तथापि एक लाख रुपयांवर किंमतीचीं रत्नें दरसाल बाहेर विकरीस जातात.

---

## भाग आठवा.

### नद्या.

ह्या द्वीपांत बऱ्याच नद्या आहेत. **महावेलीगंगा** ही सर्वांत मोठी आहे. आह्मी **क्यांदी**शहरास गेल्या वेळीं ही नदी पहावयास गेलों होतों. हिचा उगम **आदमस्पीक** पर्वताच्या दक्षिणेस असून ही **त्रिंकोमाली** बंदराजवळ समुद्रास जाऊन मिळते. समुद्रास मिळण्या-

पूर्वीं ४० मैलांवर हिचे दोन फांटे होतात. एक उत्तराभिमुख होऊन वर सांगितलेल्या बंदराजवळ समुद्रास मिळालेला आहे. दुसरा बहुमुखांनीं हत्तीच्या बेटांजवळ समुद्रास मिळतो. हिची लांबी १३४ मैल आहे. हिच्या प्रवाहानें सुमारें चार हजार चौरस मैल जमीन भिजते. इंग्रजलोक द्वीपांत आल्यावर त्यांनीं ह्या नदीवर एक मोठा पूल बांधिला आहे. सिंहलीभाषेंत गंगा हें पद मोठ्या नदीस आणि ओया हें लहान नदीस लागतें.

दुसऱ्या नद्या लहान आहेत; त्यांतील मुख्यांचीं नांवें सांगतों. किरींदी, उलावे, गिदूरा, कल्याणी, महाओया, ह्या होत. ह्यांशिवाय द्वीपाच्या उत्तरभागांत आणि आग्नेयीकडे दुसऱ्या नद्या आहेत. त्यांतील मुख्य ह्मटल्या ह्मणजे आर्व व मोदिरीगम; ह्या मायनारच्या आखातास जाऊन मिळतात. कालाओया, कंदालदी, मालवतीओया ( कदंव ) नावलूर, इत्यादि नद्या आहेत. पाइंतदीग्याली ( गाल ) बंदरापासून कोलंबोपर्यंत व तेथून क्यांदी शहरापर्यंत जो रस्ता जातो त्यांत आडव्या येणाऱ्या नद्यांवर पूल झालेले आहेत. कल्याणी नदीवर नांवांचा पूल आहे, आणि तेथून पेरादेनिय येथें महावेलीगंगेजवळ गेलें ह्मणजे २०६ फूट रुंदीचा एकाच कमानीचा मोठा पूल बांधलेला आहे. ह्याच नदीवर गंपोल येथें एक ( सस्पेनशन ) लोंबता पूल आहे. क्यांदी व कार्नीगाली ह्यांच्यामधून वाहणाऱ्या नद्यांवरून पूल झालेले आहेत. द्वीपांच्या आग्नेयीस माणीकगंगा नांवाची एक लहान नदी आहे.

ह्या नद्यांत जहाजें चालण्याचें राहूंदे, पण नावादे-

खील सर्व नद्यांतून चालत नाहींत. कांहींत चालतात त्या, त्यांच्या मुखांकडील प्रवाहांत थोडे मैलपर्यंत जातात. बहुतेक नद्यांत पाणी फार नसून त्यांच्या भोंवतीं झाडी फार दाट आहे; त्यामुळें त्यांच्या कांठची हवा बिघडून मोठी रोगकारक झालेली असते. कांहीं नद्यांस मोठाले धक्के बांधून त्यांचे प्रवाह तलावांत नेऊन सोडले आहेत, व कांहीं वरील देखावे मोठे रमणीय आहेत.

---

## भाग नववा.

### समुद्र व लंकेभोंवतालचीं दुसरीं बेटें.

हिंदीमहासागरांत लहानमोठीं अनेक बेटें आहेत, त्यांपैकीं लंका हें सर्वांस माहीत आहेच. पूर्वकालपासून आपल्या लोकांस नौकागमनशास्त्राचें ज्ञान चांगलें नसल्यामुळें उदकरूप पृथ्वी ( समुद्र ) वरील चमत्कार आपल्या लोकांस चांगले अवगत नाहींत. पण हे चमत्कार भूमीवरील चमत्कारांपेक्षां कमी आनंद देणारे किंवा कमी महत्त्वाचे आहेत असें मात्र कोणी समजूं नये. ह्या द्वीपाच्या भोंवतीं थोड्या अंतरावर लहानसहान बेटें पुष्कळ आहेत. तीं ह्या द्वीपांतील पोटबेटें म्हणून गणलीं असतां चालेल. त्यांच्या योगानें द्वीपास मोठी शोभा व महत्त्व आलें आहे. आपल्या लोकांचें पवित्रस्थान जें रामेश्वर तें एक पोटबेट आहे; येथें प्राचीनकालापासून जमिनीची लागवड करण्याची मनाई आहे, व वृक्षही कमी आहेत, त्यामुळें येथील देखावा रुक्ष आहे. येथें मुख्य देवालय शिवाचें आहे. हें राम-

चंद्र लंकेवर गेले तेव्हां त्यांनीं स्थापिलें ह्मणून त्यास रामेश्वर असें नांव पडलें आहे. देवालयांत कोरींव मूर्त्ति व चित्रें पुष्कळ आहेत, आणि त्यावरील गोपुरें चांगलीं सुंदर आहेत. येथून जवळच मारुतीनें बांधिलेल्या सेतूचा अवशिष्ट भाग दृष्टीस पडतो. येथें अहिल्याबाईचा एक मोठा बगीचा आहे. यात्रेच्या निमित्तानें येथें दरसाल हजारों लोक जातात.

द्वीपाच्या पश्चिमेस **दोनाक्कारा** नांवाचें एक लहान बेट आहे. हें नांव तेथील राणीच्यावरून त्या बेटास पडलें. ती शरीरानें मोठी अगडबंब होती. पलीकडच्या बाजूस **सूर्य** नांवाचें एक बेट आहे, त्याची लांबी सात आठ मैल आहे. ह्याच्या मध्यभागीं एक टुमदार तलाव आहे. तेथें गुरांस पुष्कळ चारा मिळतो. **महावेलीगंगे**च्या दुसऱ्या फांट्यांस **वरगलनदी** ह्मणतात. तिच्या मुखांनीं झालेल्या बेटास हस्तिद्वीप ह्मणतात; कारण तेथें पुष्कळ हत्ती असत. ह्यांशिवाय प्रवालबेट, कावळ्याचें बेट, विश्रांबेट इत्यादि दुसरीं बेटें आहेत. ह्यांतील कांहीं बेटांत चांगल्या गोड्या पाण्याच्या विहिरी आहेत, आणि विहिरींतील पाण्याची सपाटी समुद्राच्या सपाटीपेक्षां कमी आहे. ही एक मोठा चमत्कार वाटण्यासारखी गोष्ट आहे.

---

## भाग दहावा.

### मत्स्य.

जीवरूप सृष्टि कोट्यवधि आहे, पण माशासारखी मोठी व प्रजोत्पादक दुसरी नाहीं. सांप्रत ह्या द्वीपांत

सहाशें जातींचे मासे सांपडतात व बाकीच्यांचा अद्यापि शोध होणें आहे. ते येथें इतके विपुल आहेत कीं पाइंतदीग्यालीच्या ( गाल ) पूर्वेस गोयापना उपसागरांत जाळयाच्या एका ओढणींत चार लक्षांपेक्षां अधिक मासे एकाच वेळीं मिळाले होते. आतां आह्मी त्यांतील कांहीं जाती व त्यांचे विशेष गुण सांगतों.

**सारदीन**.—ह्मणून एक जात आहे. हा दिसेंबर व जानेवारी ह्या दोन महिन्यांत विषारी असतो. ह्या दिवसांत तो खाल्यामुळें कांहीं लोक यमसदनास गेले असा लेख आहे. ह्या दोन महिन्यांत हे मासे कोणी धरिले तर त्यास कैद व दंड होईल ह्मणून सरकारचा ठराव आहे.

**नक्रराज**.—जातीचा मासा त्रिंकोमाली किनाऱ्याच्या सर्व भागांत सांपडतो. त्रिंकोमाली व कोलंबो बंदरांत जे लोक स्नान करावयास जातात त्यांस ते धरितात असें नेहमीं घडतें. मायनारच्या खाडींत हे धरून त्यांचें तेल काढितात आणि तें बाहेर विकावयास पाठवितात. ह्यांची त्वचाही उपयोगी पडते.

**करवत्यामासा**.—हें नांव पडण्याचें कारण त्याच्या शेंपटीचा आकार कांहींसा करवतासारिखा असतो. त्याची लांबी बारापासून पंधरा फुट असते. हे बेटाच्या पूर्व किनाऱ्यावर आहेत.

**अग्निमासा**.—ह्मणून एक जात आहे. त्याचा वर्ण ज्वालेप्रमाणें लाल असतो. ह्याप्रमाणें तांबडे, शेंदरी, हिरवे, पिंवळे, इत्यादि सर्व रंगांचे मासे येथें मिळतात. हे पाहण्यास मोठे मनोहर आहेत. गोड्यापाण्याचे मासे

ह्मणून एक जात आहे, व त्याचे पोटभेद अनेक आहेत. हे नद्यांत आणि सरोवरांत राहतात.

कांहीं मासे जमीनीवरून पर्यटन करितात. खाड्या, नद्या, किंवा सरोवरें ह्यांतील पाणी आटलें ह्मणजे तीं स्थलें सोडून ते जेथें पाणी असेल त्या स्थलीं जातात. हे रात्रीं किंवा चांगल्या पहांटेस, जेव्हां गवतावर दंव पडलेलें असतें, त्या वेळीं प्रवास करण्यास बाहेर पडतात. पण केव्हां केव्हां दोनप्रहरींही ते प्रवासास निघालेले दृष्टीस पडले आहेत. माशास कांहीं कालपर्यंत उदकाशिवाय राहतां यावें अशी सृष्टिकर्त्यानें त्यांच्या शरीररचनेंत तजवीज करून ठेविली आहे. आपल्या देशांत भागीरथीच्या कांठचे नावाडी मासे धरून त्यांस मातीच्या कोरड्या लोटक्यांत पांच सहा दिवस ठेवितात, आणि लागतील तसे खर्चास काढितात. तेव्हां धरल्या दिवसाप्रमाणें ते टवटवीत व चपल असतात. लंकेंत कानिया ह्मणून उन्हाळा आहे, त्यांत जिवंत मासे सांपडले होते. ह्या उन्हाळ्याची कथा पुढें येणार आहे.

कांहीं मासे आपणास पुरून घेतात. सरोवरांतील किंवा पाणथळ जाग्यांतील पाणी आटलें ह्मणजे हे मासे त्या स्थळांतील गाळांत खालीं जाऊन राहतात आणि पाऊस पडला ह्मणजे वर येतात असा कांहीं लोकांचा तर्क आहे; व कांहीं अशी कल्पना करितात कीं त्या स्थलाच्या गाळांत त्यांनीं अंडीं घातलेलीं असतात; त्यांस पाऊस पडून ओलावा पोहोंचला ह्मणजे त्यांचे जीव बनून पुनः दिसूं लागतात. उड्डाण करणारे मासे

हे त्रिंकोमालीजवळ खडक आहेत त्यांवर लाटा बडवितात तेथें चढून जातात आणि तेथून खालीं उडी घेतात.

माशाविषयीं मोठा चमत्कार वाटण्यासारखी अशी माहिती समजते कीं, दक्षिण अमेरिकेंतील ज्वालामुखींतून मासे बाहेर पडतांना पाहण्यांत आले आहेत. ह्यावरून ईश्वरकरणी अगाध आहे ह्मणतात ती गोष्ट अगदीं बरोबर आहे; आणि ढगांतून मासे पडतात असा जो समज आहे त्यांत तर नवल मानण्यासारखें कांहीं नाहीं. ह्या बेटांत ब्यातिकेलोजवळ गाणारे (बारीक नाद करणारे) मासे आहेत. अशा प्रकारचा नाद मुंबईबंदरांतही ऐकूं येतो. पण तो माशांपासून उत्पन्न होत नसून एक जातीचे सजीव शंख आहेत; त्यांपासून होतो असें ह्मणतात.

---

## भाग अकरावा.

### मौक्तिक.

ह्या द्वीपाच्या उत्तर किनाऱ्यावर मोत्यांचे शिंपले सांपडतात. मानारचें आखात प्राचीन कालापासून मोत्यांकरितां प्रसिद्ध आहे. येथें त्यांच्या शोधाकरितां पृथ्वीवरील लोक येत. अर्काटचा नबाब येथील मोत्यांत आपणास भाग मिळावा ह्मणून हक्क सांगे. अरीपुव व कोंदची ह्या दोन गांवांमधील किनाऱ्यावर मोत्यांच्या शिंपल्यांचे ढिगांचे ढीग पडून तो उंच झाला आहे. हे शिंपले लोकांनीं मोतीं काढून घेऊन टाकलेले आहेत.

हे कांचेसारखे शुभ्र असतात, आणि खिडक्यांस तावदानाच्या जागीं, चीनदेशांत व अन्यत्र ह्यांचा उपयोग करितात. त्रिंकोमाली उपसागराच्या पश्चिमेस तांब्लेगो सरोवरांत मोतीं सांपडतात. पण तीं लहान असतात. हें सरोवर सांप्रत उथळ झालें आहे. ह्याचा परीघ वीस मैल आहे. ह्याचें पात्र हें पूर्वकाली भात लागण करण्याची जमीन होती.

मोतीं सांपडण्याचा हंगाम दरसाल येतो असें नाहीं. मध्यें वर्षांचीं वर्षें खांडवे पडतात. इ० स० १८३८ पासून इ० स० १८५४ पर्यंत पंधरा वर्षांचा खांडवा पडला होता. दचलोकांच्या कारकीर्दीत एकदा २७ वर्षें खांडवा पडला होता. हा हंगाम बहुतकरून मार्च व एप्रिल या दोन महिन्यांत येतो. दोन महिन्यांत हें काम फार तर राहून राहून तीस दिवस चालतें. या किनाऱ्यावरील प्रदेश रुक्ष असून तेथें नेहमीं वस्ती नसते. हंगाम आला ह्मणजे हंगामी घरें व झोंपड्या बांधल्या जातात. बाजार भरूं लागतो. हजारो होड्या व पानबुडे जमतात व एक गांव वसतो.

मोतीं उत्पन्न करणारे जीव ज्यांस इंग्रजींत (आइस्तर) ह्मणतात; त्यांविषयीं पुस्तकद्वारें आह्मांस कांहीं मौजेची माहिती मिळते ती थोडीशी आमच्या वाचकांच्या मनोरंजनार्थ येथें देतों. हे जीव स्थलांतर करितात असा तर्क आहे. महमद ऑफ् गिजनीच्या वेळीं हे प्राणी या द्वीपांतून निघून आफ्रिकाखंडांत सोफालाच्या खाडींत गेले असावेत, कारण ज्या वेळीं मानारच्या अखातांत मोतीं सांपडेनाशीं झालीं त्याच सुमारास सोफाला

येथें सांपडूं लागलीं. **फ्रान्सदेशच्या** दक्षिण किनाऱ्यावर पूर्वीप्रमाणें मोतीं सांपडत नाहींत; करितां ते जीव पूर्वस्थलीं आणण्याचा किंवा त्यांची पुनः वसाहत करण्याचा उद्योग चालू आहे आणि तो सफल होण्याचीं चिन्हें दिसत आहेत. याच नमुन्यावर **लंकाद्वीपांत**ही कांहीं यत्न चालू असून त्यास थोड्या वर्षांत यश येण्याचा संभव दिसत आहे. याचें नांव पाश्चात्य उद्योग; नाहीं तर आमच्या देशाकडे पहा, सर्वच आनंद. असो.

मोत्यांचे शिंपले ( आइस्तर ) बुडून काढणारे लोक **तामिळ** किंवा **मूर** जातीचे असतात. सुसरी किंवा दुसऱ्या जलचरांनीं आपणास गिळूं नये ह्मणून हे लोक त्यावर मंत्र घालितात; आणि अंगास काळा रंग लावितात. ही गोष्ट चमत्कारिक आहे, कीं या प्राण्यांपासून पानबुड्यांच्या शरीरास अपाय झाल्याचें उदाहरण घडलेलें नाहीं. पानबुडे नावेस दोरी बांधून तिच्या शेवटास एक फांस तयार करितात. तळास लवकर जातां यावें ह्मणून पक्के पंधरा शेर वजनाचा दगड जवळ घेतात. शिंपले गोळा करून आणण्याकरितां त्यांच्याजवळ जाळीदार एक टोपली असते. **इराणच्या** आखातांतील पानबुडे तेलांत भिजविलेले कापसाचे बोळे कानांत घालितात, तसें हे करीत नाहींत. हे लोक आपला श्वास आंत ओढून घेऊन नाकपुड्या दाबून धरितात, आणि फांसावर पाय देऊन जलदी तळास जातां यावें ह्मणून मोठी उशी घेऊन एकदम बुडी मारितात. तळीं गेल्यावर पालथे पडून ते टोपलींत मिळतील तितके शिंपले मोठ्या आनंदानें भरतात. पुढें खूण झाली ह्मणजे त्यांस

वर ओढून घेतात. हे लोक फार तर एक मिनिटपर्यंत तळाशीं राहूं शकतात, आणि सुमारें साठसत्तर हात खोल जातात.

आतां जे शिंपले सांपडतात त्यांची विल्हेवाट कशी करितात हें सांगून हें प्रकरण पुरें करितों. जे शिंपले सांपडतात त्यांतील एक चतुर्थांश पानबुड्यास त्याच्या मजुरीबद्दल देतात. बाकी तीन चतुर्थांश राहतात ते सरकारचा वांटा. पुढें हे निवडून त्यांच्या प्रति लावितात; आणि हजारानें विकतात. उत्तम जातीच्या शिंपल्यास दर हजारीं सुमारें एकशें तीस रुपये निदान येतात, आणि कनिष्ठ प्रतीच्यांस बेवीस रुपये येतात. सांप्रत पूर्वीप्रमाणें मौल्यवान् मोतीं देणारे शिंपले सांपडत नाहींत. तथापि गेल्या कांहीं वर्षांत जे शिंपले सांपडले त्यांची संख्या, त्यांचा हजारीं भाव, आणि उत्पन्नही खालीं देतों. त्यावरून सरासरीच्या मानानें या बाबीपासून सरकारास एक लाख रुपयांवर उत्पन्न येतें असें स्पष्ट दिसून येणार आहे.

| वर्ष. | शिंपल्यांची संख्या. | दरहजारीं रु०. | आकार रु०. | दि०. |
|---|---|---|---|---|
| इ.स.१८५५ पासून इ.स. १८६३पर्यंत. | ५६४५१००० | २१॥ रु.पासून १२९रु.पर्यंत. | १९१३००० | १९ |

हा नऊ वर्षांचा हिशेब दिला. यांत इ० स० १८५६ इ० स० १८६१व६२ हीं वर्षें रिकामीं गेलीं.

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| इ. स. | १८७४ | १२७५७०० | ७९ | १०१००० | १५ |
| इ. स. | १८७७ | ५१३७००० | ५२ | १८९००० | १५ |

हा हिशेब पानबुड्यांचा चौथा वांटा सोडून दिला

आहे. ह्या कामीं पुष्कळ होड्या लागतात. इ० स० १८७७ ह्या वर्षीं १९२७ होड्या लागल्या होत्या. हें उत्पन्न वाढत जाण्याचा पुष्कळ संभव आहे ह्मणून पूर्वीं सांगितलें आहे. त्रिंकोमालीजवळ तांब्लेगाम सरोवरांतून इ० स० १८७४ व्या वर्षीं दहा हजार रुपयांपेक्षां अधिक किंमतीचीं मोतीं पैदा झालीं.

---

## भाग बारावा.

### सरोवरें.

येथील सरोवरें एवढीं भव्य आणि विस्तीर्ण आहेत कीं मध्य इजिप्त येथील मिसरी नांवाचा तलाव खेरीज करून ह्यांची बरोबरी करणारा दुसरा कोणताही नाहीं. द्वीपाच्या उत्तरेकडील भागांत हल्लीं वस्ती फार कमी आहे. पूर्वकालीं येथें मोठीं शहरें होतीं, आणि प्रत्येक लहानमोठ्या गांवास एक तरी तलाव असे. हे एवढे विस्तीर्ण व भव्य आहेत कीं त्यांस लहानसे समुद्र ह्मणण्यास हरकत नाहीं. ह्यांपैकीं थोडे सृष्टिजन्य आहेत. पण बहुतेक कृत्रिम आहेत. हीं सर्व सरोवरें मोडकळीस आलीं आहेत; आणि कांहींच्या तर खुणा मात्र दृष्टीस पडतात. तत्राप ह्यांचे जे भाग अवशिष्ट राहिले आहेत ते द्वीपाचें प्राचीन महत्त्व दाखवितात. ह्यांतील कांहींनीं हजारों एकर जमीन व्यापिली आहे. त्यांतील कांहीं विशाल सरोवरांचें वर्णन देतों. अनुराधपुराजवळ कालवेवा किंवा कालवापी ह्मणून मोठें विशाल सरोवर आहे. अजमीर येथील कृत्रिम तलाव, ह्मैसूर येथील हैदराचा

तलाव, आह्मी पाहिले आहेत; पण येथील तलावांच्या पुढें ते कांहीं नाहींत. हा तलाव दत्तसेन राजानें ...ला- ओया नदीस आडवें धरण बांधून तयार केले त्याचा परीघ ४० मैल आहे, आणि त्यांतून लांबीचा एक कालवा नेलेला होता. ... प्रसिद्ध शहर याच्याच जवळ आहे. ओस पडलें आहे.

विंतेन प्रांतांत होराबोरा नांव तीन च्यार मैलांच्या अंतरावर ... ७० फूट उंचीचें एक धरण ... त्याची लांबी आठ नऊ मैल व... आहे. ह्यांत बारीक मोतीं सांपडत सुसरी पडलेल्या असतात. ... जंगी सरोवर द्वीपाच्या ईशान्येस चौदा मैल आहे. ह्यांतून नदीसारखा एक ... वीस मैल लांबीचा निघून कोकिल ... तलावांत जातो. पाटाच्या तळची रुंदी दोनशें ... आहे. त्याच्या दोनी बाजू टाकी लावलेल्या चवथऱ्यांनं ...ून काढल्या आहेत. हा तलाव बांधण्यास एक कोट तीस लक्ष रुपये खर्च लागला असावा असा अजमास केला आहे. यान-वर एक ग्रंथकर्त्ता असें ह्मणतो कीं, एवढ्या रकमेंत १२० मैल आगगाडीचा रस्ता तयार झाला असता. असे जंगी खजिने द्वीपांत पंचवीस तीस असून मध्यम प्रतीचे तलाव पांच सातशें आहेत.

वरील प्रदेशांत पान्तिजनकूर्णी नांवाचा एक विस्तीर्ण तलाव आहे. या स्थलीं पूर्वी राजवाडा होता, पण

समुद्र वाढून तो बुडाला आणि त्या जागीं हा तलाव झाला अ इतकथा आहे. येथें मीठ उत्पन्न केलें असतां शे- ी होणार आहे. येथून जवळ आरीपुवाच्या राक्षस नांवाचें एक सरोवर आहे. ह्यांतील ंत एक मोठी मौज दृष्टीस पडते, ती अशी तील किंवा सरोवर आणि समुद्र ह्यांतील खेळत असतें. अशा मासल्याचा को- लाव आहे. हा किती रम्य असेल नें. याचा परीघ वीस मैल आहे. पिकविण्याचें रान होतें. पिदि- र खजिन्यांतून यास पाण्याचा पुर- र सांगितलेंच आहे. पण पाणी ने झाले, आणि त्यास बांधलेले धक्के फुटून खालच्या जमीनीवर पूर येऊन ते मुद्रास मिळाला. समुद्राचें ही पाणी तला- वांत जाऊ सागरबावांनीं एकवार पाऊल आंत टाकिलें तो मासा गुंडाळलाच नाहीं. आतां समु- द्रास भरती ओहटी आली ह्मणजे ह्यांतील पाणी चढूं किंवा उतरूं लागतें.

तोपेरे येथून एक मजलेच्या अंतरावर मिनेरी नां- वाचें सरोवर आहे. याचा परीघ वीस मैल आहे. हें महासेन राजानें बांधिलें. काराअंगा नदीस मोठें धरण बांधून हा तयार केला आहे. ह्यांतील पाण्याचा पाट महावेली गंगेस जाऊन मिळतो. ह्याच्या पाण्यानें वीस हजार शेतें पिकत होतीं. सांप्रत हा तलाव अगदीं मो- डकळीस आला आहे. येथील देखावा मोठा शोभा-

चमत्कारिक आणि रमणीय आहे. थोड्या वर्षांपूर्वीं येथें हत्ती, रानरेडे, हरणें इत्यादि श्वापदांचे कळपांचे कळप दृष्टीस पडत; त्यामुळें शिकारी लोकांचें हें मोठें आवडतें स्थान होतें. सांप्रत बहुतेक तलाव अगदीं मोडकळीस आलेले आहेत. त्यांच्या पात्रांत व भोंवतीं इमारती लांकडांचे व दुसरे वृक्ष उगवून दाट झाडी माजली आहे. त्यांत नानाप्रकारचीं श्वापदें आणि पक्षी दृष्टीस पडतात. हीं सरोवरें बौद्ध धर्मी भिक्षुकांचें उपजीवन होण्याकरितां तेथील राजांनीं बांधिलीं होतीं. यांच्या पाण्यानें हजारों खंडी भात पिकून लक्षावधी लोकांचा निर्वाह होत होता. कांहीं सरोवरें थोड्या खर्चानें दुरुस्त होण्यासारखीं आहेत आणि त्यांच्या दुरुस्तीकडे सरकारचें लक्ष लागलें आहे.

---

## भाग तेरावा.

### मीठ.

त्रिंकोमालीजवळ निलावेली म्हणून एक मोठें व प्रसिद्ध मिठागर आहे. येथें कारण पडल्यास पांचलक्ष बुशल म्हणजे पंचवीस हजार खंडी मीठ दरसाल उत्पन्न होणारें आहे. पण सांप्रत यापैकीं निमे सुद्धां उत्पन्न करीत नाहींत. याच्या उत्तरेस थोडे मैलांवर कुचवेली नांवाचें खेडें आहे, तेथें व दुसऱ्या अनेक ठिकाणीं मीठ उत्पन्न होतें. त्यांतील मीठ आपल्या देशांतील सर्व लोकांस पुरें होईल; पण आपल्या देशावर राज्य करणारी मक्तेदारीण कंपनी होती, ती मोठी धनलोभी असल्यामुळें तिनें आपली थैली गच्च भरावी म्हणून ह्या द्वीपांतील

मिठागरें बंद ठेविलीं. आमच्या देशांतील सर्व मिठाग-रांचा गुत्ता आपले हातीं घेऊन मिठावर जबर कर बस-विला. पुढें बादशाहिणीच्या अमलांत याजविषयीं कांहीं विचार होईल ह्मणून आशा होती, पण ती ही व्यर्थ झाली. देशांत मीठ फार महाग झाल्यामुळें लोकांवर त्याचे किती वाईट परिणाम होत आहेत हें सर्वांस मा-हितच आहे. ह्या द्वीपांत मीठ वर्षांतून चार वेळ पिक-वितां येतें, आणि तें चांगलें स्वच्छ असतें.

---

## भाग चवदावा.

### जनावरें व दुसरे जीव.

सर्व भूचरांत अतिप्रचंड प्राणी ह्मटला ह्मणजे हत्ती होय. पण अति सूक्ष्म कोणता हें सांगणें मात्र कठीण आहे. धन्य त्या जगन्नियंत्याच्या लीलेची. अतिप्रचंड प्राण्यांस जे देह धर्म लावून दिले आहेत, तेच अतिक्षुद्र जीवांसही लाविले आहेत. असो. सिंह, गेंडा, आणि उंट हे शिवाय करून आपल्या देशांत जे पशु आहेत ते लंकेंत विपुल ह्मणजे त्यांचे मोठे कळप दृष्टीस पड-तात. कळप ह्या शब्दाचा अर्थ थोडा विस्तीर्ण समजला पाहिजे. आपल्या देशांत पांचपंचवीस पशु एकत्र दृ-ष्टीस पडले ह्मणजे त्यास कळप ह्मणतात, परंतु ह्या द्वीपांत हत्ती, रानरेडे, डुकरें किंवा दुसरे पशु यांचा क-ळप ह्मटला ह्मणजे त्यांची गणना शेंकड्यानें करावी ला-गते. येथें चांगल्या जातीचे घोडे निपजत नाहींत. ते आपल्या देशांतून किंवा इराणांतून नेतात. सर्व पशूंत

हत्ती हा श्रेष्ठ आणि ह्या द्वीपांतील हत्तीची प्रसिद्धि फार प्राचीनकाळापासून आहे, करितां त्याविषयीं पुढें वेगळेंच वर्णन देण्याचें योजिलें आहे. ह्याशिवाय मुख्य वनपशु ह्मटले ह्मणजे वाघ, चित्ता, रेडा, अस्वल, डुकर, हरिण, वानर इत्यादि होत.

येथें जमिनींत ओलावा फार असल्यामुळें उंटाच्या पायांस व्रण पडतात आणि हवा न मानून ते मरण पावतात. येथें ते बहुतकरून दृष्टीस पडत नाहींत. वंगालीवाघ त्रिंकोमालीजवळ आढळत ह्मणून लेख आहे. द्वीपाच्या उत्तर व पूर्वभागीं जेथें नद्या व ओडकळीस आलेले तलाव आहेत, तेथें रानरेड्यांचे कळप दृष्टीस पडतात. शिकारी लोक रेडे तयार करून त्यांचा शिकारीच्या कामीं मोठा खुबीदार उपयोग करितात. पक्षी रेड्यास भीत नाहींत. ते त्यांच्या पाठीवर जाऊन बसतात. शिकारी मनुष्याच्या इशारतीप्रमाणें जेथें पक्ष्यांचा कळप असेल तिकडे तो चरत जातो आणि शिकारी त्यास आड करून पुढें जातो आणि पक्षी गोळीच्या टप्यांत आले ह्मणजे बार काढून त्यांस मारितो.

येथें चित्ते पुष्कळ आहेत. त्यास मनुष्याच्या रक्ताची गोडी लागली नसेल तर त्याचा नाश करीत नाहींत. तांदुळाच्या शेतांचा हत्ती येऊन नाश करितात. त्यास हुसकून लावण्याकरितां थोड्या वर्षांपूर्वीं ब्याटिकेलोजवळ दोन रखवालदार झाडावर बसविले होते. तेथें चित्ता येऊन त्यानें एकामागून एक ते खाऊन टाकिले. शिकारी कुत्र्यांवर त्यांची फार करडी नजर असते. चित्ता, रानडुकर, अस्वल इत्यादि पशु पाहून मनुष्यास भीति

वाटते, पण मनुष्याच्या नेत्रकटाक्षाची कडी मोठी कडक आहे. त्यास पाहून सर्व पशु भितात. सिंहलीलोक अस्वलांस फार भितात, कारण ते वारंवार येऊन त्यांच्या भाताच्या शेतांचा नाश करितात. त्यांस मध व तांबड्या मुंग्या फार आवडतात. तीं द्वीपांत रगड मिळतात. येथें पांच सहा फूट लांब व एक फुट जाड एवढी मोठी मण्याची पोळी असते.

येथील नीच प्रदेशांत कोल्ह्यांचे कळप दृष्टीस पडतात. क्वचित् एकाद्याच्या डोक्यावर अर्ध इंच लांबीची शिंगासारखी बाहेर आलेली कलगी असते. तिजवर केस आलेले असतात. हें शृंग कळपांतील मोहरक्याच्या मात्र डोक्यावर असतें असें ह्मणतात. यास सिंहलीलोक आरलेल्या ताइताप्रमाणें मानितात. हें शृंग ज्याच्या जवळ असेल त्याच्या सर्व इच्छा सिद्धीस जातात असा त्यांचा समज आहे. त्यांचा आणखी असा विश्वास आहे कीं पांढरा कावळा, प्याडीपक्ष्याचें घरटें, नारळीचें सरळ झाड किंवा मृतवानर ज्यानें पाहिलें आहे तो चिरायु होईल. येथें पुष्कळ जातींचे वानर आहेत, ते कळप करून राहतात. जमिनीवरील उड्डाणापेक्षां वृक्षांच्या फांद्यांवरून जीं उड्डाणें ते मारितात, तीं पाहून मोठी मौज वाटते. द्वीपाच्या उत्तर भागांत जवादी मांजरें पुष्कळ आढळतात. त्यांपासून कस्तूरी उत्पन्न होते ह्मणून लोक त्यास पिंजऱ्यांत घालून बाळगितात.

द्वीपांतील पशूंविषयीं थोडेंसें वर्णन दिलें. आतां येथील दुसऱ्या जीवांविषयीं कांहीं मौजेची माहिती मिळते ती देऊन हें प्रकरण पुरें करितों. इंग्रजींत ज्यास

( बवा ) ह्मणतात, ते प्रचंड सर्प कांहीं भागांत आढळतात. त्याची लांबी बारापासून पंधरा हात असते. ते एवढे मोठे असतात कीं केव्हां केव्हां हरिणास गिळून टाकितात. हे सर्प जावाबेटांत पुष्कळ आहेत. थोरांचें सर्वत्र थोर. या ह्मणीप्रमाणें येथील सरड, भिलोरी, आणि काजवे हीं पाहून मन थक्क होतें. सरडाची लांबी चारपासून सहा फूट असते. या प्राण्यांत ईश्वरानें असा चमत्कार ठेविला आहे कीं त्याचा एक भाग अगदीं निद्रित असतां दुसरा भाग जागृत असतो, आणि उजवा भाग हिरवा दिसत असला तर इकडे डावा तांबडा दिसतो. येथील भिलोरी मांजराएवढ्या मोठ्या व चमत्कारिक रंगाच्या आहेत. तसेंच अस्तमान झाल्यावर काजवे चमकूं लागतात ते देखील दोन तीन इंच लांब असतात.

---

## भाग पंधरावा.

### सुसरी.

हे प्राणी द्वीपाच्या उत्तर भागांतील शांतजलाशयांत आणि तळावांत पुष्कळ आहेत. क्यालिकेलो आणि आरीसुव येथील तळावांत व अन्य पाणथळ प्रदेशांत यांचे थव्यांचे थवे दृष्टीस पडतात. येथील सुसरी मोठ्या दांडग्या आहेत. त्यांची लांबी सोळांपासून अठरा फुट असते. क्षुधेनें पीडित असतात तेव्हां त्या मनुष्यावर चाल करून जातात आणि त्यास गिळून टाकितात. तिच्या छातींतून कर्णरेषेनें गोळी गेली तर तिला इजा होत नाहीं. गोळी लागली ह्मणजे हालचाल बंद होऊन ती डोळे झांकून मेल्यासारखी पडते. पण भाल्यानें डि-

वचली ह्मणजे लगेच चपळाई दाखविते. सरोवरांतील पाणी आटलें ह्मणजे सुसरी माशांप्रमाणें तेथील गाळांत आपणास पुरून घेतात आणि पावसाळ्यांत पाणी आलें ह्मणजे पुनः वर येतात किंवा दुसऱ्या जलाशयाच्या शोधार्थ जंगलांतून फिरतांना दृष्टीस पडतात. त्यांचे पाय नाजूक असल्यामुळें खडकावरून किंवा कठीण मार्गावरून त्यांस जातां येत नाहीं; पण वाळूवरून किंवा मऊ चिखलावरून त्या जलदी पळतात.

सुसरीची पचनशक्ति चांगली नाहीं ह्मणून ती ताजा भक्ष गिळीत नाहीं. तो कोठें तरी दडवून ठेवून कुजला ह्मणजे खाते. तिच्या कोठ्यांत कांसव, वाळू, विटाचे तुकडे इत्यादि सांपडतात. आपल्या पचनशक्तीस जोर यावा ह्मणून ती विटांचे तुकडे व वाळू खाते, असा तेथील लोकांचा समज आहे. सियामदेशांत तिचे मासाची खाण्याकरितां विक्री करितात. तिचे दांत एवढे मोठे असतात कीं ते रुप्यांत बसवून त्यांच्या चुनाळ्यास झांकण्या करितात. एक इंग्लिशकामगार तंबू देऊन त्यांत निजला असतां त्याचा बिछाना खालून हालूं लागला, तेव्हां पाहूं लागला तों तंबूंतील चटईखालीं एक मोठी सुसर त्याच्या दृष्टीस पडली. ह्या बेटांत एक अपूर्व प्राणी दृष्टीस पडतो, त्याजविषयीं थोडेंसें वर्णन येथें देतों. मानारच्या किनाऱ्यावर ज्यास इंग्रजींत डुगांग ( जलमाणूस ) ह्मणतात तें जनावर दृष्टीस पडतें. याची आकृति अगदीं मनुष्यासारखी दिसते. पोर्तुगीज लोकांनीं हें फाडून पाहिलें तेव्हां त्याची आंतील रचना मनुष्याप्रमाणें दिसली.

## भाग सोळावा.

### हत्ती.

द्वीपाच्या बहुतेक भागांत जेथें झाड पाला, पाणी व सावली हीं विपुल आहेत, तेथें हत्तींचे लहानमोठे कळप दृष्टीस पडतात. बंगाल्याकडील व दक्षिण हिंदुस्थानांतील व आफ्रिकाखंडांतील हत्ती व हत्तिणी ह्यांस दांत असतात, पण येथील हत्तींस बहुतकरून नसतात. एकाद्यास असले तर तो नर असतो. ह्यांजविषयीं असा तर्क करितात कीं येथें नद्या व प्रवाह पुष्कळ असल्यामुळें येथें उदक विपुल आहे, आणि आफ्रिकाखंडांत तें फार दुर्मिळ आहे. तें मिळविण्यास वालुकामय प्रदेशांत त्यांस कुवे खणावे लागतात; यास्तव तेथील हत्तींचे दांत समूर व भरींव असतात. लंकेंतील हत्तींचे दांत बारीक, नाजूक आणि वांकडे असतात. हा तर्क दिसण्यास बरा आहे.

हस्तीशिल्पनांवाचा एक ग्रंथ सिंहलीभाषेंत आहे. त्यांत हत्तीचीं सुलक्षणें व दुर्लक्षणें सांगितलीं आहेत. त्यांतील कांहीं माहिती आह्मी येथें देतों. हत्तीच्या पायांच्या नखा वीस असाव्या. कातडें मऊ असून त्याचा वर्ण ताडीच्या वृक्षासारखा असावा. तोंड व जीभ यांचा वर्ण तांबडा; कपाळ विस्तृत असून थोडें वसकें असावें. कान मोठे व सूर्पाकार असावेत. शुंडा बुडख्यांत रुंद असून तिच्या पुढच्या भागावर तांबड्या व पांढऱ्या रंगाचे चकले असावेत. डोळे पाणीदार व प्रेमळ, गाल मोठे, मान भरींव व पाठ सपाट असावी. छाती चौको-

णी, पुढील पाय अंखूड व कूर्म पृष्ठाकार असावेत. मागील भाग ( पुठा ) भरदार, पांचही नख्या मऊ, जिव्हाई दिल्याप्रमाणें साफ व वाटोळ्या असाव्या.

वाईट हत्तीचे नेत्र कावळ्यांच्या सारखे चंचल असतात. डोक्यावरील केशांचा वर्ण मिश्र, चेहेरा सुरकुतलेला, आणि लहान, जिव्हा वक्र व काळसरवर्णाची, नख्या आंखूड व थोड्या हिरवट; शेंपटास गोंडा नसतो. कान लहान, मान बारीक, आणि त्वचा सुरकुतलेली; आणि पुढील भाग कृश व बसका असतो.

हत्तीस चांगलें ज्ञान असतें. शिकविलेले हत्ती ओझीं वाहण्याच्या आणि पूल, घरें व देवालयें बांधण्याच्या, व जंगल साफ करण्याच्या कामीं मोठी मदत करितात. मनुष्य आपल्या कामांत जशी हुशारी आणि अक्कल दाखवितो त्याप्रमाणें हत्ती दाखवितो. त्याच्या ज्ञानाविषयीं गोष्टी लोकांत माहितच आहेत. पर्वतावरून मोठ्या बिकट वाटेनें वर चढणें किंवा खालीं उतरणें झाल्यास, किंवा घनदाट झाडींतून खोल दरे ओलांडून जाणें असल्यास इंजिनियर लोक रस्ता नेण्याकरितां जशी चळणानें त्यावरून वाट शोधून काढितात, त्याप्रमाणें चांगला सुरक्षित मार्ग असेल तो हत्तीस शोधून काढितां येतो. आदाम्सपीकावर जाण्याचा मार्ग मोठा बिकट आहे, पण हत्ती त्यावर चढून खालीं उतरूं शकतो. त्याची सोंड हेच त्याचे हात व बाहु होत. त्याचें नाक त्याच्या हातांत असतें आणि तो हातानें श्वासोच्छ्वास टाकितो असें ह्मटलें असतां चालेल.

जेव्हां हत्तींचा कळप दृष्टीस पडतो तेव्हां तो कळप नसून एक कुटुंब असतें असें मानिलें पाहिजे; कारण एका कुटुंबांतील भावंडाचा तोंडवळा सारखा असतो, त्याप्रमाणें कळपांतील हत्तींच्या शुंडा, नेत्र, दंत इत्यादि अवयवांचें वळण सारखें दृष्टीस पडतें. पाणी पिण्यास किंवा चरावयास जाण्यास कांहीं कळप एकत्र जमतात, पण एकादी भयसूचना होण्याबरोबर जो तो आपआपल्या कळपांत ( कुटुंबांत ) जाऊन मिळतो. ह्या कुटुंबांत नराची संख्या फार कमी असते, कारण शिकारी लोक त्यांची नेहमी कत्तल उडवितात. वयानें व शरीरानें सर्वांत मोठा असून जो शक्तिमान् असतो त्यास कुटुंबाचा मुख्य करितात, आणि सर्व त्याच्या हुकुमांत राहतात. मोठी हिमतीची व शक्तिमान् हत्तीण ही केव्हां केव्हां कळपांत मुख्य असते. लहान पिलें व आया कळपाच्या मध्यभागीं राहतात.

ह्या कुटुंबाच्या एकोप्याविषयीं एक मोठी मौजेची गोष्ट आहे. ती अशी कीं, जर एकादा हत्ती आपल्या कळपांतून फुटून बाहेर गेला आणि दुसऱ्या कळपांत शिरूं लागला, तर त्यांतील सर्व हत्ती मिळून त्यास आपल्या गंडस्थळांनीं धक्के मारून बाहेर घालवितात, पुढें त्यास आपल्या कळपांत कोणी घेईनासें झालें ह्मणजे तो एकलकोंडा होऊन राहतो. एकलकोंडा होण्याचें आणखी एक कारण असें आहे कीं एकाद्याची स्त्रिया कोणी उपटून नेली किंवा मरण पावली असतां दुसरी मिळविण्यास तो आपला कळप सोडून दुसऱ्यांत शिरूं पहातो. पण वर सांगितल्याप्रमाणें त्यास आपल्या

कळपांत कोणी घेत नाहीं; असें झालें म्हणजे त्रासून तो एकलकोंडा होतो. एकलकोंड्या मनुष्याप्रमाणें एकलकोंडा हत्ती मोठा रागीट आणि तिरसट असतो. अशा हत्तीपासून मनुष्याच्या जिवास जितकी भीति आहे तितकी साऱ्या कळपापासून नसते. हत्तींत माद्रीविषयीं भांडण लागतें, आणि त्यांत ज्या नराचा पराजय होईल त्यास सर्व मिळून हांकून देतात. तेव्हां तो आवेशास चढून इतका बेफाम होतो कीं, त्या आवेशांत मनुष्य किंवा दुसरा पशु त्याच्या पुढें आला असतां त्याजवर चालून जाऊन त्याचें चंदन करितो. अशीच गोष्ट मस्त रेड्याविषयीं सांगतात.

लंकेंतील हत्ती आपल्या देशांत येऊं लागल्यास सुमारें एकवीसशें वर्षें झालीं असें कळतें. मोठ्या हत्तीचें वजन सहा सात खंडी असतें. द्वीपांतील हत्तीची उंची सुमारें नऊ फूट असते. जबलपूर येथें हत्तीचा एक सांपळा सांपडला होता, त्यावरून त्याची उंची पंधरा सोळा फूट असावी असा अजमास केला होता. आफ्रिकाखंडांतील हत्तीच्या दांताचा परीघ अडीच फूट असतो आणि त्याची लांबी आठ फूट असते. तो वजनास ७५ पासून १५० पक्के शेर भरतो. लंकेंतील हत्तीच्या दांताचें वजन पंचवीसपासून तीस शेर असतें. हत्ती नारळीचीं लहान झाडें व बागांतील केळी आणि दुसरीं झाडें, व तांदुळांचीं शेतें ह्यांजवर रात्रीं हल्ला करून त्यांचा नाश करितात. भातांच्या शेतांचा खाण्यापेक्षां तुडवून अधिक नाश करितात. असोला नारळ फोडून तो कसा खातो, हें पहाणें मोठी मौज आहे. तसेंच तयार केलेला हत्ती

जमीनीवरून किंवा चिखलांतून लहान नाणें शुंडेनें वर उचलून घेण्यांत आणि ती वर करून तें आपल्या महातास देण्यांत मोठें चातुर्य दाखवितो. प्राचीनकालीं लोक हत्ती-वर बसून लढाया करीत.

व्यापाराकरितां जे हत्ती धरितात त्यांची घडामोड कशी होते, याजविषयीं थोडीशी माहिती देतों. दर एक हत्ती शिकार करून मारण्यास किंवा धरण्यास सरकारास दहा रुपये कर द्यावा लागतो व बेटाच्या बाहेर नेणें असल्यास दोनशें रुपये द्यावे लागतात. इ० स० १८७४ सालीं, ७७ हत्ती परदेशीं पाठविण्यांत आले, त्यांतील जापनेहून आपल्या देशांत ६७ आले; ग्याली बंदराहून अमेरिकेंत दोन व कोलंबो येथून युनायतेदस्तेत्सचे राज्यांत आठ गेले. या सर्वांची किंमत सुमारें चाळीस हजार रुपये होती. हस्तिदंताचाही व्यापार मोठा चालतो. सर्व ठिकाणांहून एक ग्रेतब्रितन येथें दरसाल पांच लक्ष हस्तिदंत जातो, तेथील लोक आफ्रिकेंतील दंत पसंत करितात आणि चिनांत लंकेंतील हस्तिदंत अधिक पसंत करितात.

---

## भाग सतरावा.

### शिकार.

[illegible] करणें हें निंद्य आहे अशा बुद्धीनें विचार केला असतां शिकार ही मोठी दोषार्ह मानितात; तथापि तिजपासून मनास करमणूक आणि शरीरास चांगला व्यायाम होऊन वनांतील पशुपक्ष्यांचें ज्ञान होण्यास ती

एक मोठें साधन आहे. लंकाद्वीपांत शिकारीस अवश्यक जे प्राणी ह्मणजे हत्ती, चित्ते, रानरेडे, डुकरें, अस्वल, हरीण, ससे आणि नानाप्रकारचे पक्षी इतके विपुल आहेत कीं, त्यांचे कळपांचे कळप अनेक भागांत दृष्टीस पडतात. सर्व पशूंत मुख्य जो हत्ती व ज्याची शिकार ह्या द्वीपांत जशी साहस तशीच प्रधान व मोठी रमणीय असल्यामुळें तिचें थोडेंसें वर्णन येथें देतों. आपल्या महाराणी साहेबांचे उभयतां चिरंजीव व त्यांचे प्रिय नातू ह्यांनीं लंकेंत गेल्यावेळीं ही अपूर्व शिकार बुध्या करविली होती.

ह्या प्रचंड प्राण्याची शिकार करण्यांत मुख्यत्वें दोन उद्देश दिसतात. एक त्यास धरून बाळगण्याचा व दुसरा जे आपणास निःशीम शिकारी ह्मणवितात त्यांस हिंसेच्छा उपजत असते ती तृप्त करून घेण्याचा. हत्तीचा देह जसा विशाल त्या मानानें त्याचीं मर्मस्थळें अनाकुंचित असून तीं पुढल्या भागीं असल्यामुळें त्यास गोळी घालून मारण्यांत शिकाऱ्याच्या अंगीं नेम धरण्याचें विलक्षण चातुर्य लागतें असें नाहीं. बाणेदार शिकारी असतात ते हत्ती समोरून येत असतां जवळून त्यावर गोळी मारितात. ती चुकून तो पुढें चाल करून अंगावर येऊं लागला तर पुन्हा गोळी मारण्यापुरता अवकाश असला ह्मणजे पुरे होतो. मर्मस्थळीं एक गोळी लागण्याबरोबर तो नेबळा होऊन जातो. प्रसंगविशेषीं चीत होण्यास पुष्कळ गोळ्या माराव्या लागतात. येथील शिकारीलोकांचें धैर्य व चपळाई मात्र अप्रातिम असते; कारण ते हत्तीच्या मागें असल्यास त्यानें आप-

णाकडे तोंड करावें ह्मणून त्याच्या मागल्या पायांवर चांगला तडाका मारितात, आणि उलटून तो अंगावर येऊं लागला कीं लगेच त्याजवर गोळी घालतात. त्याचीं खरीं नाजूक किंवा मर्मस्थळें ह्मटलीं ह्मणजे गंडस्थल, आंख, डोळ्यावरील भागांतील खळग्या, शुंडेचा वरील भाग, आणि कानाजवळचा पुढचा भाग हीं होत. कानाचा मागील भागही नाजूक स्थल आहे असें ह्मणतात.

शिकारीलोक हत्तीच्या कळपामागें लागून त्यास खिजवितात. तेव्हां त्यांतील सर्व हत्ती एकदम येऊन त्याजवर पडत नाहींत. एकएकटा येऊन त्यांच्याशीं लढूं लागतो. ज्या जंगलांत मोठमोठाले वृक्ष असतात, तेथें हत्ती मनुष्याच्या मागें लागला असतां त्याचा मनुष्यावर कटाव चालत नाहीं; कारण मनुष्य त्या वृक्षांभोंवतीं गरगर पळूं लागतो, तसें हत्तीस फिरतां येत नाहीं; आणि मनुष्य त्याच्या सोंडेच्या तडाक्याबाहेर असला ह्मणजे त्याचा कांहीं इलाज चालत नाहीं. पण उघड मैदानांत किंवा जेथें लहान झाडें आहेत तेथें मात्र हत्ती पाठीस लागला तर मनुष्यास गांठून त्याचा चुराडा उडवून देतो. जेथें मनुष्याचें गमन नाहीं अशा एकांतस्थळीं दाट झाडींत राहण्यास त्यास आवडतें. अशा ठिकाणीं तो असतां शिकारीलोक जवळून गेले तर हालचाल न करितां असा दडून राहातो कीं त्यांच्यासुद्धां दृष्टीस पडत नाहीं.

हत्ती हा मोठा क्रूर, खुनशी, आणि सूड घेणारा आहे ह्मणून शिकारीलोक डौल मारण्याकरितां गप्पा मारितात. पण तो उपजत मोठा भित्रा आहे. मनुष्यें

त्यास त्रास देऊन क्रूररीतीनें वागवितात ह्मणून आप-ल्या बचावाकरितां तो सावध राहतो. त्यास उपद्रव दिला नाहीं तर तो कधींही अंगावर तुटून पडून कोणा-चा नाश करीत नाहीं. शिकारीलोकांनीं ह्या द्वीपांत ह-त्तींची जी कत्तल उडविली ती ऐकून सुद्धां मनास अति खेद होतो. मेजर राजर्ससाहेबानें शिकार करून १४०० वर हत्ती ठार केले. क्याप्तन ग्यालवेसाहेबानें सातशें मारिले, आणि मेजर स्किनरसाहेबानें असाच तडाका मारिला. इ० स० १८४८ च्या पूर्वीं हत्ती मारून आ-णणारास कांहीं बक्षीस देण्याचा सरकारानें ठराव केला. तेव्हां शिकारी लोकांच्या हिंसकबुद्धीस उत्तेजन येऊन तीन वर्षांत द्वीपाच्या उत्तरभागांत ३५०० वर हत्ती मारले गेले. पुढें इ० स० १८५१ पासून १८५६ पर्यंत दक्षिणभागांत २००० हत्तींची बक्षीस मिळविण्याच्या आशेनें कत्तल उडाली. ह्या मानानें शिकारीलोकांनीं किती हत्तींचा प्राणनाश केला असेल त्याची कल्पना वाचकांनीं मनांत आणावी. आलीकडे सरकारानें याचा प्रतिबंध केला आहे.

हत्ती बाळगण्याकरितां किंवा विकरीकरितां कसे ध-रितात याजविषयीं कांहीं माहिती देतों. हत्ती धरण्याचे पांच प्रकार आहेत. पहिला प्रकार.— ज्या जंगलांत हत्ती राहतात, तेथें आसपास मोठ्या खांचा काढून त्यावर ह-लके मंडपासारखें आच्छादन घालितात; त्याच्यावर दोन बोटें माती टाकून वर गवत किंवा दुसरा झाडपाला उ-गवूं देतात. पुढें तो खाण्याच्या आशेनें हत्ती तेथें ये-तात, ते त्या खांचांत पडतात, आणि त्यास बाहेर नि-

घतां येत नाहीं. नंतर हत्ती धरणारे लोक त्यांच्या पायाखालीं माती सारून खांचा भरून काढितात, आणि पायांस फांस घालून त्यांस धरितात; हा प्रकार फार जुना असून सर्व लोकांस माहीत आहे. पण त्यानें हत्तीच्या जिवास केव्हां केव्हां अपाय होतो. दुसरा प्रकार.— हत्ती उभा असतां मागील एक पाय मौजेनें टेंकण्याची आणि एक वर उचलण्याची त्यास संवय आहे, त्यामुळें मागून त्याच्या पायांस फांस घालून धरण्यास चांगली संधि सांपडते. तिसरा प्रकार.— हत्तीणी शिकवून तयार केलेल्या असतात, त्यांस कुंटण हत्तीणी ह्मणतात. त्या कळपांत सोडिल्या ह्मणजे त्यांच्या मागें हत्ती लागतात आणि त्यांची पाठ सोडीत नाहींत. पुढें त्यांस त्या नादीं लावून झुलवीत झुलवीत ठरविलेल्या जागीं नेतात. नंतर लोक त्यांस धरितात. हा प्रकार नेपाळ व ब्रह्मदेश येथें चालू आहे. चवथा प्रकार.— कुंटण हत्तीणीप्रमाणें दोन नर हत्ती तयार करितात. त्यांजवर महात बसून जो हत्ती धरावयाचा असेल त्याच्या दोहोंबाजूंस जातात, आणि आपल्या गंडस्थलांनीं ताडण करीत त्यास इकडे तिकडे जाऊं न देतां इष्टस्थलीं आणितात. पुढें मनुष्यें त्याच्या पायांस फांस घालून त्यास धरितात. हा प्रकार पाहाण्यास मोठा मौजेचा आहे.

हत्ती धरण्याचे किंवा त्यांची शिकार करण्याचे चार प्रकार सांगितले, पण त्या सर्वांपेक्षां पुढचा प्रकार सांगणार तो मुख्य आहे. ह्यास मनुष्यबळ मोठें लागतें, व ह्यानें एकदम पुष्कळ हत्ती सांपडतात. लंकेंतील चमत्कार अवलोकन करण्यास जे वडे लोक जातात त्यांच्या

करितां ही शिकार पांचव्या प्रकारानें करितात. जंग-
लांतील मध्यमसे वृक्ष तोडून त्यांचे पालवीसह डांब, म-
धून मनुष्यास मात्र जातां येईल एवढ्या अंतरावर पुर-
तात, आणि त्यांचा एकेरी किंवा दुहेरी कोट तयार
करितात. हत्ती जलाशयाचा फार शोकी आहे ह्मणून
कोटाच्या आंत लहानसा तलाव घेतात. कोटाची लांबी
सुमारें पांचशें फूट आणि रुंदी अडीचशें फूट असते.
नंतर हजारों लोक जमून जेथें हत्तींचे कळप असतात
त्यांच्याभोंवतीं गर्का देतात आणि कोटाकडे जाण्याची वाट
मात्र मोकळी ठेवितात. कांहीं लोक नानाप्रकारचीं क-
र्कश वाद्यें मोठ्यानें वाजवूं लागतात. कांहीं मशाली व
चुड्या पेटवून एकच दंगा करून देतात. अग्नीचा आणि
धुराचा हत्तीस उपजत तिटकारा आहे. चोहोंकडून दंगा,
ज्वाला आणि धूर हीं पाहून कळपांतील हत्ती पलायन
करूं लागतात. पण ते जिकडे जातील तिकडे सर्व लोक
त्यांच्या पाठिशीं लागतात. असें होतां होतां ते कोटांत
जाऊन पडले कीं, त्याचें द्वार बंद करितात. आपण
कोंडलों गेलों असें समजलें ह्मणजे बाहेर पडण्यास ते
झटपट्या खातात; ती मौज पहाण्यासारखी आहे. आ-
पल्या शुंडांनीं कोटाचे डांब उपडूं लागतात; गंडस्थलांनीं
त्यांजवर धक्के मारितात, आणि असे भयंकररीतीनें ओ-
रडूं लागतात कीं सभोंवतालचा प्रदेश त्या ध्वनीनें दण-
दणून जातो. बाहेर पडण्यास सर्व यत्न व्यर्थ झालेसे
पाहून त्यांची उमेद खचते आणि कोटाच्या मध्यभागीं
सर्व एकत्र मिळून दुर्मुखलेले उभे राहातात. पुढें कांहीं
दिवस उपाशीं ठेवून चांगले मऊ झाले ह्मणजे केळीं

वगैरे त्यांस आवडणारे जिन्नस खाऊं घालितात. दर एक शिकारींत दहा वीसपासून शंभरपर्यंत हत्ती सांपडतात. ह्या शिकारीस पूर्वी महिना पुरत नव्हता व सांप्रतकालीं सुद्धां आठ दहा दिवस तरी लागतात; पूर्वीं राजेलोकांच्या डामडौलाकरितां किंवा बौद्ध लोकांच्या देवाचे छबीने निघत त्यांकरितां हत्ती लागत; ते दुसऱ्या व तिसऱ्या प्रकारानें धरीत. यूरोपियन लोक द्वीपांत आल्यावर हत्तींचा पुष्कळ कामीं उपयोग होऊं लागल्यामुळें त्यांची अधिक जरूरी पडूं लागली तेव्हांपासून ह्या पांचव्या प्रकारानें धरूं लागले. ही रीति नेपाळ देशांत पूर्वींपासून चालू आहे. ह्याप्रमाणें हत्ती धरिल्यावर त्यास बाहेर विकरीस पाठविण्याकरितां बंदरावर नेऊन जाहजावर चढवितात; त्या वेळींही पाहाण्यासारखी मौज असते.

---

## भाग अठरावा.

### वृक्ष.

या द्वीपांत शोभायमान् व भव्य वृक्ष इतके विपुल आहेत कीं, त्यांत विशेष महत्त्व कोणत्यास द्यावें हा मोठा विचार पडतो. तत्राप त्यांतील कांहीं मुख्यांचें वर्णन देतों. अशोक वृक्ष येथें अनेक स्थलीं दृष्टीस पडतात. मुख्यत्वें **दुंबिरा** नांवाच्या दऱ्यांत ते मोठ्या जोरानें निपजतात. आपले कवी त्याच्या शोभेची मोठी तारीफ करितात; त्याप्रमाणें किरमिजी व नारिंगी रंगाच्या पुष्पांनीं जेव्हां तो भरून जातो तेव्हां त्याची शोभा मोठी रमणीय दिसून मनास कांहीं विलक्षण आनंद होतो.

ताडवृक्षाच्या शेंकडों जाती आहेत त्यांपैकीं येथें दाहा बारा आहेत. त्यांत पालमायरा व नारळ हे दोन मुख्य होत. या दोन जातींचें पुढें वेगळेंच वर्णन देणार आहों. सांप्रत दुसऱ्या थोड्या जातींच्या ताडांविषयीं कांहीं माहिती सांगतों. तालिपत हा एक ताडजातींपैकीं वृक्ष आहे. याचीं पानें पंख्यासारखीं विस्तीर्ण असून त्यांचा व्यास दहा हात असतो. हीं पानें सिंहलीलोक घरावर पत्र्यांप्रमाणें घालितात, व त्यांचे हंगामी तंबू करितात. यांचा कागदाप्रमाणें उपयोग करितात, आणि यांच्या चवऱ्या करून त्या सिंहलीराजांच्या वर धरीत. तालिपतताड शंभर फूट उंच वाढतो. हा जन्मांत एकदां फुलतो आणि पुढें मरण पावतो. जागरीचा ताड ज्यास सिंहली लोक ( कितुल ) ह्मणतात. हा क्यांदि नांवाच्या टेंकड्यांत पुष्कळ वाढतो. याजपासून साखर उत्पन्न होते. द्वीपांतील पश्चिम व दक्षिण भागांतील लोक तिचा पुष्कळ उपयोग करितात. याच्या तंतूपासून मऊ व बळकट दोरखंड तयार होतो. या एक ताडापासून चोवीस तासांत शंभर पाइंत ह्मणजे सुमारें दीडमण ताडी उत्पन्न होते. एक ताडीचें झाड असलें ह्मणजे त्याजवर एक लहानशा कुटुंबाचा चरितार्थ चालतो. सुपारी ही एक ताडांतील जात आहे हें सर्वांस ठाऊकच आहे. लंकेंतील कांहीं भागांत सुपारीचा कवडीप्रमाणें नाण्याकरितां उपयोग करितात.

कंबक नांवाचा एक वृक्ष आहे. त्याचा विस्तार मोठा असून भव्य दिसतो. नद्यांच्या कांठीं व तळाव आणि कालवे यांच्या पाळीवर हा चांगला वाढतो, क्यांदी-

शहरापासून समुद्रापर्यंत महावेलीगंगेच्या कांठीं दोहीं-बाजूंनीं याचें दाट बन लागून गेलें आहे. येथील देखावा पाहाण्यासारखा रमणीय आहे. कोलंबोपासून तीन मैलांवर कंबकाचा एक जुना वृक्ष आहे, तो वीस मैलांवरून दिसतो. त्याच्या बुडख्याचा घेर तीस हात आहे. त्याच्या लांकडाच्या कोरींव मूर्त्ति करितात. त्याची साल औषधी असून तिचा उत्तम चुना होतो. येथें वटवृक्ष अनेक भागांत आहेत, त्यांचा विस्तार केवढा असतो आणि छाया किती गाढ असते, हें ज्यांनीं आपल्या इलाख्यांतील नर्मदेच्या कांठचा कबीरवड पाहिला आहे त्याच्या सहज लक्षांत येणार आहे. इंदियारबर हा वृक्ष येथें बहुत भागांत सांपडतो. ह्याचा असा चमत्कार आहे कीं त्याच्या सर्व मुळ्या वर जाऊन जाळ्यासारख्या पसरतात.

साग, फणस, हेद्द (ज्यास इंग्रजींत स्याटिनवुड ह्मणतात) टेंबुरणी, अबनस इत्यादि इमारती लांकडाचे वृक्ष पुष्कळ भागांत विपुल आहेत. पूर्वकालीं साग येथें नव्हता; पण आलीकडे त्याची लागण मोठ्या भरभराटीनें होत चालली आहे. फणस प्रत्येक बागेंत आणि घराजवळ लावलेला असतो. सिंहलीलोकांस याचें फळ अन्नाऐवजीं, त्याचीं पानें गुरांस चारा, आणि लांकूड हरएक कामीं उपयोगीं पडतें. येथें मोठाले फणस लागतात. एक फणस पक्के पंचवीस शेर वजन भरतो. हेद्दाचें लांकूड जाहाजें बांधण्याच्या व दुसऱ्या पुष्कळ कामीं उपयोगीं पडतें. हें मोठें टिकाऊ आणि दिखाऊ आहे. हा वृक्ष शंभर फूट उंच वाढतो. ब्यातीकेलो आणि

त्रिंकोमाली यांच्या आसमंतात् हेदाचे शेंकडो वृक्ष दृष्टीस पडतात. टेंबुरणीचे वृक्ष उत्तरेकडील अरण्यांत पुष्कळ आहेत. त्याचें लांकूड मोठें टणक व वजनदार असतें. येथें वेळवाचीं बेटें अनेकस्थलीं आहेत. त्यांत मोठाले व साठ हात लांबीचे वेळू सांपडतात. ब्रेडफ्रूट्ट्री भाकरीचे फळाचें झाड ह्या बेटांत आहे. ह्याचें फळ फणसासारखें असतें व गरीब लोक ह्याचे फळांची भाजी करितात अथवा तें शिजवून भाकरीऐवजीं खातात. हा वृक्ष फणसाचे झाडाएवढाच उंच व मोठा असतो.

आंबा, जांब, सिताफळ, नारिंग, लिंबु, पेरु, पोपया इत्यादि लहानमोठे सर्व फलवृक्ष बहुत चांगले व पुष्कळ निपजतात. लंकेंतील आंबे आपल्या देशांतील आंब्यांपेक्षां दुप्पट मोठे असतात, आणि जानेवारीचे अवलीस तेथें मोठे आंबे मिळतात. श्री० रा० आबासाहेब यांस लहान असोल्या नारळाएवढे मोठे हिरवे आंबे फरमास आणून दिले होते. येथें उत्तम जातीचे अनानस येतात. चिंचांचीं झाडें पुष्कळ आहेत. अनुराधपूर येथें धर्मप्रवर्तक बुद्धाच्यावेळचा जुना चिंचेचा वृक्ष अद्यापि आहे. येथें मोठाले व उत्तम बाग आहेत. त्यांत नानाप्रकारचे पुष्पवृक्ष आणि लता आहेत. मरुत ह्मणून एक वृक्ष आहे; त्याचीं फुलें फार शोभिवंत असतात. चाफ्याचे वृक्ष येथें विपुल आहेत. जाईचे वेल तर रानोमाळ पसरलेले आहेत. हीं सर्व बुद्ध्या लावलेलीं नाहींत. द्वीपाच्या सर्व भागांतही आपोआप इतकीं रगड उगवतात कीं त्यांच्या पुष्पांनीं ह्यांच्यांचे हारे भरितां येतात. रत्नावेली व मिहींतल येथील देवालयें एक वेळीं पुष्पांच्या हारगजऱ्यांनीं भरून

टाकिली होती. दंबादिनिया नांवाच्या देवालयांत दर-रोज वेगवेगळ्या पुष्पांची लाखोली वाहिली पाहिजे असा तेथील नियम होता. वनराज ह्मणून एक लता आहे, तिचीं फुलें फार वाखाणण्यासारखीं नाहींत. पण तिचीं पर्णें आणि त्यांचा रंग हीं मात्र मोठीं मनोहर आहेत. महारावण रिव्यूला ( रावणाची दाढी ) ह्मणून एक वेली आहे. ही समुद्रकांठीं उगवते आणि हिच्या योगानें स-मुद्राचें पाणीं मागें हटतें अशी लोकांची पूर्वीं समज होती. जापने येथें उत्तम जातीची तमाखू उत्पन्न होते, ती त्रावणकोर येथें विकरीस जाते. आफ्रिकेच्या एका भागांत प्राचीनकालीं तिच्या पानांचा कवड्यांप्रमाणें ना-ण्याऐवजीं उपयोग करीत.

मसाल्याच्या पदार्थांपैकीं या द्वीपांत उत्पन्न होणारा मुख्य पदार्थ दालचिनी होय. तिच्या शेंकडों बागा द-ष्टीस पडतात. पांच सहाशें वर्षांपूर्वीं हें बेट दालचिनी-करितां प्रसिद्ध असल्याचा लेख आढळत नाहीं. पोर्तु-गीस लोकांस हा व्यापार फायदेशीर वाटून ती येथील राजापासून विकत घेत पुढें डच्चलोकांकडे जेव्हां बेटाचें स्वामित्व गेलें तेव्हां ते आपण स्वतः दालचिनी-च्या बागा किनाऱ्यावर तयार करून तिचा व्या-पार करूं लागले. उत्तम जातीची दालचिनी उत्पन्न होऊं लागून चांगला फायदा येऊं लागला. तेव्हां या व्यापारांत कोणी शिरूं नये ह्मणून जो कोणी तिच्या झाडाचा नाश करील किंवा तिचा व्यापार करील त्यास फाशीं दिलें जाईल ह्मणून मोठा सक्त ठराव केला. कोलंबो येथें डच्चलोकांनीं तयार केलेल्या मोठ्या रस-

णीय बागा अद्यापि दृष्टीस पडतात. पुढें इंग्रज लोकांच्या अमलांत हा कडक ठराव रद्द होऊन सांप्रत तिची लागण किंवा व्यापार करणें झाल्यास थोडासा कर दिला ह्मणजे हा व्यापार करण्यास सर्वांस मोकळीक आहे. आलीकडे अस्सल जातीची दालचिनी उत्पन्न करीत नाहींत, कारण तीस बरोबर किंमत येत नाहीं. येथें वेलदोडे चांगले उत्पन्न होऊन त्यांचा बराच व्यापार होतो.

बुंद, चहा, सिंकोना (ज्यापासून कोयनल उत्पन्न होतें तें झाड) आणि द्राक्ष हे पदार्थ पूर्वकालीं येथें उत्पन्न होत नव्हते. इ० स० १७०० त दच लोकांनीं या बेटांत बुंदाची प्रथम लावण केली. ती कमी उंच प्रदेशावर झाली, ह्मणून चांगलें पीक आलें नाहीं. पुढें **सर. ए. बार्नस**साहेब येथील गव्हरनर झाला. त्यानं **पिरादिनियाचे** प्रसिद्ध बागेंत बुंदाची लावण केली. तेव्हांपासून चांगलें उत्पन्न येऊं लागलें. सिंहलीलोक पूर्वीं बुंदाचें प्राशन करीत नसत. त्यांचीं फुलें ते वासास घेत आणि पानें कढींत घालीत. सांप्रत येथें याचा मोठा व्यापार चालू आहे. चहाची लागण करण्याविषयीं दच लोकांनीं यत्न केला, परंतु तो सिद्धीस गेला नाहीं. हल्लीं **प्युसिलावा** नांवाच्या डोंगरावर चहाची लागण करितात आणि चांगल्या प्रतीचा चहा उत्पन्न होतो. **कोलंबोपासून क्यांदीपर्यंत** आगगाडींत बसून जात असतां वाटेनें कित्येक ठिकाणीं चहाचे मळे दृष्टीस पडतात. प्राचीनकालीं येथें द्राक्षें पिकत नव्हतीं. सुमारें चौदा पंधराव्या शतकापासून त्यांची येथें लावण होऊं

लागली. कोलंबो व क्यांदी येथील बाजारांत विकावयास येतात.

---

## भाग एकुणीसावा.

### पालमायरा.

हा ताड आणि नारळ यांनीं लंकाबेटाची वांटणी करून घेतली आहे. उत्तरेकडील भागांत आणि मुख्यत्वें जापनेद्वीपकल्पांत व लगतच्या बेटांत या ताडाची कितीएक मैलपर्यंत एकसारखीं अरण्यें लागून गेलीं आहेत. हा ताड आपल्या देशांत सिंधु नदीपासून सियामपर्यंत प्रदेशांतील सर्व भागांत दृष्टीस पडतो. हा सत्तरपासून ऐंशीं फूट मध्यें बांक न खातां सरळ वाढतो, आणि यास बहुतकरून फांटा फुटत नाहीं. याचीं पानें तालिपत ताडाच्या पानांपेक्षां कांहीं लहान असतात तरी तीं त्याच्या भोंवतीं झुकून लावल्याप्रमाणें असून मोठीं शोभिवंत दिसतात. लाविल्यापासून सुमारें पंधरा वर्षांनंतर यास फळें येऊं लागतात. तीं शहामृगाच्या अंड्याएवढीं मोठीं असतात; त्यांचा रंग सोज्वळ बदामी रंगाप्रमाणें लकेरी मारीत असून पुढें सोन्यासारखा चकचकीत होत जातो. अशा फळांनीं आणि पर्णांनीं हा वृक्ष भरलेला असतो, तेव्हां त्याची शोभा आणि डौल हीं मोठीं मनोहर दिसतात.

उत्तरेकडील आणि मुख्यत्वें जापने प्रांतांतील लोकांस या ताडापासून शेंकडो उपयोग होतात. राहण्यास आश्रा, घरांतील सामान, खाण्यास अन्न, पिण्यास पान, गुरास चारा, तेल, सरपण इत्यादि अनेक

गोष्टींचा पुरवठा याजपासून होतो. ह्याप्रमाणें त्याचे नानाविध उपयोग असल्यामुळें आपण हिंदुलोक ह्या ताडास गणपतीचा प्रिय आणि इहलोकचा कल्पवृक्ष मानून त्यावर गाणीं गातों. तामिल भाषेंत यावर एक कविता लिहिलेली आहे. तिचा इंग्रजी भाषेंत तरजुमा झाला आहे. तींत या ताडाचे आठशें एक उपयोग सांगून त्याच्या उत्पत्तीविषयीं एक मौजेची गोष्ट लिहिली आहे, तिचें तात्पर्य आह्मी येथें देतों. ब्रह्मदेवानें पृथ्वीवरील सर्व पदार्थ निर्माण केल्यावर असें दिसून आलें कीं ते मनुष्यांच्या सर्व गरजांस पुरेसे नाहींत; आणि ज्याच्या योगानें क्षुधा शांत, रोगपरिहार, मनुष्य पोषण आणि लोक धनसंपन्न होतील असा पदार्थ कमी आहे. तेव्हां मनुष्यें मोठ्या दुःखांत आणि घोटाळ्यांत पडून कमळाच्या पानावरील उदकाप्रमाणें कांपत शिवाकडे गेलीं आणि त्याची पूजा करून आपलें दुःख शमन व्हावें ह्मणून त्यांनीं त्याची प्रार्थना केली. शंभूनें ती ऐकून मनुष्य रक्षणाच्या कामीं हयगय करण्याचें कारण विष्णूस कडकून विचारिलें. मनुष्यांच्या गरजेस लागणारा पुरवठा ब्रह्मदेवानें कमी केला असल्यामुळें ही हयगय होते ह्मणून त्यानें भीत भीत उत्तर दिलें. तेव्हां ब्रह्मदेवाचा जाब घेतला. तो ह्मणाला, मला जितकें ज्ञान आहे तितकें खर्चून मी सृष्टि निर्माण केली, तेव्हां निरुपाय होऊन स्वर्गांतील कल्पवृक्ष आणून पृथ्वीवर लावावा ह्मणून त्यास शिवानें आज्ञा केली. तीस अनुसरून कल्पवृक्ष पृथ्वीवर रगड लाविला तो हा पालमायराचा ताड होय.

पालमायरा व दुसऱ्या जातीचे ताड **लंकाबेटांत** असंख्य आहेत ह्मणण्यास हरकत नाहीं. कारण एक **जाफनेद्वीपकल्पांत** सुमारें सत्तरलक्ष असून पांच सहा लक्ष मनुष्यांस त्यांचें उत्पन्न खाण्यास पुरतें. आपल्या देशांत सुद्धां तांदुळांचें पीक बुडालें किंवा दुष्काळानें तोंड दाखविलें असतां, पालमायराच्या फळांवर सत्तरलक्ष मनुष्यांचा तरणोपाय होणार आहे. पालमायरास फळें येण्याचा हंगाम आला ह्मणजे आपल्या देशांतील पूर्व किनाऱ्यावरील शेंकडो लोक रोजगाराकरितां लंकेंत जातात. ताडाचें लांकूड बहुतकरून बळकट आणि टिकाऊ नसतें. पण हा मोठा चमत्कार आहे कीं, येथील पालमायराच्या लांकडांत हे गुण मुख्यत्वें आढळतात; यामुळें त्यास विशेष योग्यता आली आहे. हें पुरें जून होण्यास निदान शंभर वर्षें लागतात. नर आणि मादी अशा दोन जाती याच्या मानल्या आहेत. मादी ताडाची योग्यता अधिक मानितात, कारण त्याचें लांकूड अधिक टणक असतें, आणि त्याचा रंग विशेष काळा असतो. मादी वृक्षाच्या लांकडास नराच्यापेक्षां हळूहळू तिप्पट जास्त किंमत येते.

---

## भाग वीसावा.

### नारळ.

**ग्यालीच्या** पूर्वेस एक डोंगर आहे. त्यांत एक कोरींव पुतळा आहे. आपल्या देशांत **कुस्ति** नांवाचा कोणी एक राजा होता; त्यानें सिंहलीलोकांस नारळाचा उ-

पयोग प्रथम शिकविला ह्मणून त्याचें स्मारक तो पुतळा आहे असें दंतकथेवरून समजतें. पण त्यावर वर्ष किंवा कांहीं लेख नाहीं. लंकाद्वीपांत नारळ जसा रुजतो तसा पृथ्वीच्या कोणत्याही भागांवर होत नाहीं असें ह्मणण्यास प्रत्यवाय नाहीं. तो रुजण्यास जीं सृष्टिजन्य कारणें अवश्य लागतात तीं येथें सर्व अनुकूल आहेत. समुद्र किनारा लगत, समुद्राच्या तुषारांनीं आणि गारव्यानें दमट असलेलें वातावरण, सूर्याचा अनवरोधित ताप, भुसभुशीत व पिठूळ जमीन, आणि मोकळी हवा. समुद्रकिनाऱ्यापासून नारळाची लागण जसजशी दूर करावी तसतसा तो कमी जोरानें येतो आणि त्यास फळें ही कमी लागतात. सिंहली लोकांची अशी समज आहे कीं, तो वृक्ष वस्तीपासून जितका दूर असेल तितका कमी तरतरून येतो.

लंकाबेटांत नारळीचे ताड किती आहेत, याची गणना करणें मोठें कठीण आहे. कारण बेटाचा उत्तर भाग जसा अन्य ताडांनीं व्यापिला आहे, त्याप्रमाणें दक्षिण व नैर्ऋत्य भाग नारळानें व्यापून सोडला आहे. ब्यातिकेलोच्या उत्तरेकडील सोळा मैल किनारा आणि दक्षिणेकडील पंचवीस मैल नारळीच्या वृक्षांनीं भरून गेला आहे. ही एकसारखी चाळीस मैल बाग पाहून मनास किती आनंद होत असेल ? तसेंच जाफनेद्वीपकल्प नारळ व दुसऱ्या ताडांनीं भरून गेलें आहे. या द्वीपांतील अडीच लक्ष एकर जमीन नारळानें व्यापिली आहे. पुढें व्यापार सदराखालीं लंकेंतून किती लक्ष रुपयांचें नारळांचें तेल, खोबरें, नारळ आणि

काथ्या हीं प्रतिवर्षी बाहेर देशीं विक्रीकरितां पाठविलीं जातात, यांचा अजमास दिला आहे; त्यावरून हा ताड सिंहली लोकांस केवढी संपत्ति देतो हें वाचकांच्या सहज लक्षांत येणार आहे. पालमायरा ताडाप्रमाणें या ताडापासून शेंकडो उपयोग होतात, हें सर्वांस माहितच आहे, पण त्यांत एक विशेष उपयोग आहे तो असा कीं ज्या इमारतीजवळ नारळीचीं झाडें आहेत तिजवर वीज पडत नाहीं. दक्षिण हिंदुस्थानांत ही हे ताड असंख्य आहेत ह्मणण्यास हरकत नाहीं.

नारळाच्या पांच जाती आहेत. उत्तम जातीच्या नारळाची बाहेरील साल नारिंगाच्या रंगासारखी चकचकीत असते. या जातीचीं झाडें बहुतकरून देवालयांजवळ लाविलेलीं असतात. त्यांतील पाणी अति मधुर असतें. कोणी प्रतिष्ठित माणूस देवदर्शनास गेला असतां तेथील पुजारी त्यास घोटभर पाणी प्रसाद ह्मणून प्यावयास देतात. मध्यमसा असोला नारळ पक्के आठशेर वजन असतो. दर ताडास शंभरपासून दीडशें नारळ लागतात. उत्तम जातीचे नारळ येथें तीस रुपयांनीं हजार विकतात. नारळांत जुळा ( दोन जोडलेले ) असतो तो फार मोठा असतो. नारळाच्या विकसित पुष्पांतून जो रस गळतो त्यापासून साखर आणि एक प्रकारची दारू करितात.

वडिलार्जित मालमत्तेस वारस होण्याच्या संबंधानें सिंहली लोक या ताडास किती महत्त्व देतात याजविषयीं थोडीशी गोष्ट सांगून हें प्रकरण पुरें करितों. थोड्या वर्षांपूर्वीं ग्याली येथील दिस्त्रिक्ट कोर्टांत माऊ-

वंदीच्या वांटणींत दहा नारळींतील पंचवीसशावा वांटा मिळण्याकरितां दावा लागला होता.

---

## भाग एकविसावा.

### गौतम.

शंकराचार्य, महंमद, येशुख्रिस्त इत्यादि जे लहान मोठे धर्मस्थापक आज पावेतों झाले त्या सर्वांत गौतमास विशेष महत्त्व दिलें पाहिजे. कारण पृथ्वीच्या पाठीवर एकंदर लोकसंख्या अजमासें १,४२,५०,००,००० आहे, तींतील एक तृतीयांशापेक्षां अधिक ह्मणजे सुमारें त्रेसष्ट कोट मनुष्यें त्यानें स्थापित केलेल्या ( बौद्ध ) धर्माचे आहेत. दुसरें असें कारण आहे कीं यवन व क्रिश्चियन या दोहों धर्मांपेक्षां बौद्धधर्म अधिक जुना आहे. वर सांगितल्या धर्मस्थापकांविषयीं बहुतकरून सर्व लोकांस थोडीबहुत तरी माहिती आहे. पण गौतम हा कोण होता, तो कधीं व कोठें जन्मला व त्यानें स्थापन केलेल्या धर्मांतील मुख्य मतें कोणतीं इत्यादि गोष्टींचें ज्ञान असणारे सुशिक्षित लोकांत देखील थोडे सांपडतील. आतां ही सर्व माहिती देणें ह्मणजे एक वेगळाच ग्रंथ लिहिला पाहिजे; करितां आह्मी या स्थलीं त्याजविषयीं थोडीशी माहिती देण्याचें योजिलें आहे. कारण लंकाद्वीपांत चालू असलेल्या मुख्य धर्मांचा हा स्थापक आहे.

पालीभाषेंत बौद्धधर्माविषयीं शेंकडो ग्रंथ आहेत. त्याप्रमाणें संस्कृतांतही कांहीं आहेत. बुद्धवंश ह्मणून एक ग्रंथ आहे, त्यांत गौतमाच्या पूर्वीं चोवीस बुद्ध

झाले असें लिहिलें आहे; त्यांत सर्वांचीं चरित्रें दिलीं आहेत. चोविसावा बुद्ध काश्यप नांवाचा होता. शुद्धोदन नांवाचा नेपाळ देशांत कपिलवस्तु शहरचा राजा होता. त्यानें कोळी घराण्यांतील राजकन्या माया आणि प्रजापती यांच्याशीं लग्नें केलीं. मायेच्या पोटीं इ. स. च्या पूर्वीं ६९४ वे वर्षीं गौतम जन्मला. येशुख्रिस्ताच्या जन्मकालीं जसे अद्भुत चमत्कार झाले तसे या वेळीं घडून आले अशी कथा आहे. दुसरीच्या पोटीं नंद जन्मला, हाही पुढें प्रसिद्ध बुद्ध झाला. गौतम सात दिवसांचा तान्हेबाळ असतां त्याची माता निवर्तली. हा लहानपणापासून खिन्न, धर्मशील आणि गंभीर स्वभावाचा होता. लोकांचीं दुःखें आणि क्लेश पाहून त्याचें अंतःकरण फार विवळत असे. तो जसा मोठा होत गेला तशी त्याच्या मनाचीही उदासीन स्थिति वाढत जाऊन त्याच्या बापास असें भय पडलें कीं हा आपलें उच्च पद सोडून वनांत जाऊन राहतो कीं काय? तेव्हां लग्न केलें असतां याचें मन प्रपंचाकडे वळेल असा त्याच्या बापानें विचार करून कोलीराज घराण्यांतील कन्या यशोधरा हिच्याशीं त्याचें लग्न केलें. ललितविस्तारांत दंडपाणी राजाचे कन्येशीं लग्न केल्याचें लिहिलें आहे. तिचें नांव गोपा होतें. कांहीं ग्रंथांत यास तीन बायका असल्याचें लिहिलें आहे. त्या वेळीं गौतम सोळा वर्षांचा होता. लग्नाचा इष्ट हेतु कांहीं अंशीं सिद्धीस गेला. गौतमाचें मन स्त्रीप्रेमांत आणि ऐषआरामांत कांहीं कालपर्यंत अगदीं गढून गेलें.

पुढें त्याच्या मनानें पुनः उलट खाल्ली. त्याचें अंतः-

करण वृद्धापकाळ, व्याधि आणि मृत्यु या तीन गोष्टीं-कडे लागलें. यांचें चिंतन करीत असतां मनास क्लेश होऊन तो असा उद्गार काढी कीं, तारुण्य, आरोग्य आणि आयुष्य हीं क्षणैक स्वप्नें आहेत आणि यांचा परिणाम मृत्यु आणि नाश हीं होत. तो राजपुत्र असल्यामुळें प्रपंचांतलीं सर्व सुखें त्यास अनुकूल होतीं; परंतु त्यास त्यांचा तिटकारा येऊन डाक्तर जानसन् कृत रासेलस नांवाच्या ग्रंथांतील राजपुत्राच्याप्रमाणें त्याच्या मनाची कांहीं स्थिति झाली होती. अशा अवस्थेंत त्याचें मन असतां त्यास पुत्ररत्न झालें, आणि राजवाड्यांत पुत्रोत्साह चालू असतां कोणास न कळवितां रात्रीं एक चिन्नानांवाचा सेवक बरोबर घेऊन घोड्यावर बसून राजवाड्यांतून पळून गेला. कांहीं अंतरावर जाऊन त्यानें आपला घोडा, राजकीय पोषाख आणि अलंकार हीं त्या चाकराजवळ देऊन त्यास परत पाठविलें. नंतर बौद्धधर्मास योग्य जीं पिवळीं वस्त्रें तीं धारण करून गौतम मगधदेशची जुनी राजधानी राजगृही ह्मणून भागीरथीच्या दक्षिणेस शहर होतें, तेथें गेला. येथें आपलें पूर्व नांव टाकून शाक्यमुनि हें नांव धारण केलें. त्यास दुसरीं अनेक नांवें आहेत, पण तो पुढें मुख्यत्वें शाक्य नांवानें प्रसिद्ध होता. राजगृही शहराजवळ एक खेडें होतें. त्यांत अलार आणि उद्रक नांवाचे दोन साधु ब्राह्मण राहत होते. त्यांजवळ तो तत्त्वशास्त्र व समाधिशास्त्र शिकला. मुनि येथून निघाले आणि बुधगया ह्मणून जें प्रसिद्ध स्थल आहे तेथें जाऊन शिष्यावस्था सोडून धर्मोपदेशक बनले.

पुढें त्यास पुष्कळ चेले मिळून त्यांनीं मुनिप्रणीत धर्म स्वीकारिला. बिंबसरा नामक मगधदेशाच्या राजानें मुनीकरितां बुधगया येथें मठ बांधून दिला. कोसल आणि मगध ( ज्यास आउद आणि बहार ह्मणतात ) या दोन्हींच्या दरम्यान श्रावस्ती शहराजवळ दुसरा मठ अनाथ पिंडदु नांवाचा कोसलचा श्रीमान् व्यापारी होता, त्यानें बांधून दिला.

पुढें कित्येक लोकांनीं प्रपंच त्याग करून मुनीपासून दीक्षा घेतली, आणि त्याचे चेले होऊन त्याजवळ मठांत राहिले. मुनि त्यांस पावसाळ्यांत आपल्या धर्माचीं मूलतत्त्वें पढवीत आणि पावसाळा संपल्यावर त्याचा प्रसार करण्याकरितां त्यांस बाहेर देशीं पाठवीत. याप्रमाणें मुनींनीं स्थापित केलेल्या धर्माचा प्रसार होण्यास आरंभ झाला. याप्रमाणें बौद्ध धर्माचा आरंभ आपल्या देशांत होऊन तो येथेंच पसरून राहिला नाहीं; तर लंका, सियाम, तिबेट, चीन, इत्यादि अनेक देशांत त्याचा प्रसार होऊन त्या देशांत सांप्रत मोठ्या जारीनें चालू आहे. गौतमाचे अगोदर चोवीस बुद्ध होऊन गेल्याचें पूर्वीं सांगितलेंच आहे. याचे मागून मैत्रेय नांवाचा बुद्ध होणार ह्मणून वरील ग्रंथांत सांगितलें आहे.

आतां मुनींनीं स्थापन केलेल्या धर्मांतील मुख्य मताविषयीं थोडेसें निरूपण करितों. या धर्मास ( बन ) अशी संज्ञा आहे, त्या वरील ग्रंथांस पीठकत्रय ह्मणून मानिलें आहे. व त्यावरील टीकेस अर्थकथा ह्मणतात. स्कंध, तृष्णा, कर्म आणि निर्वाण अशीं या धर्माचीं चार

मूलतत्त्वें मानिलीं आहेत. आपल्या जीवित्वांत दुःखावांचून दुसरें कांहीं नाहीं. दुःखाचें बीज माया होय, त्याचा नाश होण्यास मायेचा नाश झाला पाहिजे. मनुष्यानें समाधि किंवा ध्यान यांच्या योगानें सर्व माया, षड्रिपु, आणि आशा, यांचा नाश करावा, ह्मणजे निर्वाण प्राप्त होतें. निर्वाण हें या धर्मांत मुख्य फल धरिलें आहे. याचा अर्थ कोणी स्वर्ग, मोक्ष, अनाद्यंत सुख किंवा निधन असा करितात. हा शुद्ध अंतःकरणाचा धर्म आहे. अन्य धर्मांप्रमाणें यांत भीति व दुःख हीं न दाखवितां आशा आणि आनंद हीं पुढें केलीं आहेत. या आयुष्यांतील चांगुलपणानें पुढच्या जन्मीं सुख मिळणार आहे. या धर्मास देव, भट्ट, होम, हवन, प्रायश्चित्त इत्यादि कोणत्याही गोष्टींची गरज नाहीं. यांत पुनर्जन्म धरिला आहे; जातिभेद मानिलेला नाहीं. बौद्धलोक वेद आणि पुराणें हीं प्रमाण मानीत नाहींत. या मतांनीं ब्राह्मणधर्मी लोकांचें पित्त खवळलें आणि दोघांमध्यें अति वैर पडून एकमेकांचा फार छल करूं लागले. पुढें हें वैर इतकें वाढलें कीं यवन धर्म जसा ब्राह्मणधर्मापासून अगदीं वेगळा व त्याशीं सोळा आणें विरोधी त्याप्रमाणें बौद्धधर्मास ब्राह्मणधर्मी लोक मानूं लागले. पण खरा विचार केला असतां दोन्ही धर्मांचें मूळ बीज एकच आहे. या धर्मांत दोन पंथ झाले आहेत. एक औतरीय आणि दुसरा दाक्षिण.

गौतमास पुत्ररत्न झालें त्या वेळीं त्यानें घर सोडिलें ह्मणून वर सांगितलें आहे; त्याचें कारण असें लिहिलें आहे कीं प्रपंच त्याग करण्याच्या मार्गांत पुत्रप्रेम हा

एक अधिक अडथळा आला असा विचार करून तो त्याच वेळीं बाहेर पडला. गुणवान्, रूपवती, आणि तरुण स्त्री, लहान बालक आणि सर्व संपत्ति हीं सोडून जाते वेळीं जे विचार त्याच्या मनांत आले ते व बौद्ध धर्माश्रम धारण केल्यानंतर कांहीं वर्षांनीं तो एकवेळ आपल्या घरीं गेला होता त्या वेळीं त्याचा पिता, स्त्री आणि बाल यांच्याशीं त्याचें झालेलें भाषण धर्मपाद व दुसऱ्या पुराणांत दिलें आहे तेंही मोठें चित्तवेधक आहे. तो दोन साधु ब्राह्मणांजवळ तत्त्वशास्त्र शिकला आणि त्यांत सांगितल्याप्रमाणें त्यानें कांहीं वर्षें इतक्या कडक रीतीनें तपश्चर्या केली कीं त्याच्या शरीराचा शुद्ध सांपळा होऊन राहिला, तरी कांहीं फल नाहीं असें पाहून तो मार्ग सोडून तेथून निघून पुढें गयेस गेल्याचेंही वर सांगितलेंच आहे. पुष्कळ लोक मुनीपासून दीक्षा घेऊन त्यांचे चेले बनले. मुनीचा सापत्न बंधु जो नंद हा त्यांचा पट्ट शिष्य होता. त्यांच्या वृद्धापकालीं तो एकसारखा जवळ असे आणि मुनिही त्यास कधीं विसंबत नसत. त्याच्या वयाच्या ८० वे वर्षीं **कुशिनार** शहरीं त्यांचा काळ झाला, त्या वेळीं **नंद** जवळ होता. गौतम बौद्ध धर्माचा प्रसार करण्याकरितां स्वतः लंकेंत ती[illegible] वेळ गेला होता. प्रथम गेला तेव्हां **बिंतेन** येथें य[illegible] लोक जमण्याचा महानग ह्मणून बाग होता तेथें उतरला होता.

बौद्धधर्माचा जन्म आपल्या देशांत झाला. येथील अनेक देशाचे राजे यांनीं त्याचा स्वीकार करून त्याच्या उत्कर्षाकरितां झटले. इ. स. च्या पहिल्या शत-

कांत मेघवाहन ह्मणून काश्मीरचा राजा होता. तो बौद्ध धर्माचा पुरस्कर्ता होता आणि त्यानें लंकाबेट एक वेळ काबीज केलें होतें असें राजतरंगिणी ग्रंथांत लिहिलें आहे. मगध देशचा अशोक राजा ( चंद्रगुप्ताचा नातू ) हा या धर्माचा केवढा पुढारी होता, हें दिल्ली व अलाहाबाद येथील प्रसिद्ध स्तंभावरील व गिरनार आणि डाला येथच्या डोंगरावरील त्यानें या धर्माविषयीं ज्या आज्ञा कोरून ठेविल्या आहेत, त्या दाखवितात. अशोक राजास महावंशांत धर्मशोक असें ह्मटलें आहे. त्यानें या धर्माचा प्रसार होण्याकारितां आपल्या पुत्रास लंकेंत पाठविलें त्याजविषयीं कथा, इतिहास प्रकरणांत पुढें येणार आहे. स्तंभावर आणि डोंगरावर ज्या आज्ञा कोरून ठेवल्या आहेत, त्यांतील मुख्य तात्पर्य ह्मटलें ह्मणजे हिंसा करण्याची बंदी, व मनुष्य आणि अन्य प्राणी यांच्या सुखाकारितां रस्त्याच्या बाजूंस व अन्यत्र वृक्षांची लावण करावी आणि विहिरी काढाव्या असें आहे. सुमारें आठशें वर्षांपूर्वी काश्मीरचा राजा हर्षदेव आणि ओरीसा प्रांताचा स्थीरपाल हे या धर्माचे मोठे पुढारी होऊन गेले.

शाक्य मुनीच्या दंताविषयीं महावंशांत कांहीं कथा दिली आहे. तींतील थोडीशी माहिती देऊन आह्मी हें प्रकरण पुरें करितों. ही माहिती देण्याचें मुख्य कारण असें आहे कीं, मुनीचा काळ झाल्यावर बौद्धधर्मीलोक जितके त्यास भजत होते तितके त्याच्या अस्थीस, मुख्यत्वें दंतास भजूं लागले. कुशिनारा येथें मुनीचे प्रेतसंस्कार झाल्यानंतर त्यांचा डावे बाजूचा सुळा

दंत कालिंग देशाची राजधानी दंतपुरा येथें नेला. तेथें तो आठशें वर्षें जपून ठेवला होता. पुढें महासेन-राजा लंकेंत राज्य करीत असतां याचें आणि कालिंग-देशाच्या राजाचें युद्ध होण्याचा प्रसंग दिसूं लागला आणि त्यांत जय कोणास येतो याचा संशय होता; तेव्हां कालिंगदेशाच्या राजानें असा हुकूम देऊन ठेविला कीं, आपला पराजय झाल्यास दंत लंकेंत न्यावा, त्या हुकूमास अनुसरून दंत लंकेंत नेला तो पुनः मलबारचे लोकांनीं लंकेवर स्वारी चौदाव्या शतकांत केली तेव्हां परत आणिला. तो पुनः पराक्रमबाहूनें लंकेंत परत नेऊन पालानारुआ शहरीं ठेविला. तो पोर्तुगीज लोकांनीं इ. स. १५६० त गोवें येथें नेऊन जाळून टाकिला. सिंहली लोकांच्या मताप्रमाणें खरा दंत तो क्यांदी येथील देवालयांत आहे; जाळलेला तो तोतया दंत होता.

---

## भाग बाविसावा.

### देवालयें.

पूर्वकालीं ह्मणजे गौतम बुद्ध जिवंत असतां देवालयें बांधून त्यांत मूर्ति बसवीत नसत. त्याचे अनुयायी डोंगरांतील गुहांत जाऊन तेथें ध्यान करीत. देवानंपिय ( प्रिय ) तिसा नांवाचे राजानें महीतलाचा डोंगर पोखरून त्यांत देवालय तयार केलें आणि इ. स. २५० वर्षांनंतर बुद्धाच्या मूर्तीची प्रथम स्थापना केली. पुढें त्यानें अनेक देवालयें व मठ बांधिले. सिंहली वार्षिक इतिहासाप्रमाणें देवालयाच्या पूर्वीं मठ बांध-

ण्यास आरंभ झाला. त्याच्या पूर्वीं डोंगरांतील गुहेंत हे भिक्षुक राहत होते. मिहिंतलावरील गुहा त्यांच्या राहण्याचीं मूलस्थानें होतीं. पियतिसाच्या मागून जे राजे झाले त्यांत **दुतुगिमुनु** ह्मणून एक राजा झाला. तो बौद्ध धर्माचा मोठा पुरस्कर्त्ता होता. त्यानें हीं मोठ-मोठालीं देवालयें व विहार बांधून त्यांस मोठ्या उत्पन्नाचीं इनामें करून दिलीं. या इमारती एवढ्या भव्य आहेत कीं, त्या पाहून इजिप्त देशांतील मेंफिस येथील मनोऱ्यांची आठवण होते असें एका ग्रंथकारानें लिहिलें आहे. या देवालयास **दगोबा** ( देहगोपा ) आणि मठास विहार हें नांव ( नास्तिकाचें घर ) असें ह्मणतात. विहार हें नांव ब्राह्मण लोकांनीं बुद्ध्या दिलें असावें असें वाटतें. कारण बौद्ध धर्मानें ब्राह्मण धर्मास बराच धक्का दिला असून दोन्हींमध्यें केवढें हाडवैर होतें व ब्राह्मण लोक त्या धर्मास नास्तिकाचा धर्म ह्मणत ही गोष्ट विद्वान् लोकांस माहितच आहे. तसेंच बुद्ध शब्दाचा अर्थ ज्ञानी हा सरळच आहे, पण त्याचा नास्तिक ह्मणून जो दुसरा अर्थ झाला आहे त्याचें-ही बीज असेंच कांहीं असावें असा तर्क वाटतो.

या देवालयांची आकृति आपल्या देवालयांच्या प्रमाणें नसते. एक मोठा विस्तीर्ण व जंगी घडींव दगडाचा चवथरा बांधलेला असतो. त्यावर चढून जाण्यास पायऱ्या केलेल्या असतात. या चौथऱ्यावर घंटाकृति घुमटासारिखें देवालय बांधिलेलें असतें. त्यास वर कळस केलेला असतो. **अनुराधपूर** येथील **लंकारामाचें** देवालय अशाच डौलाचें आहे. कांहीं देवालयांत बु-

द्धाची एक किंवा अनेक मूर्त्ति असतात. कांहींत त्याच्या अस्थी, दंत किंवा केस हीं मूर्त्तीच्या ठिकाणीं ठेवलेलीं असतात. कोठें बुद्धाची मूर्त्ति उभी असते, कोठें बसविलेली आणि कोठें आडवी ठेवलेली असते. उभी असते तेव्हां त्याचा अर्थ धर्मोपदेश करीत आहे असा समजणेचा; बसलेली असतां ध्यानस्त आहे आणि आडवी असतां विश्रांति घेत आहे असा समजावा. आपल्या देवालयांप्रमाणें यांतील कांहींत घंटा टांगलेल्या असतात, आणि नंदादीप जळत असतात. कोठें भिंतीवर आंतील बाजूस बुद्धाचे अवतार झाले, त्यासंबंधीं गोष्टींचीं सूचक चित्रें काढलेलीं असतात. बौद्ध लोक देवापुढें धूप, ऊद इत्यादि सुगंधी द्रव्यें जाळितात. ते देवावर फुलांच्या लाखोल्या घालितात, आणि फुलें व त्यांच्या हारांनीं देवालयें भरून टाकितात. हें पूर्वीं सांगितलेंच आहे.

---

## भाग तेवीसावा.

### बोधवृक्ष.

देवालयाजवळ पिंपळ, अंजनी, मरुत् ( भटोरा ) आणि चंपक हे वृक्ष लावलेले असतात. बौद्ध लोक पिंपळाच्या वृक्षास देवाप्रमाणें मानितात. याचें कारण असें आहे कीं, बुद्धगया येथें या वृक्षाखालीं बसून गौतमानें बौद्धाश्रम धारण केला. तो पवित्र वृक्ष आपल्या राज्यांत असावा ह्मणून वर सांगितलेल्या तिसाराजानें गयेंतील अस्सल वृक्षाची एक फांदी अशोकराजापासून

मागून नेऊन ती अनुराधपूर येथें महामेगा बागेंत लाविली, त्यास बेवीसशें वर्षें झालीं. तो वृक्ष अद्यापि चांगला भरभराटींत आहे. हा पृथ्वीवरील सर्व जुन्या वृक्षांत वडील आहे. आफ्रिकाखंडांत सिनिगाल येथील, टास्मेनियाबेटांत अरोटावा येथील, उत्तर अमेरिकेंतील क्यालिफोर्निया येथील, व एत्ना नामक ज्वालामुखीजवळील वृक्ष अतिजुनाट आहेत पण ते अमुक वर्षांचे जुने आहेत ह्मणण्याविषयीं भरंवसा ठेवण्यासारखे लेख नाहींत. गेथसमेनच्या बागेंतील आलीव वृक्ष व लंबार्डींत सोम येथील वृक्ष हे दोनहजार वर्षांचे जुने आहेत पण अनुराधपूर येथील पिंपळ वृक्ष त्याहून वडील आहे. यास सिंहलीलोक "जयश्री महावंश बोदीनवहंस" असें ह्मणतात आणि त्याची पूजा करितात. तेथील लोक या पवित्र बोद्वृक्षास आणि बुद्धाच्या दंतास नगरदेवतांप्रमाणें मानितात, हीं दोन द्वीपांत असेपर्यंत आपणावर परराजाचा अंमल कधीं होणार नाहीं असा त्यांचा समज असे, ह्मणून राजारत्नाकरांत लिहिलें आहे. या वृक्षाचा पूजारीही वृक्षाबरोबर गेला. त्याचा सिदा वंशज सूर्यकुमारसिंग लंकेंत आहे. दोन हजार वर्षांहून अधिक आपली पिढी दाखविणारें असें जुनें भिक्षुकघराणें काशीशहरांत सुद्धां सांपडणें कठीण असें आह्मांस वाटतें.

आतां आह्मी कांहीं प्रसिद्ध देवालयांविषयीं वर्णन देतों. कालाओयानदीच्या कांठीं दांबुलनांवाचें एक प्रसिद्ध देवालय आहे. तें डोंगर पोखरून त्यांत तयार केलें आहे. हें मोठें जुनें असून यांतील कोरींव काम

फार सुरेख आहे. याची लांबी सुमारें एकशें दहा आणि रुंदी ९० हात आहे. यांत बुद्धाच्या पुष्कळ मूर्त्ति आहेत. एक विश्रांति घेत आडवी आहे. तिची उंची पंचवीस हातांपेक्षां अधिक आहे. देवालयाचें छत रंगीत कापडानें मढविलेलें आहे, आणि आंतील भिंतीवर विजयराजाचें लंकेंत आगमन, महिंदोचा धर्मोपदेश, दुत्तुगिमुनु आणि इलाल यांची लढाई यांचीं व बौद्ध धर्माच्या इतिहासांतील दुसऱ्या गोष्टींचीं सूचक चित्रें काढलेलीं आहेत. वरील डोंगरांतून देवालयांत पाणी पाझरतें तें खालीं एका कुंडांत धरितात आणि त्यास भागीरथीच्या उदकाप्रमाणें पवित्र मानितात. येथें एक गोष्ट चमत्कारिक आहे ती अशी कीं, हिंदु देवतेच्या आणि बुद्धाच्या मूर्त्ति एके रांगेनें बसविलेल्या असून लोक सारख्या भक्तीनें त्यांची पूजाअर्चा करितात.

वलगमबाहू राजानें या देवालयास मोठी वृत्ति करून दिली असल्यामुळें त्याचें स्मरण राहण्याकरितां त्याच्या नांवाची या देवालयांत एक छत्री उभारलेली आहे. इ० स० च्या बाराव्या शतकांत मलबाडप्रांताचे लोकांनीं लंकेवर स्वारी केल्यावेळीं या देवालयाचा नाश केला होता. पण कीर्तिनिसंग राजानें मोठ्या औदार्यानें पुष्कळ पैसा खर्च करून त्याची चांगली दुरुस्ती करून मोठें शोभिवंत केलें. या औदार्याचें स्मरण राहावें ह्मणून त्याचें नांव देवालयाच्या चौकांतील एका खडकावर कोरून ठेवलें आहे. त्यानें या देवालयांत बुद्धाच्या बहात्तरहजार मूर्त्ति बसविल्या असें राजावलींत लिहिलें आहे. पण ही अतिशयोक्ति आहे असें ह्मटलें पाहिजे.

देवालयाची दुरुस्ती होऊन तें मोठें शोभिवंत दिसूं लागलें तेव्हां त्यास स्वर्णगिरी असें ह्मणूं लागले. बौद्ध लोकांनीं बांधिलेल्या इमारतीस सुरेख नकशीदार काम केलेलें असतें. त्यांत कोठें मकर खोदलेला असतो; त्यास हत्तीची शुंडा, सिंहाचे पाय, सुसरीचे दांत, वानराचे डोळे, आणि डुकराचे कान असतात. अशा प्रकारचा मकर वरील देवालयांत कोरलेला आहे. अशा जातीचे दगडी मकर दक्षिण हिंदुस्थानांत कित्येक देवालयांत आहेत.

लंकेच्या दक्षिणेस दांदीराहेद नांवाचें एक स्थल आहे. येथें हिंदूनीं विष्णूचें देवालय बांधिलें होतें. तें इ० स० १६०० च्या अखेरपर्यंत मोठ्या भरभराटींत होतें. पण दुष्ट आणि लुटारू जे पोर्तुगीज यांनीं दुसरा राजसिंह याच्या कारकीर्दींत तें धुळीस मिळवून टाकिलें. द्वीपांतील यात्रेस जाण्याच्या सर्व स्थलांत हें मोठें प्रसिद्ध होतें. याचा प्राकार एवढा मोठा होता कीं, समुद्रावरून पाहिलें असतां एक शहर आहे असें मोठें तें दिसे. याजवरील छावणीस मुलामा दिलेले तांब्याचे पत्रे बसविले होते. त्याच्या सभोंवतीं एक टोलेजंग चौक होता. पोर्तुगीज लोकांनीं हें स्थल धुळीस मिळविलें, तेव्हां येथें एक हजारापेक्षां अधिक मूर्त्ति होत्या, त्या त्यांनीं फोडून फस्त केल्या. येथें रत्नें, जवाहीर, सोन्याचे दागीने व हस्तिदंत यांची लूट झाली तिचें मौल्य सांगतां येत नाहीं. फिरंगी बाहादर एवढेंच करून तृप्त झाले नाहींत. त्यांनीं देवाचे रथ फोडिले आणि अखेर तेथील गाईंची सुद्धां कत्तल उडविली. अशीं अघोर कृत्यें करून क्रूरपणाचा व नीचपणाचा अगदीं कळस

करून सोडिला. सांप्रत येथें एक दगडी दरवाजा आणि एक लहानशी इमारत मात्र राहिली आहे. दरवाज्यावर उत्तम कोरींव काम केलेलें आहे. आसमंतात दूरवर नाश झाल्याच्या खुणा नजरेस पडतात. त्यांत अनाइत दगडाचे कुसर केलेले खांब मात्र राहिले आहेत.

आह्मी क्यांदीशहरास गेल्यावेळीं तेथील देवालय पहावयास गेलों होतों; त्याचें वर्णन थोडेंसें देतों. हें पंडित पराक्रमबाहु राजानें बांधिलें. त्यास सुमारें सव्वा दोनशें वर्षे झालीं. देवालयाच्या तोंडास दोन्ही बाजूंस दोन हत्ती भिंतींत कोरलेले आहेत. आंतील भागांत एक लहान खोली आहे. तिला प्रकाश आंत येण्यास व हवा खेळण्यास द्वारें राखिलेलीं नाहींत; त्यामुळें तेथील हवा गरम असून पुष्पांच्या सुवासानें गुदमरण्यासारखी असते. खोलीचीं दारें हस्तिदंतानें मढविलेलीं असून त्यावर कोरींव काम केलें आहे. आंतल्या बाजूस वाटोळ्या टेबलासारिखा रुप्याचा एक मोठा चौरंग आहे. त्यावर रत्नजडीत देव्हारा उभा आहे. त्यावर फुलांचे हार घातल्याप्रमाणें रत्नांची वेलबुट्टी केली आहे. देवाऱ्याच्या मध्यभागीं एक सुवर्णाचें कमल असून त्यांत पवित्र दंत ( दलद ) ठेविला आहे ह्मणून सांगतात. दंत आह्मांस पहाण्यास मिळाला नाहीं. कारण तो दाखविण्यास सरकारची परवानगी लागते ह्मणून कळलें. देवालयाच्या आवारांत एक पुस्तकालय आहे; त्यांत पाली व संस्कृत भाषेतील जुने ग्रंथ आहेत. ह्याप्रमाणेंच कल्याणी येथें एक मोठें बुद्धाचे दांताचें देवालय आहे. तेथें पुष्कळ अध्ययन करणारे अविवाहित भिक्षुक आ-

हेत त्यांचा चरितार्थ देवळाचे उत्पन्नावर व भिक्षुकीवर होतो.

अनुराधपूर येथें अभयागिरि नांवाचें एक देवालय आहे. हें बांधून दोन हजार वर्षें होत आलीं, याची उंची ४०५ फूट होती. ही सेंटपालच्या देवालयाच्या उंचीपेक्षां पन्नास फूट अधिक व सेंटपिटरच्या पेक्षां पन्नास फूट कमी होती. याचा परीघ ११३० फूट आहे. हें देवालय वलगमबाहू राजानें मलबाडचे लोकांस लंकेंतून हाकून दिल्यावर आनंदप्रदर्शन करण्याकरितां बांधिलें. येथून जवळ थुपारामाचें देवालय आहे. द्वीपांतील सर्व देवालयांत यास विशेष मान देतात. हें देवानंपीयतिसा राजानें बुद्धाचे मानेचें हाड ( जत्रु ) ठेवण्याकरितां इ० स० च्या पूर्वीं तीनशें वर्षें बांधिलें. त्याची बांधणावळ सुरेख होती असें त्याच्या अवशिष्ट भागावरून दिसतें. यास इतकें पूज्य मानीत कीं, उपतिसा राजानें इ० स० ४०० वे वर्षीं त्यास धातूचें गवसणीसारखें एक वेष्टण करून त्यावर सोन्याचा मुलामा केला होता. बुद्धाचा दंत आपल्या देशांतून लंकेंत चवथे शतकांत नेला तो याच्या पायथ्याशीं सुरक्षित रहाण्यासाठीं ठेविला होता. तो पुढें थोड्या कालानें फेहिआन नांवाचा प्रसिद्ध चीनी प्रवासी हा तेथें गेल्यावेळीं त्यानें पाहिला होता. याच्या पलीकडे लंकाराम या नांवाचें देवालय आहे. हें इ० स० च्या तिसऱ्या शतकांत बांधिलें असून अद्यापि बऱ्याच सुरक्षित स्थितींत आहे.

याच्या उत्तरेस जयतवनराम नांवाचें देवालय

आहे. तें महासेन राजानें इ० स० ३३० वे वर्षीं बांधिलें. त्याची उंची सांप्रत २४९ फूट आणि व्यास३६० फूट आहे. ही इमारत मोठी जंगी आहे. ही बांधण्यास पांचशें गंवडी सहा सात वर्षें लागले असावे, व खर्च एक कोट रुपये आला असावा असा अंदाज होतो. याच नांवाचें पोलोनरुव जें प्राचीन शहर तेथें दुसरें एक देवालय आहे तें बांधण्यास कारागीर लोक आपल्या देशांतून नेले होते. याचा डौल दिल्लींतील कुतुबमिनार ह्मणून जी मशीद आहे, तिच्या सारखा आहे. येथें बुद्धाची मूर्त्ति आहे. तीवरील इमारत पडल्यामुळें गुडघ्यापर्यंत बुजली आहे. तथापि जो भाग वर दिसत आहे तेवढ्याचीच उंची ५८ फूट आहे. या इमारती बांधून हजारों वर्षें झालीं आहेत तरी त्यांतील विटा अद्यापि नव्यासारख्या दिसतात, तसेंच चुनाही तें उत्तम रीतीनें कमावित होते असें ह्मटलें पाहिजे.

---

## भाग चोवीसावा.

### विहार (मठ).

बौद्धधर्माच्या खऱ्या मताप्रमाणें देवालयें, मूर्त्ति, मठ यांची कांहीं आवश्यकता नाहीं. शाक्यमुनीच्या वेळीं देवालयें नव्हतीं. आपल्या धर्माच्या भिक्षुकांनीं किती साध्या रीतीनें रहावें याजविषयीं त्यांनीं जे नियम सांगितले आहेत, त्यांतील थोडेंसें तात्पर्य येथें देतों. त्यांनीं लग्न करूं नये. पर्णशाळेंत रहावें. ध्यान करणें तें अरण्यांत एकांतस्थळीं जाऊन करावें. कोणताही धंदा करूं

नये. उदरनिर्वाह भिक्षेवर करावा. भगवीं वस्त्रें परिधान करावीं; ऐषआरामाचा कोणत्याही रीतीनें उपभोग घेऊं नये. दाढी व डोकीं मुंडलेलीं असावीं. आपल्या धर्माच्या भिक्षुकांनीं किती साध्या रीतीनें राहावें ह्मणून मुनीचा उद्देश होता हें वरील नियमांवरून वाचकांच्या लक्षांत येणार आहे. पण श्रम करून निर्वाह करण्यास सामान्यतः कोणास आवडत नाहीं. भिक्षुक बनलों असतां आपला निर्वाह श्रमावांचून होतो असें पाहून पुष्कळ लोक भिक्षुक होऊं लागले. लंकेंत या परजीवी लोकांची संख्या वाढतां वाढतां एक वेळीं पन्नास साठ हजार झाली होती. त्यांत तेथें राजे झाले ते या धर्माचे एकाहून एक अधिक अभिमानी आणि पुरस्कर्ते झाल्यामुळें या धर्मास अगर परजीवी भिक्षुकांस विशेष उत्तेजन मिळत गलें, आणि त्यांची संख्या वाढत चालली. राजांनीं या भिक्षुकांच्या पोषणार्थ देवालयांच्या व विहारांच्या नांवें मोठमोठालीं इनामें करून दिलीं. इनामें देण्याचें प्रकरण इतकें वाढलें कीं, द्वीपांतील लागवड जमिनीपैकीं एक तृतीयांश उत्तम जमीन या देणगीकडे गेली आहे. पण तेथें इंग्रजी अंमल झाला असून इनामकमेटीबाईचा अद्यापि अवतार झालेला नाहीं हें त्या शाक्यमुनीचें पुण्य किंवा त्या खाणारांचें सुनशीब समजलें पाहिजे. असो.

भिक्षुकांची संख्या वाढूं लागल्यामुळें इनाम दिलेल्या जमीनीपासून जें उत्पन्न होई तेवढ्यावर त्यांची उपजीविका चालेनाशी झाली. तेव्हां त्या जमीनीस पाणी पोहोंचून त्यांत पीक रगड यावें ह्मणून **सद्धातिसा** रा-

जानें अठरा तलाव बांधिले असें राजावली ग्रंथांत लिहिलें आहे. वसभराजानें सोळा बांधिले; महासेन राजानें सतरा बांधिले. मिनेरीचें सरोवर याच राजानें बांधिल्याचें आह्मी पूर्वीं सांगितलेंच आहे. त्यानें वीस हजार शेतें पिकत होतीं. हा तलाव जैतवनविहारास अर्पण केला होता. एका राजानें आठ हजार शेतांची सनद करून इनाम दिलीं ह्मणून राजरत्नाकरींत लिहिलें आहे. दुतुगिमुनुनंतर त्याचे तीन चुलतबंधु गादीवर बसले; त्यांनीं महावेलीगंगेच्या उत्तर आणि दक्षिणभागांत पुष्कळ विहार बांधिल्याचें लिहिलें आहे. अग्रबोधी राजानें नागसंधी नांवाचा तलाव भिक्षुकांकरितां बांधिला. याप्रमाणें लंकेच्या सर्व भागांत मोठमोठाले तलाव, कालवे, देवालयें आणि विहार इत्यादि जीं महान् कामें झालीं आहेत त्यांचें मूळ कारण तेथील राजांचा बौद्ध धर्माविषयीं मोठा अभिमान आणि भक्ति हीं होत. हा धर्माभिमान अगर धर्मवेड एककालीं इतकें वाढलें होतें कीं, बातीयतिसा राजानें या भिक्षुकांच्या पायांस कांहीं लागून त्यांस ते धुवावयाचे पडूं नयेत ह्मणून मिहींतळ डोंगरापासून तों अनुराधपूरपर्यंत एकसारखा सात मैल गालिचा हातरून टाकला होता.

आतां थोड्या प्रसिद्ध विहारांचें वर्णन करून आह्मी हें प्रकरण शेवटास नेतों. प्राचीन पोलोनरूव शहराजवळ गालीविहार आहे. तो पराक्रमबाहुराजानें बाराव्या शतकांत तयार केला. अजंठा व वेरूळ येथील कोरींवलेण्याप्रमाणें तो विहार डोंगर पोखरून तयार केला आहे. याच्या पिछाडीस बुद्धाचा एक नैठा पुत-

ळा आहे. त्याचें कोरींव काम सुरेख आहे. बाहेरच्या बाजूस डाव्या हातास वरच्यापेक्षां अधिक मोठा आणि सुरेख दुसरा बैठा पुतळा आहे. उजव्या बाजूस दोन आहेत. एक उभा आणि दुसरा विश्रांति घेत पडलेला आहे. उभ्याची उंची २३ फूट आणि विश्रांति घेत असलेल्याची ४९ फूट आहे. याच्या आसपास जंगलांत प्राचीन व भव्य इमारती होत्या त्या अगदीं मोडकळीस येऊन सांप्रत त्यांचे अवशिष्ट भाग मात्र पुष्कळ दृष्टीस पडतात. जैतवनरामाच्या देवालयाचें वर्णन वर दिलें आहे तें येथेंच आहे. मेतेलीशहराच्या उत्तरेस अलू नांवाचा विहार आहे. त्याजविषयीं विशेष कथा पुढें इतिहासप्रकरणांत येईल. हा वलगमबाहू राजानें बांधिला. येथें डोंगरांत पोखरून भिक्षुकांस राहण्यास पुष्कळ खोल्या तयार केल्या होत्या. त्यांपैकीं सांप्रत दोन शेष राहिल्या आहेत. कालवापी सरोवराजवळ आकन नांवाचा विहार आहे. तेथें खडकांत कोरून तयार केलेली ९० फूट उंचीची बुद्धाची एक मूर्त्ति आहे. खऱ्या रीतीनें पाहिलें असतां बौद्ध धर्माच्या भिक्षुकांनीं अरण्यांत एकांतस्थळीं राहावें आणि तेथें ध्यान करावें अशी गौतमबुद्धाची आज्ञा आहे, आणि तीस अनुसरून पूर्वकालीं ते अरण्यामध्यें पर्णशालेंत किंवा डोंगराच्या गुहांत रहात होते. लंका या नांवाचा एक विहार पोलोनरूवाच्या वायव्येस आहे.

## भाग पंचवीसावा.

### प्राचीन व प्रसिद्ध शहरें.

लंकाबेटांत जे राजे झाले त्यांनीं वेगवेगळ्या शहरांत आपली गादी स्थापिली, त्यामुळें तेथें प्राचीन व प्रसिद्ध शहरें पुष्कळ आहेत. सांप्रत तीं अगदीं मोडकळीस आलीं आहेत व कांहींच्या खुणा मात्र राहिल्या आहेत. यांतील अनुराधपूर व पोलोनरुव या दोन शहरांविषयीं मात्र आह्मी विशेष वर्णन देणार; कारण तीं शहरें शेंकडों वर्षे राजधानीची जागा होती, व त्या शहरांत किंवा त्यांच्या जवळ मोठीं, नामांकित व पाहण्यासारखीं जुनीं कामें व दुसऱ्या वस्तु पुष्कळ आहेत. तर लंकाबेट पहावयास जे बुद्धाच्या जातील त्यांनीं हीं दोन शहरें व मिहिंतल डोंगरावरील कामें जाऊन पहावीं ह्मणजे त्या अपूर्व बेटांतील कांहीं पाहिल्याचें श्रेय त्यांस येणार आहे.

अनुराधपूर हें शहर राजरथभागांत कदंबनदीच्या कांठीं आहे. त्याचें दुसरें नांव अनाराजपूर असें होतें. बौद्ध लोक त्यास अति प्राचीनकालापासून मोठें पूज्य मानितात; कारण तेथें गौतमबुद्ध स्वतः गेले होते; विजय राजा लंकेंत गेला तेव्हां हें मोठें महत्त्वाचें होतें. इ० स० च्या पूर्वीं ४३७ वे वर्षीं पंडुकाभयराजानें येथें प्रथम राजधानी स्थापिली, ती १३० वर्षे येथेंच होती. पुढें कांहीं वर्षे मध्यें जाऊन पुनः राजधानी येथें झाली ती ९०० वर्षांवर येथेंच होती. अशा रीतीनें हजार बाराशें वर्षे हें शहर राजधानीची जागा होती. या

कालांत तेथील पराक्रमी राजांनीं जंगी देवालयें, विहार, वाडे इत्यादि मोठीं कामें केलीं होतीं. देवालयांत सोन्यानें मढविलेल्या रत्नजडित बुद्धाच्या मूर्त्ति वसविलेल्या असत. येथें एक पितळेचा बडा वाडा होता. त्याचें वर्णन पुढें येईल. शहराभोंवतीं वीस फूट उंचीचा तट बांधलेला होता, येथील रस्ते रुंद व सपाट होते. चंद्ररस्ता, बडा रस्ता, व महावेली गंगारस्ता, याप्रमाणें त्यांस नांवें होतीं. मोठ्या चवाठ्याच्या जागीं धर्मोपदेश करण्यासाठीं दिवाणखाने बांधलेले होते. येथें हजारों भिक्षुक राहत होते. येथें सरकारी बगीचे, बाथ्स ( न्हाण्याचीं गृहें ), त्यास लागून नाचाचे व खेळण्याचे दिवाणखाने होते. तसेच प्रवासीलोकांस राहण्यास धर्मशाला, व भिक्षागृहें आणि मोठालीं दुकानें होतीं. बडे लोक, सरकारी कामदार आणि परदेशस्थ व्यापारी यांनीं हें शहर गच्च भरून गेलें होतें. महावंशग्रंथांत या शहराविषयीं आणखी पुष्कळ वर्णन दिलें आहे. **वसभ**-राजानें नळ बांधून आणून या शहरास पाण्याचा पुरवठा केला असें दीपवंश ग्रंथांत लिहिलें आहे. हा ग्रंथ महावंश ग्रंथापेक्षां अधिक जुना आहे. इ० स० च्या चौथ्या शतकांत **फाहियान** नांवाचा प्रसिद्ध **चिनी** प्रवासी या बेटांत आला होता, त्या कालीं हें शहर अशाच भरभराटींत होतें असा त्याचा लेख आहे. आतां येथील टोलेजंग इमारती आणि दुसऱ्या पहाण्यासारख्या वस्तु यांजविषयीं थोडेंसें वर्णन देतों.

**पितळेचा वाडा.**-- हा वाडा **दुत्तुगिमुनू** यानें इ० स० च्या पूर्वी १२१ वर्षें बांधिला. यास नऊ मजले

होते, व भिक्षुकांस रहाण्यासाठीं एक हजार खोल्या असून दुसरे दिवाणखाने होते. त्यांस सोळाशें दगडी खांब होते. प्रत्येक खांब बारा फूट उंच होता. मुख्य दिवाणखान्याचे खांब सोन्याचे होते, आणि भिंतीवर वेलबुट्टीदार काम केलें असून त्यांत रत्नें बसविलीं होतीं. मध्यभागीं हस्तिदंती सिंहासन होतें. त्याच्या एके बाजूस सोन्याचा सूर्य आणि दुसरीकडे रुप्याचा चंद्र हे बसविले होते. आंत गालीचे, कोचें इत्यादि मौल्यवान सामान होतें. या वाड्याच्या छावणीस तांब्याचे पत्रे बसविले होते ह्मणून त्यास ताम्रप्रसाद हें नांव पडणें योग्य होतें, पण पितळेचा वाडा असें कां पडलें असावें हें आह्मास माहित नाहीं. महावंशांत याजविषयीं आणखी पुष्कळ माहिती दिली आहे. मुख्य राजधानीस दुर्दशा प्राप्त झाल्यावर तेथील अन्य इमारती व दुसऱ्या गोष्टी यांची काय अवस्था झाली असेल, याची कल्पना सहज करितां येते. राजधानीच्या ठिकाणीं सांप्रत कांहीं गरीब लोकांच्या झोंपड्या व एक भिकारसा बाजार हीं मात्र दृष्टीस पडतात. तत्राप तेथील पूर्वीच्या ऐश्वर्याच्या कांहीं खुणा राहिल्या आहेत, त्या पाहिल्या ह्मणजे त्याची एवढी ख्याति होती ती योग्य होती असें वाटतें.

बौद्ध लोकांच्या मताप्रमाणें महापूज्य जो बोधवृक्ष तो येथें लाविलेला असल्यामुळें प्राचीनकालापासून या शहरास महत्त्व येऊन त्याची एवढी ख्याति झाली असल्याचें आह्मी पूर्वी सांगितलेंच आहे. येथून जवळच एक मोठी अर्ध वर्तुळाकार शिला आहे. तिजवरील नकशीचें काम मोठें वाखाणण्यासारखें आहे. पहिल्या

तीन चक्रांत कमलांचे कळे, त्यांचीं पर्णें व पुष्पें हीं अनुक्रमें कोरलीं आहेत; व चवथ्यांत वेलबुट्टीचें काम, पांचव्यांत राजहंस पक्षी, सहाव्यांत पुनः बारीक पत्तीचें काम; सातव्यांत हत्ती, घोडा आणि बैल यांचीं एकामागून एक सुंदर चित्रें आणि आठव्यांत पुनः वेलबुट्टीचें बारीक काम केलें आहे. हा दगड बोवृक्षाच्या आवारांत जातांना जें मुख्य द्वार आहे तेथें पायरीस बसविला आहे. याशिवाय **बातियतिसा** राजाचें थडगें, राजे मृत झाल्यावर त्याचें दहन करण्याची जागा, राजघराण्यांतील लोकांनीं शोक करण्याची जागा, भिक्षुक लोक जमण्याचा दिवाणखाना, आणि मयूरवाडा हीं वर सांगितल्या वज्या पितळेच्या वाड्यास लागून आहेत. **दुत्तुगिमुनु** यानें तामिल लोकांपासून आपलें राज्य परत मिळविल्याचा स्मरणोत्सव करण्याकारितां **मारीचवती** नांवाचें देवालय बांधिलें तें येथून जवळ आहे. **थुपाराम**, **अभयगिरी**, **जैतवनराम** इत्यादि देवालयें येथें असल्याचें पूर्वीं सांगितलेंच आहे. येथें दोन दगडी दोणा आहेत. एक **दुत्तुगिमुनूची** स्नान करण्याची आणि दुसरी त्याच्या हत्तीस पाणी पाजविण्याची.

**पोलोनरुव**.— हें जुनें व प्रसिद्ध शहर **महावेली**-गंगेच्या पश्चिमेस आहे. इ० स० च्या आठव्या शतकांत मलबाडचे लोकांनीं द्वीपाचा उत्तर भाग व्यापून सर्व राज्यकारभार आपल्या हातीं घेतला, आणि तेथील राजास त्रास देऊं लागले. त्यांच्या त्रासापासून दूर जावें ह्मणून तिसऱ्या **अग्रबोधी**राजानें **अनुराधपूर** सोडून येथें राजधानी स्थापिली, ती सुमारें २०० वर्षें येथेंच

होती. पुढें कांहीं राजे झाले त्यांनीं दुसरीकडे राजधानी केली. पाहिला पराक्रमबाहु यानें पुनः हें शहर राजधानीची जागा केली. ती राजधानी मध्यें कांहीं खांडवे पडून, दीडशें वर्षे येथेंच होती. याप्रमाणें सुमारें ९०० वर्षे हें शहर राजधानीची जागा होती. हें तोपाविवा नांवाच्या एका तळावाच्या कांठीं वसलेलें होतें. शहराभोंवतीं मोठा तट असून आंत जाण्यास वेशी होत्या. महिंदोराजा अनुराधपूर सोडून येथें येऊन राहिल्यावर त्यानें एक किल्ला व राजवाडा, शाळा, पुस्तकालयें, वाद्यें वाजविण्याचे व नाचाचे दिवाणखाने व अनेक देवालयें बांधिलीं. पैकीं एकांत सोन्याची घडवून बसविलेली बुद्धाची मूर्त्ति होती. पराक्रमबाहूस येथेंच राज्याभिषेक झाल्यानंतर त्यानें एक वाडा व अनेक देवालयें बांधिलीं. रानकोड नांवाचें येथील देवालय त्याच्या राणीनें बांधिलें. त्याचा व्यास १८६ फूट व उंची २०० फूट आहे. पराक्रमबाहूच्या वेळीं हें शहर मोठ्या भरभराटींत होतें. त्याची लांबी ३० मैल व रुंदी १२ मैल होती. राजवाडा सात मजली असून त्यांत चार हजार खोल्या होत्या. यावरून तो केवढा विस्तीर्ण असेल व तो बांधण्यास खर्च किती लागला असेल याची कल्पना वाचकांनींच करावी. राजवाड्यावरील मुलामा केलेले मनोरे आणि देवालयांचीं शोभायमान् शिखरें खालच्या तलावांत प्रतिबिंबित होऊन चमकत होतीं. शहराभोंवतीं दाट झाडी असल्यामुळें सर्व शहर कुंजांत असल्याप्रमाणें दिसे. त्या कालीं येथील देखावा किती असेल ह्मणून सांगावा !!!

जेथें संपत्ति विपुल असते, तेथें सोन्याचा धूर निघतो असें बोलण्याची आपल्या लोकांत प्रवृत्ति आहे. तेथें सोनें विपुल असलें पाहिजे असें नाहीं. आह्मीं एथपावेतों जें वर्णन दिलें आहे त्यावरून लंकाबेटांत सर्व प्रकारची संपत्ति प्राचीनकालापासून होती व आहे, हें वाचकांच्या लक्षांत आलेंच असेल. या संपत्तीचा विचार केला ह्मणजे सोन्याची लंका किंवा लंकेंतील सोन्याच्या विटा अशी जी आपल्या लोकांत ह्मण पडली आहे ती सार्थ आहे असें आह्मांस वाटतें. अस्तु. **मलबाडचे** लोकांनीं दोन वेळ हें शहर लुटून फस्त केलें. सांप्रत हें अगदीं ओस पडलें आहे तथापि राजवाडा, सात महालीप्रासाद, टोपरे येथील वर्तुलगृह, रानकोटचें व जैतवनरामाचें देवालय यांचे जे भाग अवशिष्ट राहिले आहेत ते तेथील प्राचीन ऐश्वर्य आणि वैभव पुरेपणीं दाखवितात. येथें गांवसभेची एक दगडी इमारत होती. तिचे दगडी खांब मात्र हल्लीं दृष्टीस पडतात. वर सांगितलेलीं दोन देवालयें आणि **गालीविहार** हीं शहराच्या उत्तरेस आहेत.

**विजितपूर.**— **कालव्यापी** सरोवराजवळ विजितपूर ह्मणून एक शहर होतें. **पंडुवासराजाचा** मेहुणा **विजित** यानें तेथें राजधानी स्थापिली ह्मणून त्यांस त्याचें नांव पडलें. **अनुराधपूर** हें खेडें होतें तेव्हां ह्मणजे इ० स० च्या १०० वर्षांपूर्वीं हें मोठें शहर असून त्यांत एक किल्ला होता; त्यास तिघई तट असून आंत जाण्यास एक लोखंडी वेश होती. सांप्रत किल्ल्याचा पाया, टाकी दिलेले दगडी खांब, दगडाच्या दोणी, आणि मातीचे ढीग मात्र दृष्टीस पडतात. **गंपोल** यास प्राचीनकालीं

गंगाश्रीपूर असें ह्मणत. हें शहर महावेलीगंगानदीच्या काठीं होतें, येथें पांचवा भुवनकबाहू यानें राजधानी स्थापिली. त्याच्या मागून विजयबाहू गादीवर बसला. येथें इ० स० १४०५ त चिनईसरदार चिंगहो यानें त्याचा पराभव करून त्यास कैद केलें, आणि नान्-किन येथें नेलें. हें शहर कोठें होतें याची खूणसुद्धां राहिलेली नाहीं. आलीकडे तेथें बुंदाची लागण मोठ्या झपाट्यानें चालू आहे. त्याच्या मागून सहावा श्रीपराक्र-मबाहूराजा झाला. त्यानें कोटा हें शहर राजधानी केली. त्याचें प्राचीन नांव जयवर्धनपूर हें होतें. नंतर सीतावक येथें राजधानी झाली. हें प्राचीन शहर क-ल्याणी नदीच्या शाखेवर आहे. रावणानें सीतेस चो-रून नेऊन येथें ठेविली होती ह्मणून या स्थलास सी-तावक नांव पडलें अशी दंतकथा आहे. पोर्तुगीज लो-कांनीं हें शहर अगदीं उद्वस्त केलें. पण तेथील वा-ड्याच्या व देवालयाच्या कांहीं खुणा मात्र दृष्टीस पडतात. येथून आदमस्पीक व त्यावरून पडणारे धब-धबे पाहून मनास करमणूक वाटते. प्राचीन इतिहासाच्या संबंधानें बिंतेनची कीर्त्ति अनुराधपूरापेक्षां विशेष आहे. विजयराजानें लंकेवर स्वारी करण्यापूर्वीं हें एक मुख्य शहर होतें. गौतमबुद्ध येथें येऊन महानग बागेंत जेथें उतरले त्या स्थलीं त्यांच्या उतरण्याचें स्मरण रहावें ह्मणून देवानपियतिसा राजाच्या भावानें देवालय बां-धिलें त्याचा अवशिष्ट भाग अद्यापि दृष्टीस पडतो. या-शिवाय रोहन, डांबिदिनिया, मातेली इत्यादि जुनीं व प्रसिद्ध शहरें होतीं.

## भाग सव्वीसावा.

### प्राचीन व प्रसिद्ध स्थलें.

लंकाबेटाच्या पूर्वेस ब्यातिकेलो नांवाचा एक किल्ला आहे. हा समुद्राच्या कांठीं **पिलियातिवो** (चिचेचें) नांवाच्या लहान बेटावर आहे. या प्रदेशांत पुष्कळ प्रवाह आहेत. ते एकत्र होऊन त्यांच्या योगानें तीस चाळीस मैल लांब व दोन तीन मैल रुंदीचा एक तलाव झाला आहे. त्यावर नानाप्रकारचे जलचर पक्षी विपुल आहेत. तेथें नारळीचें बन किती मैल लागून गेलें आहे तें पूर्वींच सांगितलें आहे. आसपास अन्य वृक्षांची झाडी दाट आहे. त्यांत शोभायमान् पिसाऱ्यांचे पक्षी दृष्टीस पडतात. येथील देखावा मोठा रमणीय आहे. किल्ल्यांत एक लहान तलाव आहे, त्यांत गाणारे मासे आहेत ह्मणून सांगतात. येथून थोड्या अंतरावर **वेनलुसचा** उपसागर आहे. त्यांत निरनिराळ्या रंगाचे व आकाराचे शिंपले पुष्कळ सांपडतात. येथें बराच व्यापार चालतो. तो बहुतकरून **मूर**लोकांच्या हातीं आहे.

**रामचंद्रांनीं काढिलेली विहीर.**— जापनेद्वीपकल्पापासून सुमारें एकवीस मैलांवर **पेद्रो** भूशलाका आहे; तेथून जवळ **पोतूर** नांवाची एक विहीर आहे तिचा व्यास ३० फूट आणि खोली १४० फूट आहे. तिच्या सभोंवतालचा प्रदेश समुद्राच्या सपाटीपेक्षां १५ फूट उंच असून तींतील पाण्याचा कांहीं चमत्कार आहे; तो असा कीं, वरचें पाणी गोडें, मधील मचूळ आणि

तळाचें अगदीं क्षार आहे. या पाण्याचा दुसरा एक असा चमत्कार आहे कीं, प्रत्येक बारा तासास तिचें पाणी थोडे इंच चढतें आणि उतरतें; पण कधीं वरून वाहत नाहीं किंवा फार खालीं जात नाहीं. तिचा उपसा करण्याकरितां **सर ए. बार्नस** साहेब गवर्नर असतां दोन दिवस तीन बंब सतत लाविले होते, पण पाणी ह्मणण्यासारखें उतरलें नाहीं. दंतकथेवरून असें समजतें कीं, रामचंद्र स्वारी करून लंकेंत गेले, त्या वेळीं त्यांचें सैन्य तृषाक्रांत होऊन अगदीं थकून गेलें, तेव्हां त्यांनीं एक बाण मारून पाणी काढिलें ती ही विहीर. अशाच प्रकारें **मोजेस** यानें खडक फोडून **इजरलाइत** लोकांकरितां पाणी काढिल्याची कथा आहे. अशाच प्रकारचा दुसरा एक तलाव रामचंद्रांनीं तयार केला आहे, अशी मुंबईंतील एका तलावाविषयीं दंतकथा आहे.

**शिवाचें देवालय.**— **त्रिंकोमाली**जवळ एक टेंकडी आहे त्यास **सामी** असें ह्मणतात. तिजवर हजार खांबांचें एक शिवालय होतें. त्याच्या दर्शनास सर्व हिंदुस्थानांतील यात्रेकरू लोक जात असत. याजविषयीं एक चमत्कारिक कथा आहे, तींतील हांसल येथें सांगतों. दक्षिणेंतील एका राजाच्या राज्यावर धोका येणार आहे आणि त्यानें आपली लहान कन्या बळी दिली असतां त्याचें निवारण होणार आहे ह्मणून एककाळीं आकाशवाणी किंवा भाकणूक झाली. तेव्हां राजानें चंदनाच्या पेटींत तिला घालून ती समुद्रांत सोडली; ती जाऊन **त्रिंकोमालीच्या** दक्षिणेस लागली, तें स्थल **प्यानोआ** ( हस्तमुखबाल ) या नांवानें अद्यापि

प्रसिद्ध आहे. तेथील राजानें तिला मांडीवर घेऊन आपलें राज्य दिलें. इकडे एका हिंदु राजपुत्रास पुराणावरून असें समजलें कीं, देवांचें युद्ध होत असतां सुवर्णमय मेरुपर्वताचा तुकडा उडून पडला, तो **त्रिकोमालीचा** खडक होय. तेव्हां तो **लंकेंत** गेला आणि त्यानें वरील शिवालय बांधिलें. हें वर्तमान राजकन्येस समजलें तेव्हां त्यास हांकून देण्यास तिनें सैन्य पाठविलें; पण तिनें त्यास वरिलें आणि लढाई होण्याची बंद केली; पुढें तिनें देवालयासभोंवतीचीं मोठीं शेतें इनाम करून देऊन त्यास पाणी पोंचण्याकरितां तलाव तयार केला, नंतर हा राजा मेला तेव्हां सुवर्णकमलावर बसवून त्यास शिवाच्या सन्निध नेलें अशी कथा आहे.

**कोरींवलेणीं.**—आपल्या देशांत **घारापुरी, वेरूळ, कारली** इत्यादि ठिकाणीं जशीं कोरींवलेणीं आहेत त्याप्रमाणें लंकेंतही **महीतलावर** व अन्यत्र **दृष्टीस** पडतात. हीं लेणीं बौद्धधर्माच्या अनुयायी लोकांनीं ध्यान व तपश्चर्या करण्यास राहण्याकरितां तयार केलीं होतीं. **महिंदो** प्रथम लंकेंत आला तो याच डोंगरावर उतरला आणि पुढें येथेंच निवर्तला ह्मणून यास त्याचें नांव पडलें आहे. या डोंगराची उंची हजार फूट आहे, आणि वर चढून जाण्यास एक हजार पायऱ्या खडकांत कोरून तयार केल्या आहेत. त्याच्या शिखरावर **अंबुस्तला** नांवाचें देवालय आणि **एट** ह्मणून एक विहार आहे. देवालयाभोंवतीं कोरींवलेणीं आहेत. **देवानंपीयतिसा**राजाची आणि **महिंदोची** भेट येथेंच झाली. येथें राजाचा एक मोडका पुतळा आहे. **लंकेंतील** राजांनीं औदार्याचीं

पुष्कळ कामें केलीं त्याजविषयीं येथें खडकांत कोरलेले अनेक लेख आहेत. दांबुल नांवाच्या देवालयाचें वर्णन पूर्वीं दिलें आहे तें एक कोरींवलेलेंच आहे.

**अद्भुत विहीर.**— जापनेच्या उत्तरेस बारा मैलांवर एक विहीर आहे. तिची कथाही मोठ्या मौजेची आहे. ती अशी कीं, दक्षिण हिंदुस्थानांत एक राजा सिंहमुखी जन्मास आला. वरील विहीरींत स्नान केलें असतां आपला विरूपपणा जाईल असें कळतांच तो तेथें गेला व स्नान केलें, तेव्हां त्यास लागलेंच मनुष्याचें मुख प्राप्त झालें. पुढें तंजावरच्या राजास अश्वशिरी कन्या झाली. तेव्हां शिवपुत्र जो स्कंद त्यानें तिच्या स्वप्नांत जाऊन वरील विहीरींत स्नान करण्यास तिला सांगितलें. त्याप्रमाणें करितांच तिला सुंदर रूप प्राप्त झालें. पुढें वरील राजाबरोबर तिचें लग्न झालें. हा अलौकिक गुण स्कंदानें त्या विहिरीस दिला होता. कांगसेन ह्मणून त्याचें दुसरें नांव आहे. या नांवाचें बंदर जापनेच्या उत्तरेस आहे व ही विहीर त्या बंदराजवळ आहे.

**कनियाचा उन्हाळा.**— हा उन्हाळा त्रिंकोमालीच्या पश्चिमेस आहे. रावणमातेच्या नांवावरून हें नांव त्या उन्हाळ्यास पडलें आहे. तेथें भक्तिमान् लोक आपल्या गत आप्तांच्या तेराव्या दिवशीं जाऊन क्रियाकर्म करितात. येथून जवळ गणपतीच्या जुन्या देवालयाचा अवशिष्ट भाग दृष्टीस पडतो. बादूला, कितूल वगैरे पुष्कळ उन्हाळे आहेत.

# भाग सत्तावीसावा.

## प्राचीनलोक.

गौतमबुद्ध किंवा विजयराजा लंकेंत जाण्यापूर्वीं तेथील स्थिति कशी होती हें कळण्यास कांहीं आधार मिळत नाहीं; त्या वेळीं यक्ष ( याको ) व नागलोक तेथें रहात होते असें मात्र समजतें. हे लोक आपल्या देशांत दक्षिणेकडील मूळच्या राहणाऱ्यांची शाखा असावी असें अनुमान वाटतें; कारण दक्षिणेकडील तामिल, तेलंग आणि दुसऱ्या भाषा यांत आणि त्यांच्या भाषेंत मेळ दिसतो. दुसरें एक कारण असें आहे कीं दोन्हीं लोकांच्या धर्मवेड समजूतींतही बराच सारखेपणा आढळतो. आर्यलोक आपल्या देशांत येण्यापूर्वीं येथील मूळच्या रहाणाऱ्या लोकांस कलाकौशल्य माहीत नसून ते जसे डोंगरांत किंवा अरण्यांत राहून कंदमूलावर किंवा पारधीच्या उत्पन्नावर आपला निर्वाह करीत होते त्याप्रमाणें हे लोक करीत होते असें दिसतें. सर्व देशांतील मूळचे रहाणारे लोक अशाच प्रकारच्या स्थितींत होते व असतात. बंगालदेशच्या लोकांनीं लंकेंत प्रवेश केला, तेव्हां यक्षलोक द्वीपाच्या आंतील भागांत आणि नागलोक उत्तर व पश्चिम किनाऱ्यावर जाऊन राहिले.

सांप्रत वेद्दास ह्मणून एक जातीचे लोक आहेत ते यक्षलोकांचे वंशज आहेत असें कांहीं लोकांचें मत आहे. आपल्या देशांत भिल्ल लोक जसे मोठ्या अडाणी अवस्थेंत आहेत त्याप्रमाणें ते आहेत. त्यांत दोन भेद आहेत. एक खेड्यांत राहतात. दुसरे डोंगराळ प्रदेशांत

रहातात. पहिल्या प्रकारचे लोक एक जातीचें धान्य पेरून त्यावर उपजीविका कारितात, आणि चिखलानें व सालीनें झोंपड्या बांधून त्यांत राहतात. डोंगराळ प्रदेशांत राहणारे फळें, मुळें, मासे व मध खाऊन राहतात. हे पदार्थ द्वीपांत किती विपुल सांपडतात हें पूर्वींच सांगितलें आहे. दोनही जातीचे लोक पक्षी, कावळे, घुबडें, घारी इत्यादि प्राणी खातात; पण अश्वल, हत्ती व रेडा यांस ते शिवत नाहींत. त्यांची व्यापार करण्याची रीति मोठी चमत्कारिक व रानटी आहे. ते गिऱ्हाइकाच्या दृष्टीस पडत नाहींत. त्यांस जे पदार्थ विकावयाचे असतील ते गांवापासून दूर नेऊन ठेवितात, आणि त्यांजवळ आपणास जे पदार्थ बदला पाहिजे असतील त्यांच्या खुणा करून ठेवितात. देव, देवालयें, मूर्त्ति, प्रार्थना, स्वर्ग यांचें त्यांस ज्ञान नाहीं. त्यांच्या भाषेंत शब्द भरणा फार थोडा आहे. त्यांचें ज्ञान ( समज ) किती बाल्यावस्थेंत आहे याचें निरूपण पुढील प्रकरणांत येणार आहे. त्यांच्यांत कोणी मेलें असतां मुडद्यास मूठमाती न देतां तो ते पाचोळ्यानें व कांट्यांकुट्यांनीं झांकून ठेवितात; याप्रमाणें ते अगदीं रानटी स्थितींत आहेत तरी सिंहली लोक त्यांस मोठ्या कुलांतील ह्मणून मानितात.

नागलोक पूर्वकालीं द्वीपांच्या वायव्येस राहत होते; जापनेच्या द्वीपकल्पास सिंहलीलोक नागद्वीप असें ह्मणत. त्या द्वीपकल्पांत एक देवालय आहे त्यांत नागदेवता बसविलेली असून तेथील लोक तिला भजतात आणि तिजपुढें अद्याप पैसा अडका ठेवितात. राजरत्ना-

कराच्या मताप्रमाणें नागलोकांचें राज्य **कल्याणी**नदी-च्या कांठीं होतें. महावंश ग्रंथाच्या मताप्रमाणें त्या नांवाचें राज्य आपल्या देशांत होतें, व दक्षिणेंत ब्राह्मणधर्म चालू झाला तरी त्यामुळें नागपूजा अगदीं नाहींशी झाली नव्हती. यावरून द्वीपांतील मूळचे राहणारे हे **कलिंगदेशां**तून गेले असावे असें अनुमान करितात. **गौतमबुद्ध** दुसऱ्या खेपेस बेटांत गेले तेव्हां **कल्याणीचा नाग** ह्मणून राजा होता त्यानें त्याजपासून बौद्ध-धर्माची दीक्षा घेतली. नागलोक हे मूळचे जुनाट असें आपल्या पुराणावरूनही दिसतें. **तंजावरची अश्वशिरा** राजकन्या आपला कुरुपपणा घालविण्याकरितां द्वीपांतील विहिरींत स्नान करण्यास गेल्याचें आह्मी पूर्वीं सांगितलेंच आहे. तिजबरोबर जे लोक गेले त्यांस **तामिल** ह्मणत, त्यांनीं नागलोकांस हांकून लाविलें. **कैलासमाला**नांवाची एक कविता आहे, तींत तामिल लोकांचें द्वीपांत आगमन आणि नागलोकांचें विसर्जन याजविषयीं वर्णन दिलें आहे. **कोलंबो** येथील **रायल एशियाटिक** जर्नलांत **जाफनेद्वीप**कल्पाचा संक्षिप्त प्राचीन इतिहास दिला आहे त्यांत त्या कवितेचें तात्पर्य दिलें आहे. रोदिया नांवाचे एक जातीचे लोक आहेत, त्यांस वेदास किंवा आपल्या देशांतील चांडाल यांचे वंशज ह्मणून ह्मणतात, आणि आपण जसे चांडालास अति नीच मानितों त्याप्रमाणें त्यांस मानितात. त्यांच्या बायका मोठ्या रूपवान् आणि सुबक बांध्याच्या असतात. आपल्या देशांतील डोंबारी लोकांप्रमाणें अंगकसरतीचीं कामें करून दाखविण्यांत ते मोठे तरबेज आहेत.

# भाग अठावीसावा.

## जुन्या चाली व समजुती.

लग्नसंबंधानें लंकाबेटांत दोन मोठ्या निंद्य चाली होत्या. एक, तेथील राजे आपल्या बहिणीबरोबर लग्न करून घेत. त्याचें कारण असें सांगतात कीं तेथील कोणी एक राजा तलाव बांधीत असतां एक पिशाच रात्रीं येऊन तलावाचा बांधलेला बांध मोडून टाकीत असे तेंव्हां अशी भाकणूक झाली कीं त्या पिशाचाच्या दुष्ट इच्छेचा नाश होण्यास एक राजपुत्र बळी दिला पाहिजे. राजानें आपला मुलगा अर्पण करण्याचें मनांत आणिलें. पण राणीनें ती गोष्ट नाकारली असतां त्याच्या बहिणीनें आपण होऊन आपला मुलगा बळी देण्याकरितां राजाच्या स्वाधीन केला. तेंव्हां तिचा देशाभिमान पूज्य आहे हें दाखविण्याकारितां राजानें असा ठराव केला कीं, यापुढें गादीस मालक राजपुत्र न होतां बहिणीचा मुलगा होत जावा. गादीस भाचा वारस होण्याची चाल सिलहित, काचार व कानडा येथें ही चाल चालू आहे. कालिकट येथील झामोरिन पदावर भाचा बसत असे. रामेश्वर येथील पुजारी या चालीस अनुसरून होत असतो. वर सांगितल्या कारणावरून भाचा वारस होण्याची चाल पडली असेल; पण बहिणीशीं लग्न करण्याची चाल कशावरून पडली होती याचें कारण स्पष्ट होत नाहीं.

आतां दुसऱ्या चालीचें कथन करितों. द्रौपदी जशी पांच पांडवांत एकच बायको होती, त्याप्रमाणें चार

पांच भावांत एकच बायको करून घेण्याचा संप्रदाय थोड्या वर्षांपूर्वी येथें चालू होता. ही चाल पडण्याचें कारण असें सांगतात कीं, पूर्वी शेतकरी लोकांस राजाची चाकरी करण्यास वारंवार जावें लागत असे, व घरचा मालक चाकरीवर गेला ह्मणजे, त्यांच्या घराचें, शेताचें, व मुलांबाळांचें रक्षण करण्याकरितां मागें कोणी रहात नसे. तें रक्षण चांगलें व्हावें ह्मणून घरीं आपल्या जागीं दुसरा मालक तयार करून ठेवणें भाग पडे; आणि तो आपल्या शेताचें व बायकांमुलांचें आपल्याप्रमाणें रक्षण करी. याशिवाय सर्वांचें घर एक असल्यामुळें मालमत्तेच्या वांटण्या करणें जरूर पडत नसे. इंग्रजसरकारचा बेटांत अंमल होत चालल्यापासून ही निंद्य चाल कमी होत गेली, व ती अजी बंद करण्यासाठीं सरकारानें कायदाही केला आहे. ही निंद्य चाल काश्मीर, शिवालिकपहाड, तिबेट व काचार इत्यादि प्रांतांत अद्याप चालू आहे. ह्मैसूर राज्यांतील कुर्गलोकांत व निळगिरीचे तोडास जातीच्या लोकांत चार पांच पुरुष मिळून एक बायको करितात, आणि ते बहुतकरून बंधु असतात. जुलियससीझरानें ब्रिटनवर स्वारी केली, तेव्हां ही चाल तेथें चालू होती.

# प्रकरण दुसरें.—भाग पहिला.

## प्राचीन इतिहास.

लंकाद्वीपाच्या महत्त्वाचें वर्णन करितेवेळीं व अन्य स्थलीं आह्मीं असें सांगितलें आहे कीं, ह्या द्वीपासंबंधीं प्रत्येक विषय एवढा प्रगल्भ व महत्त्वाचा आहे कीं, त्याजविषयीं पूर्ण माहिती देणें ह्मणजे प्रत्येक विषयावर एकेक ग्रंथ होणार. आतां ह्या द्वीपांतील सर्व राजांची संक्षिप्त कथा देण्याचा विचार मनांत आणिला तरी ग्रंथविस्तार विशेष होऊन त्यांत वाचकांस फार रहस्य वाटणार नाहीं; करितां जे राजे मोठ्या सद्गुणांनीं किंवा दुर्गुणांनीं प्रसिद्धि पावले, किंवा ज्यांच्या कारकीर्दींत विशेष महत्त्वाच्या बऱ्यावाईट गोष्टी झाल्या त्यांच्याविषयीं होईल तितकी थोडक्यांत माहिती देण्याचा विचार केला आहे.

कोणत्याही देशाचा इतिहास लिहिण्यास जीं साधनें अवश्यक लागतात त्यांचा अभाव असल्यामुळें या द्वीपाचा विश्वसनीय व संगतवार इतिहास लिहितां येणार नाहीं असें पुष्कळ वर्षें वाटत होतें. या बेटांत डच, पोर्तुगीज, आणि इंग्रज लोकांनीं अनुक्रमें अंमल केले. या राष्ट्रांच्या विद्वानलोकांनीं यत्न करून कांहीं माहिती मिळविली आणि इतिहास ह्मणून लिहिले. पण इतिहासदृष्टीनें पाहिलें असतां त्यांच्या ग्रंथांत विशेष रहस्य नसून ते चांगले विश्वसनीय व संगतवार नाहींत. मि. टर्नर नांवाचा इंग्रज मुलकीखात्यांतील कामगार या प्रांतास लागला असतां त्यास असें समजलें कीं, लंकेच्या

माहितीविषयीं जुनीं पुस्तकें पुष्कळ आहेत. त्यांत येथील राजे व दुसऱ्या गोष्टी यांविषयीं विश्वसनीय व संगतवार माहिती दिलेली आहे. ती मलगिरी नांवाच्या विहारांत होती ती त्यास एका भिक्षुकविद्वानाच्या मदतीनें मिळाली. तीं पुस्तकें, बखरा, वार्षिककथा, व दुसरी माहिती जमवून त्यानें या द्वीपाचा इतिहास लिहिण्यांत आपलें सर्व आयुष्य घालविलें.

या पुस्तकांत मुख्य ग्रंथ ह्मटला ह्मणजे महावंशो ( महावंश ) हा होय. आतां या ग्रंथाविषयीं प्रथम थोडीशी माहिती सांगतों. इतिहासाच्या संबंधानें या ग्रंथास लंकाबेटांतील राजतरंगिणी ह्मटलें असतां चालेल. हा पालीभाषेंत पद्यात्मक लिहिला आहे. या भाषेविषयीं थोडीशी माहिती पुढें येईल. यांत शंभर अध्याय आहेत, आणि याजवर एक चांगली टीका आहे. यांत सुमारें २४०० वर्षांची कथा दिली आहे. यास वेळोवेळीं नवीन भाग जोडले आहेत. राजतरंगिणींत काश्मीर देशांतील राजांचें वर्णन दिलें आहे, त्याप्रमाणें यांत लंकेंतील राजांचें दिलें आहे, व तिचा कर्त्ता जसा एकच नव्हता त्याप्रमाणें याचाहि एकच नाहीं. पहिल्या भागांत विजयराजा लंकेंत आल्यापासून महासेनराजापर्यंत सुमारें आठशें वर्षांची कथा दिली आहे. याचा कर्ता महानेमो होता. हा धातुसेन राजाचा चुलता होता. यानें अनुराधपुर येथील वार्षिक इतिहासांच्या आधारानें पूर्व भाग लिहिला. दुसरा भाग पराक्रमबाहु राजानें लिहून तयार करविला. हा ग्रंथ भरंवसा ठेवण्यासारखा आहे ह्मणण्याविषयीं येथें एक गोष्ट सांगतों.

राजतरंगिणींत काश्मीरदेशाचें व तेथील राजांचें वर्णन असून लंकेंतीलही माहिती दिली आहे. त्याप्रमाणें महावंशांत लंकाद्वीपांतील राजांचें व दुसरें वर्णन असून आपल्या देशांत बौद्धधर्माचा प्रसार इ० स० च्या पूर्वी ६०० वर्षांपासून इ० स० च्या ३०० वर्षेपर्यंत झाला, त्याची कथा दिली आहे.

महावंशाशिवाय दुसरे ग्रंथ ज्यांच्या आधारें हा इतिहास तयार झाला ते सांगून आह्मी मुख्य विषयाकडे वळतों. ते ग्रंथ दीपवंश, राजावली, राजरत्नाकरी, लंकाविस्तार्य इत्यादि होत. दीपवंश महावंशापेक्षां अधिक जुना आहे. हे सर्व ग्रंथ पालीभाषेंत लिहिलेले आहेत. याशिवाय प्राचीनकालापासून दूर दूर देशाचें या द्वीपाशीं दळणवळण असल्यामुळें इतली, ग्रीस, इजिप्त, चीन, इराण, तिबेट, ब्रह्मदेश व आपला देश यांत या द्वीपाच्या माहितीविषयीं जुने लेख आहेत त्यांचा येथील इतिहास लिहिण्याच्या कामीं मोठा उपयोग होतो. वरील कलमांत महावंशांतील आणखी एक गोष्ट सांगण्याची राहिली ती येथें सांगतों. मगध (प्राची) देशांतील राजे चंद्रगुप्त व अशोक हे बौद्धधर्माचे मोठे पुरस्कर्ते होते. यांचा लंकेंतील राजाशीं स्नेह असल्यामुळें वरील ग्रंथांत या दोघांविषयीं अनेक ठिकाणीं उल्लेख आला आहे. चंद्रगुप्तराजाच्या दरबारांत ग्रीसदेशाहून म्यागास्थनीस नांवाचा वकील आला होता. त्यानें आपल्या ग्रंथांत मगधदेशाविषयीं व लंकेविषयीं वर्णन दिलें आहे, त्यास आणि महावंशांतील वर्णनास पुष्कळ मेळ आहे. आपल्या देशांतील राजांचे लंकेंतील

राजांशीं शरीरसंबंध झाले होते. त्यांचें वर्णन वरील ग्रंथांत दिलें आहे त्यावरून ते राजे कोणत्या शतकांत राज्य करीत होते हें अधिक निश्चयानें ठरवितां येतें. वरील ग्रंथाचा इंग्रजींत तरजुमा झाला आहे. हा मूलग्रंथ व पालीभाषेंतील दुसरे ग्रंथ आह्मी कोलंबो येथील पुस्तकालयांत व संस्कृत पाठशाळेंत व कर्यांदी येथील पुस्तकसंग्रहांत पाहिले.

लंकेच्या इतिहासाचे चार भाग करण्याचें आह्मी योजिलें आहे. पहिल्यांत द्वीपस्थराजांची कारकीर्द; दुसऱ्यांत पोर्तुगीजलोकांची कारकीर्द. त्याच्या मागून डचलोक आले त्यांची तिसऱ्यांत, आणि चौथ्यांत सांप्रत तेथें अंमल करणारे जे इंग्रजबहादर यांची कारकीर्द. येथें १६९ राजांनीं सुमारें २३०९० वर्षें राज्य केलें. त्यांत दोन घराणीं झालीं. पहिल्या ह्मणजे थोरल्या घराण्यांतील राजांस महावंशांचे राजे ह्मणतात. कारण त्यांतील राजांनीं मोठीं पराक्रमांचीं कामें करून आपली शक्ति वाढविली, ह्मणून त्यांस महावंशाचे हा किताब मिळाला. दुसऱ्या घराण्यास सुलुवंशाचे राजे ह्मणतात. त्यांच्या वेळीं मलबाड किनाऱ्यावरच्या लोकांनीं लंकेंत जाऊन तेथील राजांस जर्जर करून त्यांच्या सत्तेचा ऱ्हास केला ह्मणून त्यांस लहान घराण्याचे राजे असें ह्मणूं लागले. मलबाड या शब्दानें दक्षिणेकडील व पूर्वेकडील दिशेच्याच भागांतील असें समजण्याचें नाहीं, तर कटक आणि ओरीसाप्रांतांपर्यंत दक्षिण द्वीपकल्पाच्या सर्व भागांतील सर्व लोकांचा मलबाड या शब्दांत समावेश होतो. पांडियांच्या राजां-

ची गणनाही याच शब्दांत येते. महावंश वराण्यांतील चौपन्न राजांनीं सुमारें साडेआठशें वर्षें राज्य केलें. महासेन हा त्यांतील शेवटचा राजा झाला.

वेजो ( विजय ) राजा लंकेंत गेला त्या कालीं तेथें कोण राजा राज्य करीत होता व त्या वेळची तेथील स्थिति कशी होती याजविषयीं भरंवसा ठेवण्यासारखी चांगली माहिती मिळत नाहीं. सिंहली दंतकथेवरून इतकें मात्र समजतें कीं तो गेला त्या वेळीं यक्ष व नाग अशा दोन जातींचे लोक तेथें रहात होते, आणि लंकापूर ह्मणून यक्षलोकांची राजधानी होती. विजय हा गंगानदीच्या खोऱ्यांत सिंहबाहुनांवाचा राजा राहत होता त्याचा वडील मुलगा होता. त्याची माता कलिंग, ज्यास सांप्रत ( उत्तर सरकारस ह्मणतात ) त्या देशाच्या राजवराण्यांतील कन्या होती. तो लहानपणीं फार पुंड होता, आणि मोठा झाला तेव्हां लोकांवर फार जुलुम करून त्यांस छळूं लागला. जुलुम झाल्याची ओरड त्याच्या बापाकडे गेली तेव्हां बापानें त्याचा राज्यावरील हक्क काढून टाकून त्यास हांकून दिलें.

तेव्हां थोडेसे लोक बरोबर घेऊन तो मच्छलीपट्टणच्या उत्तरेस महालंका नांवाचें बंदर आहे तेथें जहाजांत बसला आणि लंकेंत पुत्तलम गांवाजवळ येऊन उतरला. फाहिआन नांवाचा प्रसिद्ध चिनी प्रवासी असें लिहितो कीं, गौतमबुद्ध लंकाद्वीपांत जाण्याच्या पूर्वींपासून त्या द्वीपाची संपत्तीची प्रसिद्धि होती आणि साहजीक व्यापारी रत्नें मिळविण्याच्या उद्देशानें तेथें जात होते. सिंहली इतिहासकर्ते आपल्या द्वीपास महत्त्व आ-

णण्याकरितां असें लिहितात कीं, विजयराजाचें द्वीपांत आगमन आणि गौतमबुद्धाचा अंतकाल या दोन्ही गोष्टी एककालीं घडल्या. पण या त्यांच्या लेखास चांगला आधार नाहीं; कारण बुद्धाचा अंतकाल झाल्यावर विजय हा पुढें पुष्कळ वर्षांनीं लंकेंत गेला. पुढें त्यानें तेथील एका यक्षसरदाराच्या कन्येबरोबर लग्न केलें. तिचें नांव कुविनी होतें. तिच्या मदतीनें सर्व बेट त्यानें हस्तगत करून घेतलें; आणि तामानांन्युरा येथें राजधानी स्थापिली. ही गोष्ट इ० स० च्या पूर्वीं ५४३ वे वर्षीं झाली, आणि विजय हा तेथील प्रथम राजा झाला.

कुविनी हलक्या जातीची आणि आपली राणी असण्यास योग्य नाहीं असा विचार करून राजानें तिचा त्याग केला आणि हिंदुस्थानच्या अग्नेय प्रांतांतील पांडियाचें जें प्राचीन राज्य तेथील राजाच्या कन्येबरोबर लग्न केलें. तें राज्य सांप्रत मधुरा नांवानें प्रसिद्ध आहे. कुविनीचा त्याग केला तेव्हां तिला एक पुत्र व एक कन्या अशीं दोन मुलें झालीं होतीं. त्यांस बरोबर घेऊन ती लंकापूरगांवीं जावयास निघाली असतां वाटेंत लोकांनीं विश्वासघातकी ह्मणून ठार मारिली. बायकोच्या मदतीनें विजयानें सर्व बेट घेतलें असें वरील कलमांत लिहिलें आहे; ती कथा अशी आहे कीं, तेथील कोणी एक मुख्य सरदार लग्नानिमित्त मेजवानी करीत असतां विजयास आपल्या बायकोच्या संधानानें अनुयायी बरोबर घेऊन त्या मेजवानीस जाण्यास सांपडलें. आपले प्राणावर संकट येणार हें मेजवानी करणाऱ्या लोकांस माहित नसल्यामुळें ते बेसावध असतां बायकोनें इशारा

कारितांच **विजय** व त्याचे अनुयायी त्याजवर जाऊन पडले आणि त्यांनीं त्यांची कत्तल उडविली. या विश्वासघाताकरितां **कुविनीस** वर सांगितलेलें प्रायश्चित्त मिळालें. **वेदास** ह्मणून लोक आहेत ते हिचे वंशज ह्मणतात. द्वीपस्थलोकांस शेतकी माहित नव्हती ती **विजयानें** शिकविली, आणि आपल्या बरोबरचे लोक द्वीपांत पाठवून वसाहत केली. त्यास संतति नव्हती ह्मणून मरणकालच्या पूर्वीं आपल्या भावास गादीवर बसण्यास पाठवावें ह्मणून त्यानें बापास विनंतिपत्र पाठविलें. इकडे पत्र येण्यापूर्वींच त्याचा बाप निवर्तला होता. तेव्हां त्याच्या भावानें आपला मुलगा **लंकेंत** गादीवर बसण्यास पाठविला. तो येण्यापूर्वींच **विजयाचें** देहावसान झालें. मध्यंतरीं कारभाऱ्यानें काम चालविलें. **विजयराजानें** सुमारें ६१ वर्षें राज्य केलें.

त्याच्या मागून त्याचा पुतण्या **पंडुवास** हा गादीवर बसला. त्यानेंही आपल्या देशांतील एका राजकन्येशीं लग्न केलें. ती **गौतमबुद्धाची** आप्त होती. तिजबरोबर तिचे सहा बंधु **लंकेंत** गेले. त्यांनीं स्वतंत्र सहा संस्थानें स्थापून त्यांतील मुख्य गांवांस आपलीं नांवें दिलीं. त्यांतील तिन्हींचीं नांवें सांगतों; **रोहण** हें दक्षिणेस आहे. **अनुराधपूर** ( पुढें **अनाराजपूर** ) नांवानें प्रसिद्ध झालें; तिसरें **विजितपूर**. पुढें **दुत्तुगिमुनूच्या** कारकीर्दींत त्याजवर मोठा वेढा पडला होता. **अनुराधपूर** येथील **अभयविवा**नांवाचा जो महान तलाव तो याच राजानें बांधिला. हा सर्वांत जुना आहे ह्मणजे **लंकेंतील** पहिला तलाव होय. त्याच्या वेळीं द्वीपाचे तीन भाग करण्यांत

आले. उत्तरेकडील भागास राजरथ, दक्षिणेकडच्यास रोहण, आणि पूर्वेकडील भागास मायारथ असें ह्मणत. त्याच्या कारकीर्दींत एक महत्त्वाची गोष्ट घडून आली ती अशी कीं, आपल्या देशाच्या दक्षिणभागांतील सर्व गांवाच्या रचनेंत पाटील, कुळकर्णी, ह्मार, बलुतेदार जसे आज शेंकडों वर्षांपासून आहेत त्याप्रमाणें लंकेंत व्यवस्था चालू झाली ती आजमित्तीस तशीच चालू आहे. याशिवाय त्याच्या वेळीं प्रत्येक गांवाच्या आणि शेतेमळे यांच्या हद्दी ठरविण्यांत आल्या. पंडुवासानें तीस वर्षें राज्य केलें. तो मेला तेव्हां त्यास दहा पुत्र व एक कन्या होती. दहांपैकीं पुढें कांहीं गादीवर बसले.

पुढें कांहीं राजे होऊन इ० स० पूर्वी ३०७ व्या वर्षी तिसो गादीवर बसला. तो सातवा राजा झाला. पुढें तो देवानंपीय (देवांचा प्रिय) तिसो या नांवानें प्रसिद्ध होता. त्याच्या कारकीर्दींत बौद्धधर्माची स्थापना झाली ह्मणून त्या धर्माच्या भिक्षुकांनीं प्रतिष्ठा मिळविण्यास आणि त्याची स्तुति करण्यास तो गादीवर बसला त्या वेळीं पृथ्वीच्या पोटांत असलेलीं रत्नें व सोनें, रुपें हीं तिच्या आपोआप पृष्ठभागावर आलीं; समुद्राच्या तळची संपत्ति किनाऱ्यावर आली, अशा दुसऱ्या अद्भुत गोष्टी घडून आल्याचें लिहून ठेविलें आहे. याचा व मगध-देशाचा राजा धर्मशोक (अशोक) यांचा स्नेह असल्यामुळें यानें चार सिंहली सरदारांबरोबर रत्नें व फळें यांची फरमास देऊन त्यांस अशोकाकडे पाठविलें. ते सरदार पाटलीपुत्र (पाटना) येथें आले, आणि त्यांनीं फरमास राजास दिली. त्यानें त्यांचा सत्कार करून फ-

रमास स्वीकारिली. नंतर अशोकानें आपले मुत्सद्दी यांजबरोबर एक मुकुट, राजकीय तरवार, भागीरथीचें उदक व दुसरे पदार्थ देऊन त्यास उलट फरमास करण्यास पाठविलें आणि बौद्धधर्म स्वीकारण्याविषयीं त्यास शिफारस केली. तिसाच्या कारकीर्दींत लंकेंत बौद्धधर्माची स्थापना झाली ह्मणून वर लिहिलें त्याचें एवढेंच कारण कीं, पूर्वीं गौतमबुद्धांनीं तेथें जाऊन तो धर्म पढविला होता खरा परंतु त्याच्या पश्चात् त्याचा ऱ्हास होऊन तो अगदीं नाहींसा झाला होता. अशोकराजा मूळचा ब्राह्मीधर्माचा होता पण पुढें त्यानें त्याचा त्याग करून बुद्धाचा धर्म स्वीकारिला.

अशोकानें आपला पुत्र महिंदो यास बौद्धधर्माची द्वीपांत स्थापना करण्याकरितां पाठविल्याचें आह्मी पूर्वीं सांगितलेंच आहे. त्याचें तिसानें आदरआतिथ्य केलें. तो धर्मोपदेश करूं लागला तेव्हां पुष्कळ लोक आपला धर्म सोडून त्याचा स्वीकार करूं लागले. आपल्या धर्माचा आह्मांस उपदेश करा ह्मणून बायकांचीही त्याजकडे गर्दी झाली. त्यांत अनुलाराणी मुख्य होती. तुह्मांस उपदेश आह्मांस देतां येत नाहीं; पाहिजे असल्यास आमची बहीण सांघमिता हिला बोलावणें पाठवावें ह्मणून त्यानें सांगितलें. तेव्हां त्यांनीं तिला बोलावणें पाठविलें. तिनें लंकेंत जाण्यास आपल्या पित्याची परवानगी विचारिली. तो ह्मणाला, तुह्मी सर्व मुलें व नातवंडें मजजवळून गेल्यावर माझ्या दुःखाचें शांतवन मी कसें करावें? तिनें आपल्या जाण्यापासून केवढा फायदा होणार आणि न गेल्यानें आपल्या ध-

यांचें किती नुकसान होणार हें कळविल्यावर त्यानें मोठ्या अनुत्सुकतेनें तिला जाण्यास रुकार दिला. बोधवृक्षाची एक फांदी बरोबर घेऊन ती लंकेंत गेली. या वृक्षाची कथा आह्मी पूर्वींच दिली आहे. महिंदो व त्याची बहीण यांनीं बौद्धधर्माचा द्वीपांत प्रसार होण्याकरितां आपले देह खर्च केले. त्यांच्या मदतीनें अनेक देवालयें व विहार बांधिले गेले. सिहिंतल येथें तिसानें बत्तीस खोल्या भिक्षुकांकरितां बांधून दिल्या. अनुराधपूर येथील थुपारामाचें सुंदर देवालय त्यानें बांधिल्याचें पूर्वीं सांगितलेंच आहे. राजाच्या पश्चात् आपल्या मुलास बाजूस ठेवून त्याचा भाऊ महानग गादीवर बसेल असें अनुलाराणीस वाटून तिनें विष घातलेलें फळ दिराकडे पाठविलें. त्या वेळीं तिचा मुलगा जवळ होता त्यास त्यानें तें सहजस्थित्या दिलें, तेणेंकरून मुलगा मात्र मेला. राजाच्या रागास भिऊन महानग दक्षिणेस रोहनप्रांताकडे गेला. तेथें त्यानें लहानसें राज्य स्थापिलें आणि पुष्कळ विहार आणि सितेन येथें एक देवालय बांधिलें. तिसोराजा चाळीस वर्षें भरभराटीनें राज्य करून मेला. त्याच्या मागून त्याचा चौथा भाऊ गादीवर बसला. तिसोनंतर आठ वर्षांनीं महिंदोनें देह ठेविला. त्याच्या चितेस राजानें स्वतः अग्नि दिला. त्याची बहीण पुढें एक वर्षानें मेली. नंतर पांचवा व साहवा भाऊ अनुक्रमें गादीवर बसले. सहाव्याचें नांव सुरातिसा होतें. त्यानें सेना आणि गुटिका नांवाचे दोन तामिल आपल्या स्वारांत मुख्य नायक करून चाकरीस ठेविले. त्यांनीं राजास ठार मारून आपण बेवीस वर्षें

राज्य केलें. अखेर त्यांचाही परिणाम तसाच झाला. नंतर नववा शाऊ जो आसेल तो गादीवर बसला त्याच्या वेळीं चोला प्रांताचा इलालानामक तामिलजातीचा राजा सैन्य बरोबर घेऊन महावेलीगंगेच्या मुखाजवळ येऊन उतरला. पुढें अनुराधपूरावर स्वारी करून त्यानें आसेलाचा पराजय केला, आणि रोहन खेरीज करून लंकाबेट आपल्या हस्तगत करून घेतलें. द्वीपांत तामिल लोकांचा हा प्रथम हल्ला व हा प्रथम राजा झाला. चोलाप्रांत मद्रासेच्या पश्चिमेस आहे. त्यांतील राजधानीस कांचीपूर ह्मणतात. इलाला हा ब्राह्मणधर्मी होता. त्यानें देवालयें व विहार यांचा नाश करून बौद्धधर्म बुडवून टाकण्यास यत्न केला. तत्राप तो मोठा न्यायी होता, आणि कोणास कांहीं गाऱ्हाणें कळविण्याचें असल्यास त्याची दाद लवकर लागावी ह्मणून त्यानें आपल्या उशाशीं एक घांट टांगून ठेविली होती. त्यानें बत्तीस किल्ले बांधिले. चाळीस वर्षे न्यायानें राज्य करून अखेर लढाईंत त्याचा परिणाम झाला; ती कथा पुढील कलमांत येणार आहे.

द्वीपाच्या दक्षिणेकडील भाग ज्यास रोहन ह्मणत त्याजवर देवानंपीयतिसाचा नातू कावंतिसा राज्य करीत होता. त्यास दोन पुत्र होते. वडीलपुत्राचें नांव गिमुनु होतें. आपल्या द्वीपावर तामिल लोकांचा अंमल पहाणें त्याला लहानपणापासून सहन होत नसे. एके समयीं लहानपणीं तो हातपाय गुंडाळून घेऊन निजला असतां त्याचा बाप ह्मणाला, मुला पाय पसरून यथास्थित कां निजत नाहींस? तेव्हां त्यानें उत्तर दिलें कीं,

हातपाय पसरण्यास जागा कोठें आहे, नदीच्या पलीक-डच्या बाजूनें दामिल (तामिल) लोकांकडून कोंडला गेलों आहें, आणि दुसऱ्या बाजूस कधीं मागें न हटणारा समुद्र आहे तर हातपाय पसरून कसें निजतां येईल ? पुढें सैन्य जमवून इलाला राजावर स्वारी करण्यास त्यानें तीन वेळ बापाची परवानगी विचारिली; ती मिळेना; तेव्हां त्यास राग येऊन त्यानें स्त्रियांनीं घालण्याचा दागिना त्याज-कडे निरोपावरोबर पाठविला आणि असें सांगून पाठ-विलें कीं, आपण मर्द नाहीं करितां हा दागिना घा-लावा. त्याच्या उद्धटपणाचा पित्यास राग येऊन त्यानें त्यास शासन करण्याची भीति घातली, तेव्हां तो पळून गेला. त्याच्या उद्धटपणामुळें दुत्तुगिमुनु (वेहुकमी गिमुनु) असें त्यास ह्मणूं लागले.

पुढें थोड्याच कालानें त्याचा बाप मरण पावला. तेव्हां हत्ती, पायदळ, व घोडेस्वार बरोबर घेऊन दुत्तु-गिमुनु महावेलीगंगा उतरून आलीकडे आला आणि विजितपुरास वेढा घालून तें शहर घेतलें. नंतर अनु-राधपूरावर स्वारी केली. तेव्हां इलाला राजा आपला दिग्गजंत नांवाचा सरदार बरोबर घेऊन लढण्यास आला. दोघेही राजे हत्तीवर बसून मोठ्या शौर्यानें लढूं लागले; पण अखेर तामिलराजाचा हत्ती खालीं पडून राजा त्याच्या खालीं सांपडला आणि मरण पावला दुत्तुगिमुनु जयजयकार करीत शहरांत शिरला, आणि सिंहकुलांतून जें राज्यपद गेलें होतें तें आपण गादीवर बसून परत आणिलें. इलाला याजविषयीं त्यानें मोठी औदार्यबुद्धि दाखविली. तो ज्या स्थळीं पडला तेथें त्याचें

दहन समारंभानें करविलें आणि त्याच स्थळीं एक स माधि बांधवून असा ठराव केला कीं, वाहनारूढ होऊन वाजत गाजत तिकडून जाण्याचें कारण राजास पडलें असतां त्यानें सुद्धां तेथें वाजविण्याचें बंद करून खालीं उतरून जावें. आपण लढाया केल्या त्यांत पुष्कळ लोक बळी गेले तर आतां परलोकीं आपलें काय होईल असा विचार मनांत येऊन त्यास मोठी चिंता लागली. तिचे निवारणार्थ त्यानें आपला सर्वकाळ व संपत्ति ही देवालयें व विहार बांधण्याकडे अर्पण केली. त्यानें पुष्कळ इमारती बांधिल्या; त्यांत अति मोठी ह्मटली ह्मणजे अनुराधपूर येथील पितळेचा वाडा होय. त्याचें वर्णन पूर्वीं दिलेंच आहे. तेथील रत्नावेलीचें देवालय ( महाथुपो ) बांधण्यास त्यानेंच आरंभ केला होता, पण तें काम संपण्यापूर्वीच त्याचा अंतकाळ झाला. त्याचा पाया दीडशें फूट खोल व उंची २७० फूट होती. या देवालयाचे जोत्यास दगडांत खोदलेलीं हत्तींचीं गंडस्थळें बसविलेलीं होतीं. ही इमारत बांधली तेव्हां शेंकडों याकोस ( यक्ष ) मजुरीनें लाविले होते. हा राजा मोठा धार्मिक होता. त्यानें ९९ विहार बांधिले. दुष्काळांत धार्मिकलोकांच्या पोषणाकरितां त्यानें सर्वांबरोबर आपलें जवाहीर दिलें. प्रत्येक भिक्षुकास तीन झगे याप्रमाणें तीन प्रसंगीं द्वीपांतील सर्व भिक्षुकांस कपडे वांटले. एकेक खेपेस सात दिवसपर्यंत याप्रमाणें पांच वेळ द्वीपाची मालकी भिक्षुकांकडे दिली होती. आणखी पुष्कळ धर्मकृत्यें त्यानें केल्याचें वर्णन महावंशांत दिलें आहे. अंतकालीं त्यानें असें बोलून दाखविलें

कीं, मी बौद्धधर्माचा गुलाम होतों. यावरून तो केवढा धार्मिक होता हें वाचकांच्या सहज लक्षांत येणार आहे. पूर्वकालीं दक्षिण हिंदुस्थानांतील राजे अशाच प्रकारचीं महान् धर्मकृत्यें करीत होते असें इतिहासावरून कळतें. सांप्रत तिकडील जंगी देवालयें व अन्नछत्रें त्यांच्या कृत्याची साक्ष देतात. असो याप्रमाणें दुत्तुगिमुनु राजानें चोवीस वर्षे मोठ्या औदार्यानें आणि धर्मबुद्धीनें राज्य करून इ० स० च्या पूर्वी १६१ वे वर्षी रुनावेली देवालयाकडे नजर लावून मरण पावला.

त्याच्या पश्चात् त्याच्या पुत्रास गादी न मिळतां त्याचा भाऊ सद्धातिसा गादीवर बसला. कारण पुत्रानें हलक्या जातीची बायको केली होती. सद्धातिसा हा रोहन येथें राज्य करीत असतां त्यानें मलगिरीगाला नांवाचा विहार बांधिला होता. गादीवर बसल्यानंतर भावानें आरंभ केलेल्या देवालयाचें काम त्यानें शेवटास नेलें. त्याच्या वेळीं लिहिण्यासारख्या विशेष गोष्टी झाल्या नाहींत. सुमारें अठरा वर्षे राज्य करून तो मरण पावला. त्याच्या पश्चात् भिक्षुकांनीं त्याच्या बंधूस बाजूस ठेवून त्याच्या लहान मुलास गादीवर बसविलें. पण बंधूनें त्या बालकास पदच्युत करून तरवारीच्या जोरानें गादी मिळविली. या वेळीं राजघराण्यांत दोन भाग होऊन भांडणास आरंभ झाला; तें भांडण शेंकडों वर्षे चालू होतें. द्वीपांतील राजसत्ता जरी भिक्षुकांच्या हातीं ह्या वेळपावेतों नव्हती तरी जे राजे झाले ते त्यास मोठा मान देत असल्यामुळें त्यांची प्रतिष्ठा वाढली होती; आणि ते ज्या पक्षास अनुकूळ असत त्याचा जय होत

असे. त्यामुळें वर सांगितलेलें भांडण सुरु झालयावर जे राजे गादीवर बसले ते भिक्षुकांस संतोषी राखून त्यांची मर्जी संभाळण्यास अधिक झटूं लागले तेव्हांपासून आपलें महत्त्व विशेष वाढविण्यास त्यांस अधिकच संधि सांपडत गेली.

मध्यंतरी चार राजे होऊन नंतर **वलगमबाहु** इ० स० च्या पूर्वीं १०४ थ्या वर्षीं गादीवर बसला, तोंच मलबाडचे लोकांनीं स्वारी केली ती अशी कीं टोळ्या करून द्वीपाच्या पुष्कळ भागांत एककालीं ते येऊन उतरले आणि **अनुराधपूर** त्यांनीं हस्तगत करून घेतलें. तेव्हां राजास गादी सोडून पळून जाणें भाग पडलें. तो दक्षिणेस **आदमसपीक** पर्वतांत जाऊन छपून राहिला. **मलबाडचे** लोक स्वाऱ्या करीत त्या उत्तरभागावर करीत. **महावेलीगंगेच्या** पलीकडे दक्षिणेस जात नसत. त्याचें कारण असें होतें कीं त्या भागांत संपत्ति अधिक असून तो सुपीक होता. दक्षिणेकडील भाग नापीक आणि डोंगराळ असल्यामुळें स्वारी करण्यास दुर्गम होता. शिवाय त्या पर्वतासभोंवतालच्या टेंकड्यांत राहणारे लोक उत्तरभागांतील लोकांपेक्षां जोर, धैर्य आणि सहनशक्ति यांत अधिक होते. त्यामुळें जेव्हां मुख्य राजघराण्यांतील लोकांवर अडचणीचा प्रसंग येई, तेव्हां दक्षिणेकडील **माया** आणि **रोहन** या संस्थानचे राजे त्यांस आश्रा, व गादी परत मिळविण्यास मदत देत. **वलगमबाहू** पंधरा वर्षे दडून राहिला. पुढें त्यानें सैन्य जमवून मलबाडचे लोकांस हांकून लाविलें व आपली गादी परत मिळविली.

तो बौद्धधर्माचा मोठा अभिमानी होता. त्यानें अनेक देवालयें व विहार बांधिले. तामिललोकांनीं त्याची राणी पकडून नेली होती, तिची सुटका झाल्याचा आनंदोत्साह करण्याकरितां त्यानें भुवनराम नांवाचें देवालय बांधिलें. दांबुलनांवाचें देवालय व विहार हीं यानेंच बांधिलीं. ह्या देवालयाच्या सौंदर्याचें वर्णन पूर्वीं दिलेंच आहे. शाक्यमुनींनीं सांगितलेलीं मतें व धर्मव्याख्यानें हा वेळपावेतों लिहिण्यांत आलीं नव्हतीं. महिंदो तीं तोंडानें पढवीत असे. दंतकथा जशा परंपरागत सांगत गेल्यानें चालतात, त्याप्रमाणें त्यांचें रक्षण स्मरणशक्तीनें झालें होतें. तीं एकत्र जुळून लिहिण्यास या राजानें आलू विहारांत भिक्षुक लाविले आणि लिहून काढविलीं. ही गोष्ट त्याच्या कारकीर्दींत अति महत्त्वाची झाली. त्याच्या पश्चात् त्याचा मुलगा व नातू हे अनुक्रमें गादीवर बसले. नातवाचें नांव चोरनाग होतें. बौद्धधर्म द्वीपांत भरभराटीनें चालला होता; पण त्यास हा घरांतच शत्रु उत्पन्न झाला. बाप राज्य करीत असतां चोरनाग हा लुटारूपणा करीत फिरत असे. पुढें बापाचा अंतकाळ होऊन त्यास राज्यपद मिळालें तेव्हां लुटारूपणा करीत असतां ज्या विहारांत त्यास आश्रा मिळाला नव्हता त्यांचा त्यानें नाश केला. त्याच्या राणीचें नांव अनुला होतें. द्वीपांत राज्यपदावर प्रथम राणी बसली ती हीच. तिची व पुढें दुसऱ्या स्त्रिया गादीवर बसल्या त्यांची कथा वेगळीच देणार आहों.

पुढें इ०स०च्या पूर्वीं ४१ वर्षांपासून इ०स० २७९ पर्यंत ह्मणजे सुमारें तीन सव्वातीनशें वर्षांत अठ्ठावीस राजे गादीवर

बसले. पण त्यांच्या कारकीर्दीचें विशेष वर्णन दिलेलें नाहीं. ते बहुतेक मोठे धर्मवेडे असून भिक्षुकाचे मात्र अगदीं गुलाम होते. इ० स० ९४ व्या वर्षीं **चंद्रमुखशिव** नांवाचा राजा गादीवर बसला असतां रोमच्या **क्लादियस** बाद-शाहाकडून त्याच्या दरबारांत वकील गेला होता. बौ-द्धधर्माच्या संबंधानें या कालांत एक विशेष गोष्ट घडून आली; तिचें येथें थोडक्यांत निरूपण करितों. **चोर-नाग** हा अधार्मिक राजा झाल्यामुळें त्यानें त्या धर्मा-च्या भरभराटीस धक्का दिला. बौद्धधर्माभिमानी लोक अधर्मास किंवा विरुद्ध धर्मास भीत नसत किंवा त्याचा द्वेष करीत नसत. अभक्ति किंवा विरुद्ध धर्म आपल्या खऱ्या धर्माच्या जवळ नसेल तर तुलना होण्यास मार्ग नाहीं, आणि तुलनेशिवाय आपल्या धर्माचें खरें महत्त्व लोकांस कळणार नाहीं. पण आपल्या धर्मांत फूट पडणें किंवा त्यांत पाखांड शिरणें ही गोष्ट मात्र त्यास मोठी दुःसह वाटे. त्या गोष्टीस या कालांत आरंभ होऊन धर्मभेद आणि पाखांड यांचा बराच प्रसार झाला आणि त्यांनीं मुख्य धर्माच्या भरभराटीस चांगला धक्का दिला. हें पाखांड उपस्थित करणारा **विटूलिया** नांवाचा ब्राह्मण होता. त्यानें कपट आणि कारस्थान करून बौद्धधर्माचा पाडाव करण्यास यत्न केला होता. तें मोडून टाकण्यास **वैरातिसा** राजानें यत्न केला पण तो सिद्धीस गेला नाहीं. पुढें इ० स० २४८ व्या वर्षीं **मेघवर्ण** राजाच्या वेळीं स्वधर्म सोडून जे भिक्षुक पाखांडमतांत शिरले होते त्यांच्या पाठीवर डाग देऊन धिंड काढून त्यांस द्वी-पाच्या बाहेर घालविलें. शिक्षा झालेल्यांत **संगमित्ता**

नांवाचा एक भिक्षुक होता तो भूतांच्या मंत्रतंत्रांत प्रवीण होता. मेघवर्ण राजा मेल्यानंतर तो परत आला आणि त्याच्या मागून जो राजा गादीवर बसला त्याच्या लोभांत इतका शिरला कीं राजानें त्यास आपल्या पुत्रांचा गुरु नेमिला. त्याजपासून राजपुत्रांस कोणत्या प्रकारचें शिक्षण मिळालें हें पुढें लवकर दिसून येणार आहे.

इ० स० २७५ ह्या वर्षीं महासेन गादीवर बसला. त्यास संघमितापासून शिक्षण मिळालें असल्यामुळें तो विटूलियनमताचा उघडपणीं स्वीकार करून खऱ्या बौद्धधर्माचा पाडाव करण्यास प्रवृत्त झाला. त्या धर्माच्या भिक्षुकांचा निर्वाह भिक्षेवर होत होता; ती या राजानें बंद केली. त्यानें शेंकडों देवालयें, विहार आणि प्रसिद्ध पितळेचा वाडा पाडिला आणि बोवृक्षाजवळ एक नवीन देवालय बांधिलें; त्यांत बुद्धाची पूजा नवीन किंवा सुधारलेल्या बौद्धधर्मींत सांगितलेल्या संस्कारानें व्हावी ह्मणून ठरविलें. या गोष्टींनीं लोकांचीं मनें संतप्त होऊन खवळून गेलीं आणि उघडपणीं बंड होण्याची वेळ आली. तेव्हां धर्मभेद उत्पन्न करणारा जो संघमिता त्याचा एकाएकीं कोणी मारेकऱ्यानें जीव घेतला. हें पाहून आपण स्वधर्माचा त्याग केला ही मोठी चूक झाली अशी त्याच्या मनाची खात्री झाली. तेव्हां आपण धर्म त्याग केल्यामुळें जे अपाय घडले होते त्यांची व इमारती पाडल्या होत्या त्यांची दुरुस्ती करण्यास तो मोठ्या उमेदीनें झटूं लागला. त्यानें अनुराधपूर येथील जैतवनरामाचें देवालय व मिनेरीचा मोठा तलाव बांधिल्याचें

आह्मी पूर्वीं सांगितलेंच आहे. हीं कामें तयार करिते-वेळीं यक्ष व नागलोक मजुरीनें लाविले होते. त्या तलावाच्या पाण्यानें वीस हजार शेतें पिकत होतीं तीं त्यानें दिनानाक नांवाचे विहारास अर्पण केलीं. महावंशांत त्यानें दुसरीं कामें केल्याचें वर्णन देऊन त्याच्या धर्माधर्मकृत्याप्रमाणें त्यास गति प्राप्त झाली असें संदिग्ध लिहिलें आहे. हा राजा मेल्यावर मिनेरीचा स्वामी ह्मणून भोळे लोक त्याची पूजा करीत व त्याच नांवाचें मिनेरी तलावावर देवालय आहे, त्यांत राजाचें धनुष्य आहे, त्याच्या पुढें अद्याप पैसा अडका ठेवितात.

महावंश वराण्यांतील हा शेवटचा राजा झाला. त्याच्यानंतर ह्मणजे इ० स० ३०२ वर्षांपासून इ० स० ११९२ पर्यंत साडेआठशें वर्षांत जे राजे झाले त्यांच्या कारकीर्दींतील मुख्य गोष्टींचें निरूपण थोडक्यांत करितों. बंगालचे पुरुष द्वीपांत जाऊन विजयी झाले असतां जी भरभराट व सत्ता वाढली होती, त्यांचा ऱ्हास होत गेला; लुटारू मलबाडचे लोकांचा उदय झाला; त्यांच्या लुटी व स्वाऱ्या यांनीं द्वीपाची संपत्ति क्षीण होत जाऊन तें ओस होत चाललें. लोककलह, धर्मभेद, राजघराण्यांतील फंद व दगा करून जीव घेणें, याही गोष्टी द्वीपाची शक्ति क्षीण करण्यास अनुकूल झाल्या. कांहींनीं देवालयें बांधिलीं; कांहींनीं त्यांची दुरुस्ती केली; कांहींनीं भिक्षुकांस जमिनी इनाम दिल्या. महावंशांत धर्मसंबंधी जीं औदार्याचीं कामें राजांनीं केलीं त्यांचें मात्र वर्णन केलें आहे. पण त्यांच्या चरित्राविषयीं दुसरी मा-

हिती दिलेली नाहीं. त्यांतील थोडे राजे विद्वत्तेकरितां प्र-
सिद्धि पावले त्याजविषयीं चार ओळी लिहितों. दतुतिसा
नांवाचा राजा चित्रें काढणें, नकशी करणें, व हस्तिदंती
खोदकाम करणें या कलांत निपुण होता; त्यानें बुद्धाच्या
पुतळ्याचे नमुने तयार केले आणि त्या कला आपल्या
प्रजेस शिकवून मोठी कीर्ति संपादली. बुद्धदास ह्मणून
राजा झाला; तो शस्त्रवैद्यक्रिया आपण करीत असे व
त्यानें वैद्यकावर सारसंग्रह नांवाचा एक ग्रंथ लिहिला
आहे. तो ग्रंथ अद्याप आहे आणि सिंहली वैद्य तो ने-
हमीं पहातात. हा राजा सद्गुणाची खाण आणि संप-
त्तीचा सागर होता असें त्याचें वर्णन केलें आहे. कुमा-
रदास ह्मणून एक राजा झाला, त्याचें कालिदास
कवीविषयीं इतकें प्रेम होतें कीं, तो कवि निवर्तला
तेव्हां राजास मोठें वाईट वाटून त्यानें कवीच्या पेटलेल्या
चितेंत उडी घातली. सोपेतर ग्रीक व्यापारी याचवेळीं
लंकेंत गेला होता. ह्मणून पूर्वीं सांगितलेंच आहे.

इ० स० च्या पहिल्या शतकांत लंकेंतून रोमच्या
क्लादियस बादशहाकडे वकील गेल्याचें पूर्वीं सांगितलेंच
आहे. त्यानंतर जुलियन पादशाहाच्या वेळीं दुसरा
वकील गेला होता. इ० स० च्या चौथ्या शतकाच्या
अखेरीपासून आठव्याच्या अखेरपर्यंत या द्वीपांत आणि
चीनदेशांत मोठें दळणवळण असून द्वीपस्थ राजे या
देशच्या राजास खंडणी देत होते. महानामाच्या वेळीं
फाहिआन जो प्रसिद्ध चीनी प्रवासी तो या द्वीपांत गे-
ला होता. त्यानें द्वीपासंबंधी पुष्कळ माहिती दिली
आहे. तेथें हवा नेहमीं एकसारखी असल्यामुळें हिंवाळा

आणि उन्हाळा हे ओळखूं येत नाहींत. वृक्ष आणि वनस्पति हीं निरंतर हिरवींगार असल्यामुळें तेथें बाराही महिने वसंतऋतु वास करितो असें भासतें. रत्नें व सुवर्ण यांनीं सुशोभित झालेले अनुराधपूर येथील बुद्धाचे पुतळे व त्यांचीं देवालयें त्यानें पाहिल्याचें वर्णन दिलें आहे. त्याच्या मागून दुसरे प्रवासी गेले होते, त्यांनींही लंकेंतील ऐश्वर्याचें व दुसऱ्या गोष्टींचें वर्णन केलें आहे; तें आणि महावंशांतील वर्णन यांमध्यें पुष्कळ मेळ दिसतो. इ० स० ७४२ व्या वर्षी येथील वकील चीनच्या राजाकडे गेला होता, आणि त्यानें राजास मौक्तिक, सुवर्णपुष्पें, रत्नें, हस्तिदंत आणि बारीक कापड हीं नजर केल्याचें व द्वीपासंबंधी दुसऱ्या पुष्कळ गोष्टींचें वर्णन चीनदेशच्या इतिहासांत लिहिलें आहे. हें विषयांतर झालेंसें वाटेल पण वर सांगितलेल्या गोष्टी सुलुवंशराजांच्या वेळीं झाल्या, करितां त्यांचें थोडेंसें निरूपण या स्थलीं केलें. आतां आह्मी पुनः इतिहासाकडे वळतों.

महासेनानंतर त्याचा पुत्र कीर्तिश्रीमेघवाहन गादीवर बसला. त्याच्या वेळीं बुद्धाचा दंत कालिंगदेशच्या राजकन्येनें वेणींत ठेवून लंकेंत आणिला. मध्यंतरीं कांहीं राजे होऊन नंतर मलबाडचे लोकांनीं द्वीप पुनः हस्तगत करून घेतलें, आणि कांहीं वर्षें अंमल केला. पुढें धातुसेनानें त्या परकी लोकांस हांकून देऊन आपण गादीवर बसला; त्याच्या वेळीं त्याचा चुलता महानेमो यानें महावंशाचा पूर्व भाग लिहून तयार केल्याचें पूर्वीं सांगितलेंच आहे. तो कालव्यापी सरोवर बांधीत असतां जेथें सरोवराचा धक्का बांधावयाचा होता त्या

स्थलीं एक भिक्षुक गाढ ध्यानस्त बसला होता तो जागृत होईना; तेव्हां राजानें त्यास तेथेंच गाडून वर धक्का बांधिला. या दुष्ट कृत्याकारितां त्यास याच जन्मांत योग्य शासन मिळालें; त्यास दोन पुत्र होते. वडील पुत्राचें नांव कश्यप होतें. त्यास वाटलें कीं, पित्याजवळ धन पुष्कळ असून तो तें धाकट्या भावास देणार आहे. तें आपणास मिळण्याकारितां त्यानें पित्याचा छळ आरंभिला, तरी तें मिळालें नाहीं. तेव्हां त्यानें पित्यास एका भिंतींत गाडून तिचें द्वार चिणून टाकिलें. त्याच्याविषयीं महावंशांत मनास लागण्यासारखी पुष्कळ कथा दिली आहे आणि शेवटीं असें ह्मटलें आहे कीं, इहलोकची संपत्ति विद्युत्प्रकाशाप्रमाणें आहे, आणि विचारीलोक ती मिळविण्यास याचकारितां झटत नाहींत. पित्याचा वध करून कश्यप गादीवर बसला.

त्याचा धाकटा भाऊ मगलन ह्मणून होता. त्यास वडीलबंधूचें दुष्ट कृत्य सहन न होऊन तो आपल्या देशांत आला, आणि मोठें सैन्य मिळवून कोलंबो येथें परत गेला. तेव्हां कश्यपास दहशत पडून तो श्रीगिरि नांवाच्या दुर्गम किल्ल्यावर तटबंदी करून तेथें जाऊन राहिला. मगलनानें त्याच्याशीं युद्ध करून त्यास ठार मारिलें. त्याच्या मागून आठ राजे गादीवर बसले. त्यांपैकीं दोघांनीं आत्महत्या केली; तिघांस मारेकऱ्यांनीं ठार मारिलें. पुत्रानें राजद्रोह केला ह्मणून शोक करून एक मरण पावला. इ० स० सातशें वर्षापासून अकराशें वर्षांपर्यंत चारशें वर्षांत तामिललोकांचें द्वीपांत वर्चस्व झालें. त्या कालचे सिंहली इतिहासांत द्वीपस्थराजांच्यापेक्षां या

परकी लोकांच्या पराक्रमाचें अधिक वर्णन दिलें आहे. दिवाणगिरी आदिकरून राज्यांतील सर्व अधिकार त्यांच्या हातीं गेले. गादीवर कोणी बसावें ह्मणून लढा पडल्यास त्याचा ठराव करण्याचें कामसुद्धां त्यांजकडे गेलें. त्यांनीं द्वीपाचा उत्तर भाग लुटून फस्त केला. त्या सुमारास **अग्रबोधी**राजा गादीवर बसला. त्याच्यानें या लोकांस द्वीपांतून हाकून लावण्याचें होईना. तेव्हां त्यानें **अनुराधपूर** सोडून **पोलोनरुव** ही राजधानी केली, आणि येथें **अनुराधपुरा**प्रमाणें मोठे तलाव, राजवाडे व देवालयें बांधिलीं.

मध्यंतरीं कांहीं राजांनीं राज्य केल्यानंतर **पराक्रमबाहु** इ० स० ११५३ ह्या वर्षीं **पोलोनरुव** येथें गादीवर बसला. त्याचा विद्याभ्यास चांगला होता, आणि तो पुरा करण्याकरितां त्यानें परदेशांत पर्यटन केलें होतें. तो सर्व शास्त्रांत व कलांत निपुण होता. त्यानें **पोलोनरुव** शहराभोंवतीं दगडी तट बांधिला, आणि शेंकडों देवालयें व तलाव बांधिले, व त्यांत पाणी आणून सोडण्याकरितां नद्यांचे प्रवाह फिरविले. जे तलाव मोडकळीस येऊन बुजून गेले होते, त्यांची दुरुस्ती केली. रस्त्यांच्या बाजूंस वृक्ष लाविले. कित्येक देवालयांस जमीनी इनाम करून दिल्या आणि त्यानें असा ठराव केला होता कीं, इनामाच्या सनदा करून देण्याच्या त्या ताम्रपटावर करून द्याव्या. त्यानें जीं लोकोपयोगीं कामें केलीं त्या सर्वांत **इलाहाराचा** कालवा हा मुख्य होय. **मेतलीमां**तांत **आवनगंगा**नदीचा कालवा काढून तो **मिनेरी**, **कोंडिला** व दुसरे तलाव यांत नेऊन सो-

डिला, त्याची लांबी सुमारें शंभर मैल आहे. त्यांतील पाण्यानें हजारो शेतें पिकत होतीं. या कालव्यास पराक्रमबाहूचा समुद्र ह्मणून नांव पडलें होतें. पाट बांधाऱ्याचीं कामें करून कीर्ति मिळविण्याची महत्त्वाकांक्षा ब्रह्मदेशांतील राजास अद्याप आहे. सारांश जेणेंकरून आपलें राज्य भरभराटीस येऊन त्याची शक्ति वाढेल अशा सर्व तजविजी त्यानें केल्या आणि द्वीपास मोठी शोभा आणिली व मलबारलोकांस हाकून देऊन सर्व लंकेंत एक छत्री राज्य स्थापिलें.

त्याच्या वेळीं सियामदेशाच्या आग्नेयेस कयांबोदिया ह्मणून एक प्रांत आहे, तेथील राजानें लंकेंतील कांहीं प्रतिष्ठित बायका हिंदुस्थानांत येत असतां त्यांचीं जहाजें अटकाविलीं आणि लंकेंतील वकीलाचा अपमान केला. तेव्हां पराक्रमबाहूनें त्याची खोड मोडण्याचा निश्चय करून आदिकराम नांवाचा तामिल जातीचा आपला सैनाधिपति याच्या बरोबर मोठें सैन्य व पांचशें जहाजें देऊन त्यास त्याजवर पाठविलें. सैन्याधिपतीनें जाऊन त्याजबरोबर युद्ध केलें आणि त्यास ठार मारिलें. पुढें त्या प्रांतावर आपला सुभेदार नेमून तो लंकेंत परत गेला; नंतर आपल्या देशाच्या दक्षिणेंतील प्यांडिया आणि चोला येथील राजांवर पराक्रमबाहूनें स्वारी करून त्यांचा पराभव केला. प्यांडियाच्या राजास पदच्युत करून त्याच्या जागीं त्याच्या मुलास बसविलें. याच स्वारींत रामेश्वरबेट घेऊन तें लंकेच्या राज्यास सामिल केलें. तो देवानंपीयतिसाप्रमाणें धार्मिक व दुत्तुगिमुनूप्रमाणें पराक्रमी होता. त्याचे कारकीर्दींतील

शांततेविषयीं दांबुल्ल येथील खडकावर असा लेख आहे कीं, एकादी स्त्री मौल्यवान रत्नें घेऊन सर्व द्वीपांभर फिरली असतां तें काय आहे ह्मणून तिला विचारण्यास कोणास छाती नव्हती; याप्रमाणें त्यानें पराक्रमाचीं व लोककल्याणाचीं अनेक कामें करून मोठी कीर्त्ति संपादन केली, आणि तेतीस वर्षें मोठ्या भरभराटीनें राज्य करून मरण पावला. त्याच्या सर्व कारकीर्दीचें वर्णन देऊं लागलों तर एक ग्रंथ होणार करितां आह्मी इतकेंच सांगून हा लेख पुरा करितों. महावंशांत व राजावलींत त्याच्या गुणाची फारच तारीफ केली आहे, आणि लंकाद्वीपांत त्याच्या पूर्वीं व नंतर जे राजे झाले त्या सर्वांत हा मोठा कीर्त्तिमान् झाला. त्याच्या राणीचें नांव लीलावती होतें. तिजविषयीं दोन ओळी पुढें लिहिणार आहों.

पराक्रमबाहूचा अंतकाळ झाल्यावर तीस वर्षांच्या अवकाशांत पंधरा सोळा राजे झाले. ते राज्य करण्यास अगदीं अपात्र असल्यामुळें त्यांच्या वेळची द्वीपांतील भरभराट आणि शांतता जाऊन तें सर्व प्रकारें क्षीण झालें. ही संधि पाहून मलबाडचे लोकांनीं द्वीपावर पुनः स्वारी केली. त्याच्या मुख्य सरदाराचें नांव माघ होतें. तो चोवीस हजार लोक बरोबर घेऊन आला, आणि सर्व लंकाबेट पुनः काबीज करून आपण राजा झाला. हे मलबाडचे लोक चोला किंवा पांडिया प्रांतांतून आले नव्हते; ते कलिंगदेश ज्यास सांप्रत ( उत्तर सरकारस ) ह्मणतात तेथून गेले होते. त्या लोकांनीं विलक्षण क्रूर कृत्यें केलीं. त्याचें वर्णन महावंशांत व राज-

रत्नाकरींत दिलें आहे; त्यांतील तात्पर्य आह्मी येथें देतों. त्यांनीं बौद्धधर्माचा नाश केला. त्यांचीं देवालयें पाडिलीं; विहार मोडून त्यांच्या तामिललोकांस राहण्यास बराकी केल्या; बौद्धधर्माचीं पुस्तकें जाळिलीं; बऱ्या लोकांस कैदी केलें; लोकांचें सर्व धन हरण करूं लागले आणि जे आपला पैसा देईनात त्यांचे हातपाय तोडिले. सारांश सर्व द्वीप आग लागल्याप्रमाणें किंवा सुतक्याच्या गृहाप्रमाणें त्या वेळीं दिसूं लागलें होतें.

पराक्रमबाहूनंतर द्वीपांत जे राजे झाले, त्यांत एक छत्री राज्य कोणी केलें नाहीं. वर सांगितलेली तामिललोकांची स्वारी होण्यापूर्वी जे राजे गादीवर बसले, त्यांत कीर्तिनिसंगनांवाचा एक राजा झाला. तो कलिंगदेशच्या राजघराण्यांतील होता. याचें स्मरण राहण्याकरितां त्याच्या नांवाची छत्री बांधिली आहे. त्याजवर असें लिहिलें आहे कीं तो पृथ्वीचा त्राता, कीर्तीचा झरा आणि जगाचा दीप होता. कोलंबोयेथील अपूर्व पदार्थसंग्रहालयांत आह्मी जो दगडी सिंह पाहिला त्याजवर या राजाचें सिंहासन होतें. मध्यंतरी कांहीं राजे होऊन तिसरा विजयबाहु गादीवर बसला. पोलोनरुव येथें पांचशें वर्षं गादी होती, ती त्यानें तामिललोकांस त्रासून दंबदेनिया येथें नेली. पुढें आणखी कांहीं राजे होऊन पांचवा विजयबाहु गादीवर बसला. त्याच्या वेळीं ह्मणजे इ० स० १४०५ व्या वर्षीं चीनच्या राजानें लंकेवर स्वारी केली, त्याचें कारण पुढें स्पष्ट होणार आहे. या देशांत बौद्धधर्म चालू असल्यामुळें व व्यापाराचे निमित्तानें त्याचे द्वीपाशीं मोठें दळणवळण होतें.

बुद्धाच्या मताविषयीं माहिती मिळविण्यास वेदांती किंवा अध्यात्मी आणि सरकारी कामगार हे येत; आणि द्वीपस्थ राजे आपल्या वकीलाबरोबर बुद्धाच्या अस्थि ( अवशिष्ट भाग ) आणि धर्मपुस्तकें पाठवीत; आणि त्या राज्याच्या शक्तीचें महत्त्व मान पाहून बुजून जात. कित्येक प्रसंगीं द्वीपस्थराजे त्यांचें वर्चस्व कबूल करून त्याजकडे देणग्या ह्मणून पाठवीत त्या चिनई इतिहासांत कराचीपोंच ह्मणून लिहिल्या आहेत.

याप्रमाणें दळणवळण चालू असतां **चिंगहो** नांवाचा प्रसिद्ध सेनापति धूप व दुसरे जिन्नस बुद्धाच्या देवालयाकडे अर्पण करण्यास **लंकेंत** गेला तेव्हां त्याजवर व त्याच्या बरोबरच्या लोकांवर ते बेसावध असतां वाटेंत **विजयबाहूनें** हल्ला केला, पण मोठ्या कष्टानें सुटका पावून तो आपल्या जहाजांत परत गेला. दगाबाजीनें उघड अपमान झाला, त्याचा सूड उगविण्याकरितां पुढें थोड्या वर्षांनीं **चिंगहोबरोबर** मोठें सैन्य व आरमार देऊन त्यास पाठविलें. राजानें त्यास आडविण्यास तयारी केली. पण अखेर सेनाधिपतीनें त्याची राजधानी ( **गंपोल** ) घेऊन राजा व त्याच्या कुटुंबास कैदी करून त्यास **चिनांत** नेलें. तेव्हां तेथील राजास त्यांची दया येऊन त्यानें कुटुंबांत जो अति शाहणा असेल त्यास राजा करावें, अशा अटीवर त्यास द्वीपास परत जाऊं दिलें. या अटीस अनुसरून सहाव्या **श्रीपराक्रमबाहूची** राज्यपदावर नेमणूक झाली. पुढें द्वीपस्थ राजे त्या देशच्या राजास कांहीं वर्षें खंडणी देत होते. नंतर शंभर वर्षांत पांच राजे गादीवर बसले त्यांतील शेवटचा

नववा धर्मपराक्रमबाहु, तो इ० स० १५०९ त गादी-
वर बसला आणि त्याच्याच वेळीं पोर्तुगीजलोकांचें पा-
ऊल प्रथम द्वीपांत पडलें. येथें इतिहासाचा पहिला भाग
संपला.

दुसरा भाग पोर्तुगीजलोकांचा अंमल त्याजविषयीं थोडेसें वर्णन देण्यापूर्वीं ज्या राण्या द्वीपांत गादीवर बसल्या त्यांची कथा सांगतों.

चोरनागराजाच्या राणीचें नांव अनुला होतें हें वर सांगितलेंच आहे. द्वीपांत राज्यपदावर बसणारी प्रथम स्त्री ही होय. ती जशी मोठी कृत्या तशी वेश्याही होती. तिची उपमा देण्यास आपल्या पुराणांत अगर आलिकडच्या इतिहासांत कोणाचें नांव आठवत नाहीं. रोमच्या क्लादियस पादशहाची बायको मेसीना या नमुन्याची होती. अनुलेनें राज्याभिलाषाच्या बुद्धीनें प्रथम आपल्या नवऱ्याचा प्राण घेतला. नंतर त्याच दुष्टबुद्धीनें पोटच्या पुत्रासही त्याच्या पित्याकडे पाठविलें. तिची एका हमालाबरोबर सोबत होती त्यास गादीवर बसवून आपण त्याची राणी झाली. पुढें तो आवडेनासा होऊन तिचें प्रेम एका सुतारावर जडलें. तेव्हां त्यास पति करून घेऊन हमालाचा नाश केला. याप्रमाणें तिनें अनेक जार करून घेतले आणि ते आवडेनासे झाले ह्मणजे त्यांस यमसदनास पाठवी. त्या अवदसेनें पांच वर्षें गादीचा उपभोग घेतला.

महापराक्रमी व कीर्त्तिमान् जो पराक्रमबाहु त्याच्या राणीचें नांव लीलावती होतें. ती राजाच्या पश्चात् तीन वेळ गादीवर बसली आणि पदभ्रष्ट झाली. तीन वेळ

मिळून तिनें चार पांच वर्षं राज्य केलें. तिच्या नांवाचें जुनें नाणें सांपडलें आहे. ती प्रथम वेळीं पदभ्रष्ट झाल्यावर एक राजा गादीवर बसला. त्याच्या नंतर कीर्तिनिसंगराजाची बहीण कल्याणवती ही गादीवर बसली. तिनें सहा वर्षं राज्य केलें.

---

## प्रकरण दुसरें.—भाग दुसरा.

### पोर्तुगीजलोकांची कारकीर्द.

पोर्तुगीजलोकांचा लारेंजो नांवाचा सरदार इ० स० १५०५ त पाइंतदीग्याली येथें आला; त्या वेळेस नववा धर्मपराक्रमबाहु हा सिंहलद्वीपांत राज्य करीत होता. ग्याली येथील लोक त्याला पाहून भ्याले व त्यांनीं त्या सरदारास कळविलें कीं हें शहर येथील राजाची राजधानी आहे व तो राजा त्यांचे व्यापाराचें रक्षण करितो; शिवाय त्या लोकांनीं सरदारास खोटें कळविलें कीं त्याजबरोबर तह करण्यास राजानें आपणास अखत्यार दिला आहे, व त्यांनीं आपला राजा आहे असें सांगून एका साधारण सिंहली गृहस्थाची व त्या सरदाराची भेट केली तेव्हां त्या भेटींत त्या तोतया राजानें पोर्तुगीज सरदारास व्यापार करण्याकरितां कोलंबो येथें वखार बांधण्याची परवानगी देतों असेंही सांगितलें. हें सर्व खोटें असें ठाऊक असतां आपण खरेंच आहे असें समजलों असें पोर्तुगीजसरदारानें दाखविलें व आपले आगमनाचें स्मरण राहण्याकरितां पाइंतदीग्याली येथें शिला स्थापून तो तेथून निघून गेला.

पुढें बारा वर्षांनीं ह्मणजे इ० स० १५१७ त पोर्तुगीज लोक पुनः सिंहलद्वीपांत आले, त्या वेळेस त्यांचा सरदार **लोपोसोरेज दी आलबरगेरिया** हा आपले बरोबर वखार बांधण्याकरितां सर्व सामान व कारागीर लोक घेऊन सतरा जहाजांनिशीं **कोलंबो** येथें आला व पूर्वीं दिलेल्या वचनाप्रमाणें वखार बांधतों असें ह्मणाला, त्या वेळेस त्यानें आणलेले सातशें शिपाई व तोफा पाहून राजास भय वाटलें परंतु परचक्र आलें असतां अथवा राजाच्या पदरचे लोक राजास मानीनात असें झालें असतां आपण राजास मदत करूं असें त्या सरदारानें जेव्हां राजास आश्वासन दिलें तेव्हां राजाची खुषी नव्हती परंतु नाइलाजास्तव त्यानें त्या सरदारास **कोलंबो** येथें किल्ला बांधण्यास परवानगी दिली.

आपल्या व्यापारांत विघ्न करणारे दुसरे प्रतिस्पर्धीलोक आले असें पाहून **मूरलोकांस** वाईट वाटलें, तेव्हां त्यांनीं राजाचे मनांत भय व वैमनस्य आणून दिलें; तेव्हां राजानें आपला करार मोडला ह्मणून **पोर्तुगीजलोकांचे** किल्ल्याभोंवतालीं कित्येक महिने वेढा घातला परंतु **पोर्तुगीजलोकांस** हिंदुस्थानांतून मदत आल्यामुळें राजास वेढा काढणें भाग पडलें व त्यापुढें तो **पोर्तुगीजलोकांच्या** अगदीं ताब्यांत गेला, व त्यानें आपण त्यांचा मांडलिक राजा आहें असें कबूल करून दरसाल कांहीं दालचिनी, माणकें, नीळ, व हत्ती, ह्यांची खंडणी देईन असाही करार केला. हा करार करून घेऊन तो व **जुआनदीसिलवेरा** ह्यांस बेटांत ठेवून **लोपोसोरेज** सिंहलद्वीपांतून निघून गेला.

**कोलंबो** येथें किल्ला बांधण्यास चांगला दगड व चुना मिळाला नाहीं ह्मणून **पोर्तुगीज**लोकांनीं तेथील किल्ला मातीचा व लांकडांचे डांबाचा तयार केला होता; पुढें इ० स० १८२० त कांहीं गवंडी, सुतार व चारशें शिपाई देऊन **लोपोरीब्रितो** ह्या सरदारास हिंदुस्थानांतून रवाना केलें व त्यास असा हुकूम दिला कीं, शिंपा भाजून त्यांचा चुना करून त्या चुन्यानें किल्ला बांधावा. जेव्हां **पोर्तुगीज**लोक वखारीच्या जागीं किल्ला बांधूं लागले तेव्हां सिंहलीलोकांस राग आला व त्यांनीं वीस हजार फौज जमा करून **पोर्तुगीज**लोकांचे वखारीस पांच महिनेपावेतों वेढा घालून राहिले; परंतु हिंदुस्थानांतून **पोर्तुगीज**लोकांस कुमक आली असें पाहून भयानें सिंहलीलोकांनीं वेढा काढला व तेथून निघून गेले; नंतर **पोर्तुगीज**लोकांनीं किल्ला पुरा केला.

ह्या वेळेस लढाईची तहकुबी मात्र झाली होती, परंतु **पोर्तुगीज**लोक **सिंहलद्वीपां**त असेपर्यंत त्यांचें व सिंहलीलोकांचें वैमनस्य नाहींसें झालें नाहीं, ह्यामुळें त्यास नेहमीं लढाई करणें भाग पडे व मोठा खर्च येऊन हिंदुस्थानांत त्यांचे राज्यामुळें जो त्यास फायदा होई तो सर्व इकडेच खर्च होई; त्यांचे फौजेची व दारुगोळ्याची फार खराबी होई.

ह्या वेळचा सिंहलद्वीपाचा राजा नववा **धर्मपराक्रमबाहु** नेबळा व धरसोड मनाचा होता, व त्याचा भाऊ सातवा **विजयाबाहु** व त्याचा मुलगा सातवा **भुवनेक** हेही त्यासारखेच होते. हे **सिंहलद्वीपा**चे नांवचे राजे होते कारण ह्यांचे ताब्यांत देशाचा फार थोडा भाग

होता व एकीकडे पोर्तुगीजलोक त्रास देईत व एकीकडे त्यांचे पदरचे सरदार व प्रजा त्रास देईत ह्यामुळें सिंहलीराजास पोर्तुगीजलोकांचा आश्रय संपादन करणें भाग पडलें.

पोर्तुगीजलोकांस पहिल्यानें क्यांदी येथील डोंगराळ प्रदेशांत राहणारे लोकांनीं हरकत केली. जेव्हां मलबारप्रांताचे लोक सिंहलद्वीपावर स्वाऱ्या करूं लागले तेव्हांही क्यांदी येथील लोकांनींच त्यास अडथळा केला होता व त्याजबरोबर लढून त्यांनीं त्यास आपले देशांत येऊं दिलें नाहीं; त्याप्रमाणेंच ह्या बेटांत पोर्तुगीजलोक सुमारें दीडशें वर्षें होते तोंपर्यंत क्यांदी येथील लोक त्यांस उपद्रव करीत व सतत त्याशीं लढत. ह्याप्रमाणें दीडशें वर्षें लढाई चालल्यामुळें क्यांदी येथील लोकांस अधिक धैर्य व स्वदेशाभिमान आला; इतकेंच नाहीं परंतु त्यांचें लढाई करण्याचें चातुर्य व सामर्थ्यही वाढलें; पोर्तुगीज जेव्हां पहिल्यानें सिंहलद्वीपांत आले, तेव्हां क्यांदीचे लोकांस दारू देखील माहित नव्हती, व बेटांत एकही बंदुक नव्हती परंतु लढाईचा शेवट होतेवेळीं वीस हजार फौज समरंगणांत आणण्यास त्यांस सामर्थ्य आलें होतें.

सातव्या विजयबाहूचा धाकटा मुलगा मायादुनाई हा पहिल्यानें पोर्तुगीज लोकांबरोबर युद्ध करण्यांत पुढारी होता. आपला बाप युरोपियनलोकांचे स्वाधीन झाला आहे व तो आपले सावत्रभावास गादीचा मालक करणार असें वाटून ह्या राजपुत्रानें आपले बापाशीं बंड करून त्यास गुप्तरीतीनें मारवून त्याचा मुलगा सा-

तवा **भुवनेकबाहु** ह्यास गादीवर बसविलें व **सीतावक**-प्रांत आपलेकरितां घेतला व **बामंगमप्रांत** आपले भावास दिला.

सातवा **भुवनेकबाहु** ह्यानें आपले धर्माचा व देशाचा अभिमान अगदींच न बाळगतां तो सर्व प्रकारें **पोर्तुगीज** लोकांचे ताब्यांत गेला; तेव्हां **मायादुनायी** ह्यानें कित्येक वेळां त्याची राजधानी **कोटा** हिजवर हल्ला केला; परंतु **पोर्तुगीज** लोकांचे सहायामुळें **मायादुनायीस** वेढा उठविणें भाग पडलें; परंतु राजावर लोक प्रीति करीनातसे झाले, ह्यामुळें आपले मरणानंतर आपले नातवास राज्यपद मिळतें किंवा नाहीं अशी शंका येऊन त्यास **पोर्तुगीज** लोकांचा सर्वथैव आश्रय करणें भाग पडलें व राज्यपदाबद्दल त्यांची मंजूरी कायम करण्याकरितां त्यानें आपले नातवाचा सोन्याचा पुतळा करून तो व एक रत्नजडित मुगुट असे **पोर्तुगालदेशास** पाठविले व तेथें त्याचा राज्याभिषेक करून घेतला व आपले नातवाचें पहिलें नांव **धर्मपालबाहु** होतें तें असून **दानजुआन** हेंही नांव त्यास जोडलें. **पोर्तुगालदेशच्या** राजानें राज्याभिषेक होण्याची परवानगी दिली परंतु ख्रिस्ती धर्म **सिंहलद्वीपांत** वाढवूं देण्याचा राजाशीं करार केला व जे वकील सोन्याचा पुतळा घेऊन **पोर्तुगालमध्यें** गेले होते त्याजबरोबर धर्माचा प्रसार करण्याकरितां धर्मोपदेशक पाठविले व **कोलंबो** व **ग्याली** ह्यांमध्यें ख्रिस्ती मंडळीची संस्थापना झाली. ह्याप्रमाणें जेव्हां आपले धर्माचा मोड होतो असें **सिंहली** लोकांनीं व **मायादुनायीनें** पाहिलें तेव्हां त्यास संताप येऊन **मायादुनायी**

पुनः युद्धास उभा राहिला, व त्याजबरोबर संग्राम कर-ण्याची तयारी करीत असतां राजास एका पोर्तुगीज गृहस्थाची अकस्मात् गोळी लागून तो कल्याणी गंगानदीचे किनाऱ्यावर मरण पावला.

सातवा भुवनेकबाहु मरण पावल्यावर त्याचे गादीवर त्याचा नातू बसला परंतु तो नांवाचा राजा होता; कारण त्याचा अधिकार कोलंबोचे बाहेर चालत नव्हता; व त्यानें पोर्तुगीज लोकांची मर्जी संपादण्याकरितां बौद्ध धर्म सोडून ख्रिस्ती धर्म स्वीकारिला; व ह्याच वेळेस त्याचे पदरचे पुष्कळ सरदारांनींही तोच धर्म स्वीकारिला.

जेव्हां धर्मपालबाहु गादीवर बसला तेव्हां मायादुनायी व सिंहली लोक ह्यांस क्रोध आला व राजा धर्मपालबाहु अगदीं निराधार झाल्यामुळें पुढें ज्या लढाया झाल्या त्यांचा सर्व बोजा पोर्तुगीज लोकांवर पडला. ह्या प्रसंगीं पोर्तुगीज लोकांनीं अगदीं धरबंध सोडला. राजाच्या प्रजांचें संरक्षण करण्याचें त्यांनीं काम पत्करलें असून त्यांसच ते उपद्रव देऊं लागले. कित्येक लोकांनीं आपलें पुरून ठेवलेलें द्रव्य द्यावें ह्मणून त्यांस गांजूं लागले व मायादुनायीशीं जेव्हां पहिली लढाई झाली तेव्हां पोर्तुगीज लोकांस त्यांत जय प्राप्त झाल्यावर त्या लढाईचा खर्च सिंहली राजापासून घेऊन शिवाय सीतावक प्रांतांत जो लुटीचा पैसा मिळाला होता तो सर्व त्यांनीं घेतला.

पुढें कित्येक वर्षंपावेतों समुद्रकांठचे प्रांतांत पोर्तुगीज लोक व मायादुनायीचें सैन्य ह्यांमध्यें लढाई चा-

लली होती, व पोर्तुगीज लोकांनीं व्यापाराकरितां समुद्र-किनारीं ठाणीं घातलीं होतीं, तीं सर्व मायादुनायीचे अनुयायी लोकांनीं लुटलीं; कित्येक इमारती व देवळें मोडून टाकलीं व ख्रिस्ती लोकांस ठार मारलें; ह्या लढायांमध्यें मायादुनायीच्या मुलानें बापापेक्षां अधिक नांवलौकिक मिळविला व दक्षिणेकडील एका सरदारावर जेव्हां स्वारी केली, त्या स्वारींत शूरत्व दाखविल्यामुळें, त्यास राजासिंह ही पदवी प्राप्त झाली.

इ० स० १५६३ त राजासिंहानें कोलंबोस वेढा घातला; नंतर कोटा शहरावर हल्ला केला, त्या वेळेस तेथील अंमलदार आतेद ह्यास आपली सामग्री संपेल असें भय वाटून पोटाची तजवीज करण्याकरितां मेलेल्या लोकांचें मांस वाळवून त्यांत मीठ घालून ठेवलें होतें. ह्या वेळेस पोर्तुगीज लोकांची खात्री झाली कीं कोटा किल्ल्याचें रक्षण होणें अशक्य आहे तेव्हां तो किल्ला पाडून टाकून कोलंबो येथें राजास रहाणें भाग पडलें व तेथें असतां पोर्तुगीज लोकांनीं त्यानें आपणास द्रव्य द्यावें ह्मणून त्रास दिला.

ह्या लढाईंत पोर्तुगीज लोक सिंहली सरदारांस भय घालून व मायादुनायी व त्याचे मुलाविषयीं मत्सर उत्पन्न करून त्यांस फितवीत असत व त्यांनीं धर्म स्वीकारावा ह्मणून त्यांस उत्तेजन देत असत; परंतु ह्या सरदारास द्यावी तशी मदत देण्यास ते समर्थ नव्हते ह्यामुळें त्यांचा नाश होई व मायादुनायीची शक्ति वाढत असे.

इ० स० १५८७ त क्यांदीचा राजा जयवीर ह्या-

नें ख्रिस्ती धर्माचे पाद्री लोकांस आपले राजधानींत बोलाविलें व तेथें एक देऊळ बांधून देऊन ख्रिस्ती धर्माचा प्रसार व्हावा व आपण तो धर्म स्वीकारला असतां प्रजेपासून आपणास उपद्रव होऊं नये ह्मणून आपले राजधानींत कांहीं सैन्य ठेवावें अशी पोर्तुगीज लोकांपाशीं इच्छा प्रदर्शित केली; त्यावरून एका अंमलदाराबरोबर १२० शिपाई देऊन ब्यार्तिकेलो येथें पाठविले व तेथून ते क्यांदीकडे जात होते इतक्यांत राजाचें मन बदललें तेव्हां त्यानें त्या फौजेच्या टोळीस छापा घालून मारवावें असा बेत केला परंतु मोठ्या संकटानें ते कोलंबो येथें पळून गेले.

पोर्तुगीज लोकांस आपले धर्माचा प्रसार करावा अशी फारच इच्छा होती ह्यामुळें जयवीराचा मुलगा कुमारबंध ह्यानें जेव्हां आणखी फौज आपले राजधानींत पाठवावी अशी विनंति केली तेव्हां हें पूर्वीं झालेलें विश्वासघाताचें कृत्य ते विसरले व क्यांदीशहराकडे कांहीं फौज त्यांनीं पाठविली; तेव्हां तिजवर राजाचे फौजेनें हल्ला केला व पोर्तुगीजलोक पळ काढीत असतां, त्यांपैकीं सातशें लोक मारले गेले.

इ० स० १५७१ त मायादुनायी मरण पावला नंतर त्याचे मागें त्याचा मुलगा राजासिंह सर्वांत लहान असूनही त्याचे गादीवर बसला, व सिंहलद्वीपांत सर्व मांडलिक राजांवर आपण सत्ता करावी असा त्यानें बेत केला. राजघराण्यांतील राज्यपद मिळवूं इच्छिणारे प्रत्येक पुरुषास त्यानें ठार मारलें व कोटाचे राजाबरोबर लढाई करीत असतां जो जो सरदार त्याचे विरुद्ध वागला,

त्याजवर हल्ला करून त्यास जर्जर केलें व बेटाचे आंतील प्रांताचें अधिपत्य मिळवून क्यांदीचे राजास हाकून लाविलें; व त्या राजानें आपला जीव वांचविण्याकरितां मनार येथें पलायन करून तेथें पोर्तुगीजलोकांचे संरक्षणाखालीं राहून आपण व आपले मुलीनें ख्रिस्ती धर्म स्वीकारून आपण दानफिलिफ हें नांव घेतलें व आपले मुलीस दोनाक्याथरिना हें नांव दिलें.

राजसिंहास क्यांदीप्रांत ताब्यांत ठेवणें कठीण पडलें ह्मणून त्यानें तेथील लोकांचीं हत्यारें काढून घेतलीं, व पन्नास हजार शिपाई व तितकेंच बाजारबुणगें व दोन हजार हत्ती व हजारों बैल घेऊन कोलंबोशहरास वेढा घातला. पोर्तुगीजलोकांचे आरमारास भय दाखवण्यास त्यानें कांहीं लढाऊ जहाजेंही मिळविलीं. इ०स०१५८६ त आगष्टपासून मेपर्यंत राजसिंहानें कोलंबो किल्ल्यास वेढा घातला, व त्यावर वारंवार हल्ला करीत असे; ह्या समयीं पोर्तुगीजलोकांनीं किल्ल्याचे बाहेर राहणारे लोकांस फार गांजलें; दक्षिण किनाऱ्यावरील गांवें लुटून फस्त करण्याकरितां जहाजांतून सैन्य पाठविलें, व ह्या दंग्यांत शिपाईलोकांनीं बायकांचे व मुलांच्या अंगावरचे दागिने काढून घेण्याकरितां त्यांचे हात व कान तोडले.

इ० स० १५८७ त जेव्हां पोर्तुगीजलोकांनीं पुनः दुसऱ्यानें स्वारी केली त्या वेळीं तर अतिशयच जुलूम केला; त्याचा सरदार दिसोजा ह्यानें ग्याली, मदमपी, व गिंदुरा हीं गांवें लुटलीं; तनवरम अथवा दोंदिरा हें देवालय लुटून, जाळून फस्त केलें; हें देवालय समुद्राकडे तोंड करून कमानीवर बांधलेलें होतें; त्याचे बु-

रुजावर कोरींव काम केलेलें होतें व भिंतीवर सोन्याचा मुलामा केलेले पत्रे मढविले होते. **दिसोजाचे** हुकुमावरून शिपाईलोकांनीं हें देवळ लुटून हजारों पुतळे व मूर्त्ति मोडून टाकिल्या; देवळाचे आवारांत गाई मारून तें भ्रष्ट केलें; व शेंकडों हस्तिदंती व मोलाचे दागिने, जवाहीर व रत्नें लुटून घेऊन मोडलेलें देऊळ व शेजारच्या इमारती जाळून टाकल्या.

ह्या अरिष्टाची हकीकत ऐकून **राजसिंह** घोटाळ्यांत पडला व **कोलंबोवर** वारंवार हल्ले केले तरी ते निष्फळ झाले व **गोंव्याहून पोर्तुगीजलोकांस** मोठे फौजेची कुमक आली हें पाहून भय वाटून त्यानें वेढा काढला व आपलें सैन्य घेऊन बेटाचे मध्य प्रांतांत गेला. असा पराजय झाल्यावर इ० स० १५९२ त फार ह्मातारा होऊन **सितावक** येथें तो मरण पावला.

जेव्हां राजसिंह संकटांत पडला तेव्हां **पोर्तुगीजलोकांस** चांगली संधि सांपडली व त्यांनीं ख्रिस्तीधर्म स्वीकारलेल्या राजाचे वंशापैकीं पेरेदिनियाचा सरदार **कुनापूबांदार** ह्याजबरोबर सैन्य देऊन **जयवीराची** मुलगी **दानक्याथरीना** हिला गादीवर बसविण्याकरितां पाठविलें, ह्या स्वारींत **दानजुआन** ह्यास यश आलें; **क्यांदी**प्रांताचे लोकांनीं आपली स्वतंत्रता स्थापून **सितावक**प्रांत जमीनदोस्त केला, व आपणास यश मिळालें ह्मणून **दानजुआन** हा उन्मत्त झाला व आपणास सेनाधिपति करून **दानफिलिप** ह्यास राजा करणार व **दोनाक्याथरिनाचें** व त्यांचें लग्न लावणार हें पाहून त्यास राग आला व तो **पोर्तुगीजलोकांशीं** वैमनस्य करूं लागला, व त्या

लोकांस क्यांदीप्रांतांतून हाकून लावून, ड्रार्मफिल्पि ह्यास विष घालून मारविलें, व राजासिंहासनावर आपणच लढूं लागला; तेव्हां कदगनांवाचे खिंडीजवळ कुळुलवित्रावेली येथें एक मोठी निकराची लढाई झाली, त्यांत राजासिंहाचा पराभव झाला व पुढें तो मरण पावला हें मागेंच सांगितलें आहे.

ह्याप्रमाणें दानजुआन ह्यास यश जेव्हां मिळालें, तेव्हां सर्व सत्ता त्यानेंच बळकाविली, व क्यांदीचे गादीवर आपलाच राज्याभिषेक करून विमलधर्म हें नांव त्यानें घेतलें. आपणास भिक्षुकलोकांनीं साह्य करावें ह्मणून त्यानें ख्रिस्ती धर्माचा त्याग केला व बुद्धाचा दांत गोंव्यास नेऊन इ० स० १५६० त पोर्तुगीजलोकांनीं जाळला होता तथापि दुसराच दांत काढून तोच बुद्धाचा आहे असें लोकांस सांगितलें, व क्यांदी येथील बुद्धाचे देवळांतही हाच दांत आहे. त्यानें लोकांस असें सांगितलें कीं, पोर्तुगीज जेव्हां कोटा शहरावर हल्ला करावयास आले तेव्हां सफ्रेगमप्रांतांत देलगमो येथें हा दांत नेऊन ठेवला होता ह्यामुळें पोर्तुगीजलोकांस तो सांपडला नाहीं.

पोर्तुगीजलोकांनीं दानजुआनास पदच्युत करण्याकरितां बरोबर कांहीं फौज देऊन आपला सरदार पेद्रोलोपेजदिसोजा ह्यास पाठविलें; बरोबर क्याथरिना ही राणी होती व दानजुआन ह्यास पदच्युत करून राणीस गादीवर बसवावें असा त्यास हुकूम होता; पहिल्यानें पेद्रोनें दानजुआनास हांकून लावलें परंतु पुढें थोडक्याच दिवसांनीं विमलधर्म परत आला व क्यां-

दीचे फौजेस फितूर करून पोर्तुगीजलोकांचा त्यानें परा-
जय केला, व त्यानें सरदारास ठार मारून राणीस आ-
पले ताब्यांत घेतलें व पुन: क्यांदीचें राज्य करूं ला-
गला, व तें राज्य अंतकाळपर्यंत त्याचे ताब्यांत राहिलें.

ज्याप्रमाणें राजसिंहास सत्ता व महत्त्व प्राप्त झालें होतें त्याप्रमाणेंच विमलधर्मासही सिंहलीलोक मानूं लागले व तोही पोर्तुगीजलोकांचा द्वेष करूं लागला. विमलधर्म आपणाशीं द्रोह करतो व आपला पराजय झाला हें पोर्तुगीजलोकांस सहन करवेना तेव्हां त्यांनीं त्याचा सूड उगविण्याचा बेत केला व लढाई सुरु केली त्यांत त्यांनीं अति अघोर कृत्यें केलीं. इ० स० १५९४ त जेरोमअजावेदो ह्यांस त्यांनीं सेनाधिपति करून पाठ-विला, हा शूर नव्हता पण स्वभावानें फार क्रूर होता. ह्यास जेव्हां लढाईंत यश मिळालें तेव्हां त्यानें कित्येक मातांस आपलीं बाळकें जात्यांत घालून दळवून मारावयास लावलें व नंतर त्यांचीं डोकीं उडविलीं; तसेंच शिपाईलोकांकडून लहान अर्भकांस भाल्यानें टोंचून भाल्यांचे फळावर लोंबविलें व तीं कोंबड्याप्रमाणें आरडतात ह्मणून मौज केली; तसेंच मालवनीचे पुलावरून सुसरीस खाण्याकरितां कित्येक लोकांस ढकली व ती मौज आपण पाहत राही; ह्याची ह्या जलचरास इतकी सवय झाली होती कीं थोडी शीळ घातली कीं त्या वरतीं तोंडें काढून आ पसरीत. परंतु ह्या क्रूर कृत्याचें फळ त्याला ह्या जन्मांतच सोसावें लागलें; कारण तो आपले स्वदेशीं गेल्यावर त्याला तुरुंगांत घातलें व तेथेंच त्याला मरण आलें अशी त्याला देवानें शिक्षा केली.

ह्याप्रमाणें कित्येक वर्षेंपावेतों पोर्तुगीजलोकांमध्यें व क्यांदीप्रांताचे लोकांमध्यें सतत लढाई चालली होती, त्यांत कित्येक वेळां पोर्तुगीजलोकांस जय मिळून ते क्यांदी शहरापर्यंत जिंकीत व क्यांदीप्रांताचे लोकही पोर्तुगीजलोकांस कोलंबोशहरापर्यंत हटवीत; ह्या सर्व लढाया ज्या लोकांच्या हद्दींत होत त्यांस फारच त्रास होऊं लागला; तेव्हां तेही लोक पोर्तुगीजलोकांविरुद्ध उठले व पोर्तुगीज क्रूर कृत्यें करूं लागल्यामुळें ते जिवावर उदार झाले व पोर्तुगीजलोकांबरोबर लढायास गेले. तेव्हां त्या लोकांचें शिपायांचें धैर्य खचून ते आपले अंमलदारांचा हुकूम मानीनात.

असा रक्तस्राव व अनर्थ चालला असतां सिंहलद्वीपाचा शेवटचा औरस राजा दानजुआन धर्मपाळ कोलंबो येथें इ० स० १५९१ त मरण पावला व त्यानें मरणसमयीं मृत्युपत्र केलें त्यांत दुसरा फिलिप ह्यास आपलें राज्य मिळावें असें लिहून ठेवलें; ह्याचे योगानें पोर्तुगीजलोकांस जापने व क्यांदी प्रांत खेरीज करून सर्व आधिपत्य प्राप्त झालें; जापनेचा एक नांवचा राजा होता त्यास ते कबूल करीत व क्यांदीची राणी दोनाक्याथरिना हिचा अधिकार ह्यांनीं पूर्वींच कबूल केला होता.

ह्यानंतर सर्व सिंहली सरदारांनीं व लोकांनीं पोर्तुगालदेशाच्या राजास आपला राजा कबूल करून राजभक्तीची शपथ घेतली व राजानें आपल्या चाली व हक्क ह्यांस बाध आणूं नये असा त्याजकडून करार करून घेऊन राजाच्या सर्व अंमलदारांनीं राजाच्या नांवानें अशी शा-

पथ केली कीं, सिंहलद्वीपाचे प्राचीन कायदे व वहिवा-टीप्रमाणें आह्मीं सर्व वागूं. दोघांमध्यें असाही करार झाला होता कीं ख्रिस्ती धर्माचा उपदेश करण्यास सिंहलीलोकांनीं हरकत घेऊं नये.

ह्याप्रमाणें पोर्तुगीजलोकांचे ताब्यांत जापनेचें द्वीपकल्प खेरीज करून सर्व समुद्रकांठचा प्रदेश आला होता परंतु कयांदीचा डोंगराळ प्रांत त्यांचे ताब्यांत नव्हता, व त्यांत कित्येक किल्ले असत त्या किल्ल्यांतून ते लोक खालीं उतरून स्वाऱ्या करून पोर्तुगीजलोकांस उपद्रव करीत, ह्यामुळें त्यांची पाळत राखण्यास व आपले प्रांताचें रक्षण करण्यास पोर्तुगीजलोकांस वीस हजार फौज ठेवणें भाग पडे, ह्यामुळें व्यापाराचा जो फायदा होई त्यापेक्षां देशाचे रक्षणाचा खर्च अधिक येई. तथापि मातरापासून चिलापर्यंत देशामध्यें स्वस्थता असे ह्यामुळें शेतकरीलोकांस आपलीं शेतें करतां येत. इतर परद्वीपस्थ लोकांस ह्या बेटाशीं व्यापार करूं देत नव्हते इतकेंच नाहीं परंतु सिंहलीलोकांसही व्यापार करण्यास बंदी होती. दालचिनी, मिरें, कस्तूरी, ह्यांत तर सर्व सरकारचाच हक्क होता, त्याशिवाय पतंगाचें लांकूड, सुपारी, अबनस, हत्ती, हस्तिदंत, रत्नें, व मोती हे सर्व जिन्नस परदेशाला जात असत व ह्यांशिवाय ह्याजबरोबर तंबाखू, रेशीम, व कापूस हीं थोडीशीं जात. हे सर्व माल विकत घेण्याकरितां इराण, अरबस्थान, तांबडा समुद्र, चीन, बंगाल, व युरोप येथून जहाजें येत व ह्या लोकांस विकत देऊन दालचिनी अधिक राहिल्यास स्वस्थ विकली जाऊं नये ह्मणून पोर्तु-

गीजलोक ती जाळून टाकीत. जमिनीचे वसुलाऐवजीं राजा धान्य घेत असे. व्यापार सर्व ऐन जिनसाच्याच अदलाबदलीनें होई, व बंदरें व त्यांचे जवळचा प्रदेश खेरीज करून बेटाचे मध्य प्रांतांत नाण्याचा उपयोग होत नव्हता.

**कोलंबो** येथें राजधानीची स्थापना झाली व मोठा व्यापार होत असे ह्यामुळें शहराचें महत्त्व वाढलें; त्या शहरास पूर्वीं मातीचा तट होता तो काढून दगडी तट घालून त्यावर दोनशें तोफा पोर्तुगीजलोकांनीं चढविल्या; शहरांत पुष्कळ देवळें व इस्पितळें बांधलीं. इ० स० १६५६ त जेव्हां डचलोकांनीं हें शहर घेतलें त्या वेळीं त्यांत सरदारांचीं ९०० कुटुंबें व व्यापारी व कामगार मिळून १५०० कुटुंबें होतीं.

**ग्याली** हें बंदर व्यापाराच्या फार सोईचें होतें ह्मणून पोर्तुगीजलोकांस त्याचें महत्त्व वाटत होतें परंतु त्यास तटबंदी वगैरे करून त्याच्या बचावाची चांगली तजवीज करणें जरूर आहे असें पोर्तुगीजलोकांस वाटलें नव्हतें; **कलुतुर** व **निगंब** हीं बंदरें दालचिनी जमा करण्याकरितां राखून ठेविलीं होतीं व **ब्यातिकेलो** व **त्रिंकोमाली** ह्या बंदरांत सिंहलद्वीपांतून पोर्तुगीजलोक जाण्यापूर्वीं थोडेच दिवस वसाहत झाली होती व त्यास तटबंदी केली होती.

इ० स० १६१७ त **जापने** येथें मलबाडचा राजा राज्य करीत होता, त्यास पदच्युत करून तो प्रांत पोर्तुगीजांनीं आपले ताब्यांत घेतला. हा प्रांत घ्यावा असें त्यांच्या मनांत फार दिवसांपासून होतें; कारण कीं, त्या-

पासून त्याचा व्यापार वाढत नव्हता खरा परंतु दक्षिणे-
कडील प्रांतांत जीं त्यांचीं ठाणीं होतीं त्यांस त्याच्या
योगानें अधिक मजबुती येत होती; शिवाय ख्रिस्ती ध-
र्माचा फैलाव करण्यासही त्यास अधिक जागा मिळत
होती. इ० स० १५४४ त पहिल्यानें तो प्रांत घेण्याचा
त्यांनीं यत्न केला तेव्हां दक्षिण किनाऱ्यावरील हिंदु-
लोकांचीं देवालयें लुटण्याकरितां त्यांनीं स्वारी तयार
केली व राजास पत्र पाठविलें कीं त्यानें पोर्तुगालाचे रा-
जाचें आधिपत्य स्वीकारावें नाहीं तर आपण त्याचा
प्रांत लुटतों; तेव्हां राजानें वर्षास चार हजार डुकाटांची
( ह्मणजे सुमारें नऊ हजार रुपयांची ) खंडणी देण्याचें
कबूल केलें. ह्या वर्षीं मानार येथील पुष्कळ लोकांनीं
ख्रिस्ती धर्म स्वीकारला ह्यामुळें राजास फार क्रोध ये-
ऊन त्यानें सहाशें बाटेलोक ठार मारून ख्रिस्ती धर्माचा
प्रसार होण्याचें बंद करावें असें राजानें मनांत आणलें;
परंतु ख्रिस्ती धर्म त्याचे घरांत शिरला. त्याचे वडील मु-
लानें ख्रिस्ती धर्म स्वीकारल्यामुळें त्यास ठार मारविलें
व आपले बापाचे रागांतून सुटावें ह्मणून दुसरा मुलगा
गोंव्यास पळून गेला.

पोर्तुगालचा राजा तिसरा जान ह्यानें जापनेच्या रा-
जानें अशी क्रूर कृत्यें केल्याबद्दल त्याचा सूड उगवि-
ण्याचा हिंदुस्थानचे प्रतिनिधीस हुकूम केला. त्यावरून
हिंदुस्थानचा प्रतिनिधी दानकान्स्तंताइन्दीब्रगंजा ह्यानें
जापनेवर स्वारीची तयारी केली, त्याचे दोन उद्देश होते.
एक मनार येथें ख्रिस्ती लोकांस तेथील राजा गांजतो,
ती गांजणूक बंद करावी व गोंवें येथें पळून गेलेला जो

राजपुत्र त्यास त्याचे गादीवर बसवावें. ह्या स्वारींत यश आलें परंतु नुकसान फारच झालें, व शत्रूच्या तोफेच्या योगानें पुष्कळ सरदार मेले. शहर हस्तगत झालें, राजवाडा जाळून टाकिला, तेव्हां राजास मोठें संकट प्राप्त होऊन तो शरण गेला व त्यास पोर्तुगीजलोकांशीं तह करणें भाग पडलें, त्यांत दानजुआन धर्मपाळाचा बाप व सातव्या भुवनेकबाहूचा जांवई त्रिब्युलाबांडा ह्यानें क्यांदी व कोटाशहर लुटून आणलेली संपत्ति कोठें पुरून ठेवली आहे ती दाखवावी असा करार केला.

ह्या लढाईंत वाईसराय ( प्रतिनिधि ) ह्यानें जापने येथून बुद्धाचा दांत नेला, हा दंत बुद्धधर्म पाळणारे संस्थानांत जेव्हां दंगा झाला तेव्हां जापने येथें आणून ठेवला होता. पोर्तुगीजलोक ह्मणत कीं, हा वानराचा दांत व त्याची मारुतीच्या नांवानें पूजा करीत असत. हा दांत सोन्यांत बसवलेला होता व चोरीस जाऊं नये ह्मणून एका देवळांत ठेवला होता. दानकानस्तंताईन ह्यानें दांत आपले ताब्यांत घेतला आहे असें जेव्हां पेगूचे राजानें ऐकलें तेव्हां त्यानें गोंव्यास तो दांत परत आणण्याकरितां वकील पाठविला व तीन हजार अथवा चार हजार क्रुजेडो ( एक नाणें आहे ) देतों, व आपण पुष्कळ उपयोगीं पडूं व मलाका येथें जो पोर्तुगीजलोकांचा किल्ला आहे तेथें जितके वेळ जरूर लागेल तितके वेळ सामग्री देऊं असा निरोप पाठविला. तेव्हां पोर्तुगीजसरदार व सेनाधिपति आपले खजिन्यांत पैसा नाहीं ह्मणून ती गोष्ट कबूल करावी व दांत परत द्यावा असें त्यांचें मत पडलें; परंतु मुख्य पाद्री दानग्यास्पर

ह्यास ती गोष्ट मान्य पडेना; ह्यामुळें व्हाइसराय ह्यांनीं सर्वांचे समक्ष तो दांत खलबत्त्यांत घालून कुटून त्याची पूड केली व ती जाळून टाकली व राख समुद्रांत फें-कून दिली.

इ० स० १५९१ त व १६०४ त जापनेचे राजाचें शासन करण्याकरितां पोर्तुगीजलोकांनीं स्वाऱ्या केल्या; परंतु प्रत्येक वेळीं राजा शरण गेल्यामुळें त्यावरचें अ-रिष्ट टळलें, परंतु जापनेप्रांत आपले ताब्यांत घ्यावा, असा पोर्तुगीजलोकांनीं निश्चय केला होता ह्यामुळें इ० स० १६१७ त पुनः जापनेवर स्वारी केली, व रा-जास धरून गोंव्यास नेलें व तेथें फांशीं दिलें, व म-लबाडचे राजाचे वंशांतील शेवटचा जो त्याचा पुतण्या त्यानें राज्यावरचा हक्क सोडून मठवासी झाला; तेव्हां जापनेप्रांत पोर्तुगीजलोकांनीं आपले राज्यांत सामिल केला. पुनः इ० स० १६२२ त मलबाडचे लोकांनीं जापनेप्रांत परत घेण्याकरितां स्वारी केली; परंतु पोर्तु-गीजलोकांचा गव्हरनर आलिवेरा ह्याचे हिमतीनें ती स्वारी निष्फळ झाली; परंतु पोर्तुगीजांचें शासन करून त्यांजपासून सिंहलद्वीप आपले ताब्यांत घेण्याकरितां दुसरेंच एक राष्ट्र उभें राहिलें. डचलोकांनीं क्यांदीचे दरबारीं आपला हात शिरकविला होता व त्यांनीं रा-जाशीं सल्ला केला होता, त्याच्या योगानें त्यांनीं पोर्तु-गीज़लोकांस कसें हांकून लावलें, त्यांचा व्यापार कसा मोडला, व ख्रिस्ती धर्माचा प्रसार होणें कसें बंद झालें ह्याचा वृत्तांत पुढचे भागांत येणार आहे.

---

# प्रकरण दुसरें.—भाग तिसरा.

## दचलोकांची कारकीर्द.

इ० स० १५९४ त पोर्तुगीजलोकांचा राजा दुसरा फिलिप ह्यानें दचलोकांचा व्यापार बुडवून टाकावा असें मनांत आणिलें; त्यापासून आपले लोकांचे व्यापाराची हानि होईल हें मनांत न आणतां आपल्या शत्रूबरोबर व्यापार करूं नये असा आपल्या प्रजेस हुकूम केला; दचलोकांची तेगसनदींत जीं जहाजें होतीं त्यांस बाहेर जाऊं देण्याची मनाई केली; त्यांच्या जहाजावरचे कामगार लोकांस कैदी करून त्यांस पाखांडी आहेत असें मानून त्यांची छळणा चालविली. दचलोकांचा अशा रीतीनें व्यापार बुडविण्यास यत्न केला, त्यामुळें त्यांस अधिकच स्फुरण चढलें; व हा जुलमाचा हुकूम होऊन एक वर्ष गेलें नाहीं तोंच दचलोकांनीं आपला माल विकण्याकरितां हिंदुस्थानाकडे जहाजें रवाना केलीं. इ० स० १५९५ त दूरदेशीं व्यापार करण्याकरितां दचलोकांची कंपनी बनली; व इ० स० १६०२ त सिंहलद्वीपांत ब्यातिकेलो ह्या बंदरांत दचलोकांचें जहाज पहिल्यानें आलें. दचलोकांस बेटाविषयीं माहिती चांगली नव्हती ह्यामुळें कोलंबो येथें दालचिनी जशी विपुल मिळते तशीच पूर्व किनाऱ्यावर मिळेल असें त्यांस वाटत होतें ह्यामुळें तेथें ते लोक आले व आपला दालचिनी विकत घेण्याचा हेतु आहे असें त्यांनीं जाहीर केलें.

ह्या वेळेस दोनाक्याथारिनाचा पति विमलधर्म

**क्यांदी** येथें राज्य करीत होता व त्यानें बादशाहा ही पदवी धारण केली होती. त्याचे पदरचे सरदार राजे ह्मणवीत; ह्यांपैकीं **ब्यातिकेलोचा** राजा बाह्यात्कारीं **पोर्तुगालचा** अधिकार कबूल करी परंतु आंतून आपले राजाचे पक्षाचा होता. **दचलोक ब्यातिकेलो** येथें आले तेव्हां त्यांस तो **पोर्तुगीजलोक** असें समजला व ह्या परद्वीपस्थ लोकांचें त्यानें चांगलें आगतस्वागत केलें नाहीं पण तेथें **दचलोकांचा** कामगार **स्पिलबर्ग** ह्यास एक महिनाभर दालचिनी देतों असें सांगून थांबवून ठेवलें व बादशाहास त्यानें आपलीं पत्रें वगैरे स्वतः नेऊन द्यावीं ह्मणून **क्यांदी** येथें नेऊन पोहोंचविलें.

राजानें **स्पिलबर्ग** ह्याचा मोठा सत्कार केला व त्याचे सन्मानार्थ एक पलटण बोलाविली होती, त्यांतील शिपायांजवळ **पोर्तुगीजलोकांकडून** हिरावून घेतलेलीं हत्यारें व निशाणें होतीं, व ह्या प्रसंगीं कित्येक कान कापून चाकरीस ठेवलेले **पोर्तुगीज** कैदी त्याचे स्वारींत होते. **स्पिलबर्गानें युनैतेद्प्राविन्साचें** व **पोर्तुगालचें** अशीं दोन निशाणें राजाचे पायावर घातलीं.

परद्वीपस्थलोक येऊन **विमलधर्मापाशीं** दालचिनी मागत असत परंतु त्याचे मनांतून तो व्यापार बंद व्हावा असें होतें ह्मणून **स्पिलबर्गास** दालचिनीची किंमत फार सांगून थोडीशी देतों असें ह्मणाला. परंतु **स्पिलबर्गानें** राजास असें खात्रीनें सांगितलें कीं, आपण व्यापार करण्याचे उद्देशानें आलों नाहीं परंतु राजाशीं दोस्ती व्हावी ह्मणून **हालंदाचे** राजानें आपणास पाठविलें आहे व त्यास परचक्र येऊन इजा व्हावयास ला-

गली तर राजा त्यास मदत देईल असें सांगितलें; तेव्हां राजानें त्याचे गळ्यास मिठी घातली, व त्यास आलिंगन देऊन त्याचें बोलणें उत्साहानें कबूल केलें. आपले देशांतील सर्व दालचिनी हालंदाचे राजाचीच आहे असें सांगून पोर्तुगीजलोकांचा व्यापार मोडून जावा ह्मणून दालचिनीचीं झाडें तोडून टाकावयास आपण हुकूम दिला, त्यामुळें दालचिनी थोडीच राहिली आहे ह्यास्तव आपणास वाईट वाटतें असेंही सांगितलें.

पावसाळा येईपर्यंत राजानें क्यांदी येथें स्पिलबर्गास थांबवून घेतलें व आपली राणी दोनाक्याथरिना हिची व आपले मुलांची ओळख करून दिली व आपले राज्यांत पाहिजे तेथें किल्ला बांधण्याची त्यास परवानगी देऊन त्यास बांधण्याकरितां आपले घरचीं मनुष्यें देखील स्वहस्तें मदत करतील असें सांगितलें.

राजानें विनंती केल्यावरून दचलोकांचे सरदारानें आपला सेक्रेतरी व दोन ब्यांडवाले राजाच्या दरबारीं ठेविले व मोठा सत्कार होऊन व बक्षिसें घेऊन तो ब्यातिकेलो येथें परत गेला, नंतर त्यानें मसाल्यानें भरलेले व चाळीस लोकांनीं चालवलेलें असें पोर्तुगीजलोकांचें तारूं काबीज करून त्रिमलधर्माचे स्वाधीन केलें, यावरून त्यानें राजाचे उपकार स्मरले व पोर्तुगीजांचें व आपलें वैर आहे असें राजास दाखविलें.

दचलोकांचे वकिलाबरोबर केलेले ठरावाप्रमाणें स्पिलबर्गाचे हाताखालचा एक अंमलदार तीन जहाजें बरोबर घेऊन पोर्तुगीजलोकांस लुटण्यास व ग्यालीस वेढा घालण्यास ब्यातिकेलो येथून निघाला; पण त्यानें

पकडलेली शिकार राजाच्या इच्छेच्या विरुद्ध सोडून दिली, त्यावरून बोलाचाल झाली त्यांत दचलोकांचा अंमलदार दारू पिऊन उन्मत्त झाला असतां ग्यालीवर हल्ला करण्याचा आपण करार केला नाहीं असें बोलून राणीची निंदा त्यानें केली, तेव्हां विमलधर्मास राग येऊन त्यानें त्यास कैद केलें व राजाचा हुकूम नसतां त्याचे नौकरांनीं त्याचें डोकें फोडलें व खलाशीलोकांस ठार मारलें. नंतर राजा क्यांदीस परत आला व त्यास वाटलें कीं आतां आपलें व दचलोकांचें युद्ध होतें ह्मणून त्यानें त्यांचे अंमलदारास एक मनास लागण्यासारखा निरोप पाठविला, तो असा "जो मद्य पितो तो संकटांत पडतो, ईश्वर न्यायी आहे, जर तुमचे मनांतून सल्ला करावयाचा असला तर सल्ला होऊंद्या व युद्ध करावयाचें असेल तर युद्ध होऊंद्या;" त्याच्या अंमलदारास ठार मारलें परंतु दचलोकांनीं युद्ध करावें असें मनांत आणलें नाहीं; व पुढचे सालीं बादशाहा मरण पावला ह्यामुळें युद्धाचें कारणही राहिलें नाहीं.

इ० स० १६०४ त विमलधर्म मरण पावल्यावर मुलें लहान होतीं ह्यामुळें राणीच सिंहलद्वीपाचा राज्यकारभार करूं लागली; परंतु उव्हा येथील राजा व मयत राजाचा भाऊ ह्यांजमध्यें राजपुत्राचें पाळण कोणीं करावें ह्याबद्दल तंटा झाला त्यांत उव्हाचा राजा मारला गेला व राजाचे भावाशीं राणीनें लग्न केलें व भावानें सेनारत हें नांव धारण केलें व आपण राज्यकारभार पाहूं लागला.

ह्यापुढें कांहीं दिवसपावेतों सिंहलद्वीपांत शांतता

राहिली; दोनाक्याथरिना हिनें पोर्तुगीजलोकांशीं तह करीत नाहीं असें सांगून दचलोकांशीं तह केला. ह्या वेळेस हालंद व स्पेन ह्या दोन देशांमध्यें युरोपखंडाचे संबंधानें तह झाला परंतु एशियाखंडांत भांडण चाललें होतें; दचलोकांचे मनांत आपली सत्ता सिंहलद्वीपांत वाढवावी असें आल्यावरून त्यांनीं तेथील राजाकडे वकील पाठविला व त्यास कळविलें कीं, जर पोर्तुगीजलोक समुद्राकडून अथवा खुषकीवरून हल्ला करतील तर आपण जहाजें, फौज व दारूगोळा देऊन त्यास मदत करूं. ह्याप्रमाणें दचलोकांनीं साह्य करण्याचें कबूल केल्यावर राजानें त्रिंकोमालीचे उपसागराचे दक्षिणेचे बाजूस कोतियार येथें किल्ला बांधण्यास दचलोकांस परवानगी देऊन दालचिनी, रत्नें, व मोत्यें ह्यांचा व्यापार करण्याबद्दल मक्ता दिला. सिंहलद्वीपाचे राजाचे मनांत दचलोकांची दोस्ती करावी असें फारच होतें ह्यामुळें त्यानें त्यांचे वकिलास आपले दरबारीं हालंदाचा वकील व आपला राज्यकारभारांत मंत्री ह्मणून ठेवून घेऊन त्यास पुष्कळ किताब दिले.

दचलोकांनीं कोतियार येथें इ० स० १६१२ त किल्ला बांधला नंतर पोर्तुगीजलोकांनीं लागलाच त्यावर छापा घालून तो मोडून टाकला; ह्या वेळेस सेनारतराजानें ग्याली व कोलंबो ह्या दोन शहरांवर एकदम हल्ला करण्याची तयारी केली, व बायका व मुलें खेरीज पोर्तुगीज लोकांपैकीं कोणासही माफी करावयाची नाहीं असा निश्चय केला; परंतु पोर्तुगीजलोकांनींच पहि-

त्यानें युद्धास आरंभ करून सेवनकोलींज येथें त्याचा सामना करून त्याचा पराजय केला.

ह्या वेळेस दोनाक्याथरिनाचे वडिल मुलास राजानें विष घालवून त्यास मारविलें ह्यामुळें राणीचें हृदय फुटून त्या दुःखानें ती मरण पावली. पुढें पुष्कळ अरिष्टें आलीं व पोर्तुगीजलोक क्यांदीपासून थोडेच अंतरावर चाल करून आले; परंतु मोठ्या क्लेशानें राजानें त्यास मागें हटवलें, तेव्हां सेनारत ह्यानें दचांचे वकिलांस हालंदास कुमक मागण्यास पाठविलें. जेव्हां वकील परत आपले गांवीं गेला तेव्हां क्यांदीचे लोक आपले देशबांधवांस आवडत नाहींत व आपले लोकांची सिंहलद्वीपांत जाऊन लढाई करूं नये अशी इच्छा नजरेस पडली. नंतर तो देन्सलोकांकडे कुमक मागण्यास गेला व तेथून फौज घेऊन सिंहलद्वीपाकडे परत येत असतां वाटेंत मरण पावला; तत्रापि देन्सलोकांचा सेनाधिपती सिंहलद्वीपास जहाजें व फौज घेऊन आला परंतु राजानें त्याची मदत न घेतां त्यास देन्मार्कास परत पाठविलें.

राजा संकटांत पडला आहे असें पाहून पोर्तुगीजलोकांस संधि सांपडली व त्यांनीं राजाशीं इ० स० १६२४ त तह केला परंतु त्याचे कराराविरुद्ध ब्यातिकेलो येथें किल्ला बांधण्यास आरंभ केला; त्रिंकोमाली येथें त्यांनीं पूर्वींच किल्ला बांधला होता.

सिंहलद्वीपाचे राजास असें वाटलें कीं, आपणास दचलोकांनीं तर सोडून दिलें व पोर्तुगीजलोकांनीं तर चोहोंकडें ठाणीं बसविलीं तेव्हां त्यांस भय वाटून त्यांनीं

**सिंहली**लोकांस उत्तेजन दिलें व वातुक युरोपियन लोकांस बेटांतून हांकून देण्याकरितां मोठा यत्न केला. बेटांत दोन ठिकाणीं एकदम युद्ध चालू झालें. ह्या वेळेस **पोर्तुगीज**लोकांचा गव्हर्नर **दानकानस्तंताईनदीसा** हा होता. त्यास **गोवें** येथील प्रतिनिधीनें लावून पत्रें लिहिलीं त्यामुळें त्यास वाईट वाटलें व त्यानें **उव्हावर** स्वारी करण्याकरितां सर्व फौज जमा केली, कारण त्यास तेथील लोक आपले राजास सोडून **पोर्तुगीज**लोकांस येऊन मिळतील असें सांगितलें होतें. इ० स० १६३०त १५०० गोरे लोक, १५०० मिश्रजातीचे व सुमारें दहा हजार **सिंहली**लोक घेऊन **दानकानस्तंताईनदीसा** निघाला व वाटेंत अडथळा न आणतां त्यांस डोंगराचे खिंडींतून **बादुला** शहरापर्यंत जाऊं दिलें व तें शहर त्यानें जाळलें व लुटून टाकिलें. नंतर त्या शहरांतून परत येत असतां एका संकेतानें ठरविलेल्या जागेवर सर्व **सिंहली**लोक त्यास सोडून आपले फौजेस मिळाले, तेव्हां **पोर्तुगीज**लोक पाशांत सांपडून ठार मारले गेले व त्यांच्या सेनाधिपतीचें शिर राजाचा मुलगा **राजासिंह** ह्याजकडे आणलें. ह्या वेळेस **क्यांदीचे** लोकांनीं जयानें उन्मत्त होऊन **कोलंबोवर** चाल केली परंतु **गोव्याहून** वेळेवर मदत आल्यामुळें त्यांचे हातून कांहीं झालें नाहीं.

**दानकानस्तंताईनदीसाचा** असा दुःखकारक परिणाम झाला हें ऐकून सर्व **पोर्तुगीज**लोकांस खेद वाटला व तेव्हांपासून **सिंहलद्वीपांत** त्या लोकांस विपत्ति प्राप्त झाली. **पोर्तुगीज** व **सिंहली**लोक लढाई करून करून थकले व राजाच्या विनंतीवरून **पोर्तुगीज**लो-

कांनीं तह करण्याचें कबूल केलें व राजानें पूर्वीप्रमाणें हत्तींची खंडणी देतों असें सांगितलें. ह्या लढाईनंतर थोडक्याच काळानें सेनारत मरण पावला व त्याचा मुलगा राजासिंह क्यांदीचे गादीवर बसला व त्यानें आपले धाकटे भावास उव्हा व मातेली हीं संस्थानें दिलीं.

राजासिंहाचेच कारकीर्दींत पोर्तुगीजलोकांस सिंहलद्वीपांतून हांकून लावून त्यांचा सर्व मुलूख दचलोकांस दिला. राजा मरण पावल्यावर त्याचे राज्यांत पोर्तुगीजलोक पुनः लुटालुट करूं लागले तेव्हां राजासिंहाचा असा निश्चय झाला कीं, जोंपर्यंत पोर्तुगीज आपले बेटांत आहेत तोंपर्यंत शांतता राहणार नाहीं त्यानें ब्यातेव्हिया येथील दचलोकांची पोर्तुगीजलोकांस हाकून लावण्याकरितां मदत मागितली.

दचलोकांनीं निमंत्रण कबूल करून आपला सरदार कोमोदोरकास्तर ह्यास इ० स० १६३८ त सिंहलद्वीपाकडे पाठविलें व आरमार पाठवून हल्ला करीपर्यंत युद्ध करण्याची पूर्वीची तयारी करण्यास त्यास हुकूम केला. हें वर्तमान क्यांदीचे गव्हरनरानें ऐकलें तेव्हां पोर्तुगीजलोकांचा हेतु तडीस न जावा ह्मणून त्यानें क्यांदीशहरावर हल्ला करून तें लुटून जाळून टाकलें; परंतु परत जात असतां क्यांदीचे लोकांनीं त्यास पर्वतांत घेरा घालून सर्व फौज मारून टाकली.

इ० स० १६३८ त नौकाधिपति वेस्तरवोल्द सिंहलद्वीपाचे जवळचे समुद्रांत आपलें आरमार घेऊन आला व त्या वेळेपासून वीस वर्षेंपावेतों दच व पोर्तु-

गीज ह्यांमध्यें युद्ध चाललें होतें शेवटीं पोर्तुगीज त्या द्वीपांतून निघून गेले.

इ० स० १६३८ त वेस्तरवोल्द ह्यानें पोर्तुगीजाकडून ब्यातिकेलोचा किल्ला घेतला व तेथेंच क्यांदीचे राजाशीं तह केला. त्यांत दोघांनीं मिळून पोर्तुगीजांशीं लढाई चालविण्याचें ठरवून डचलोकांनीं दारूगोळा व फौज आणावी व सर्व खर्च राजानें चालवावा व लूट दोघांनीं वांटून घ्यावी असें ठरविलें होतें.

इ० स० १६३९ त डचलोकांनीं त्रिंकोमाली काबीज करून तेथें आपली फौज ठेविली परंतु कांहीं दिवसांनीं तें शहर सोडून दिलें. इ० स० १६४० त निगंब, मातर व ग्याली हीं शहरें घेतलीं. कोलंबोस राजसिंहानें वेढा घातला होता व तेंही लवकर काबीज झालें असतें परंतु डचलोकांची शक्ति वाढत चालली ह्मणून राजसिंहास भय वाटून त्यानें तो किल्ला पोर्तुगीजांस आपले ताब्यांत ठेवूं दिला व इ० स० १६४० त निगंब शहर परत घेऊं दिलें.

राजाच्या ह्या प्रकारच्या कारस्थानानें डचलोकांची हिम्मत खचली, व पुढें लढाई करण्याचें त्यांनीं बंद केलें, व इ० स० १६४६ त पोर्तुगाल व हालंद ह्या दोन देशांत तह झाला. त्यांत असा करार केला होता कीं, सिंहलद्वीपांत दोघांनींही जिंकलेला मुलूख आपआपले ताब्यांत राखावा.

डचलोकांच्या अंमलदाराचें वर्तन पाहून सिंहलीराजास त्यांचा भरंवसा वाटेना व दोन्ही परद्वीपस्थ लोकांच्या ताब्यांतून आपला देश मुक्त होईल अशी त्यास

आशा नाहींशी झाली व दोहों लोकांचा आपसांत कलह लावणें हाच आपला तरणोपाय आहे असा राजानें निश्चय करून तोच क्रम सुरू केला. ह्या बेताप्रमाणें पोर्तुगीजलोकांचे मुलुखांतून जाऊन त्यानें निगंबावर हल्ला केला व तेथील शिबंदीलोकांस कैद करून अंमलदारांस ठार मारलें, व त्यांचीं डोकीं रेशमी कपड्यांत गुंडाळून ग्याली येथें त्यांचा सेनाधिपति होता त्याजकडे पाठविलीं.

ह्या अघोर कृत्याबद्दल राग न आणतां अशा गोष्टी डचलोकांनीं निमूटपणीं सहन केल्या व आपणास दालचिनीचा व्यापार करूं द्यावा ह्मणून राजाचीं अर्जवें केलीं व आपणास लढाईचा खर्च दिल्यास आपण आपले ताब्यांतील कांहीं मजबूत किल्ले परत देऊं असें कबूल केलें. ते ह्मणत कीं आपला नाश केला ह्यांत राजाकडे कांहीं नाहीं परंतु वेस्तरबोलदाचे तहामुळें आपले द्वेषी पोर्तुगीजलोकांस वाईट वाटलें व ते बदसला देतात ह्यामुळें राजा असें करितो. ह्याप्रमाणें नजरा देऊन व गोड भाषणांनीं डचलोकांचे गव्हर्नरानें राजाची मर्जी सुप्रसन्न करून आपले लढाईंत कैद केलेले लोक त्यानें सोडवून घेतले, व दालचिनी पिकणारे मुलूखाचे हद्दीवरचीं दोन ठाणीं एक निगंब व दुसरें ग्याली इ० स० १६५० पर्यंत आपले ताब्यांत ठेविलीं; तेव्हां पोर्तुगाल व हालंद ह्या दोन देशांतील तहाची मुदत संपली, व लढाई चालू झाली.

ह्या वेळेस कोलंबो येथील पोर्तुगीजलोकांनीं आपले गव्हर्नराविरुद्ध बंड केलें होतें; तेव्हां राजसिंह

व दचलोक ह्यांनीं व्यातेविया येथून कुमक आल्यावर त्याली येथून निघून कल्तुतरावर स्वारी करून तें काबीज केलें व कोलंबोसही वेढा घालून तें हस्तगत केलें. ह्याप्रमाणें जय मिळतांच क्यांदीचे लोकांमध्यें व दचलोकांमध्यें युद्ध चालू झालें, त्याचें कारण असें झालें कीं, दचलोक आपण जिंकलेला मुलूख आपले ताब्यांत राहावा असें ह्मणूं लागले व राजसिंह वेस्तरवोल्दाचे तहाचे कराराप्रमाणें तो आपणांस मिळावा असें ह्मणूं लागला.

राजानें कोलंबो घेण्याचा यत्न केला परंतु त्यांत त्याचा पराजय झाला; नंतर राजानें सभोंवतालचा मुलूख आपले हातीं घेऊन कोलंबो किल्ल्याचें दाणापाणी बंद केलें व पोर्तुगीजलोकांशीं सल्ल्याचें बोलणें चालविलें; ह्यामुळें दचलोकांची सत्ता वाढण्यास हरकत झाली; परंतु इ० स० १६५८ त त्यांनीं मानारबेट आपले स्वाधीन करून घेतलें व जाफनापटम किल्ल्यास वेढा घातला तेव्हां त्यांतील लोक शरण येऊन त्यांनीं किल्ला दिला.

ह्याप्रमाणें सर्व समुद्रकिनारा व बेटांतील सपाट प्रदेश दचलोकांचे ताब्यांत आला, व पोर्तुगीजलोक देशांतून हाकले गेले व क्यांदीचे राजाचा अधिकार डोंगराळप्रांतांत मात्र राहिला तेव्हां दचलोकांनीं आपल्या जयापासून होईल तितका फायदा करून घेतला. त्यांची वागणूक पोर्तुगीजलोकांसारखी नव्हती; त्यांची देश काबीज करावा अशी मनीषा नव्हती व सिंहलीलोकांस क्रूरत्वानें वागवीत नसत. पोर्तुगीजलोकांचें लक्ष्य, धर्मप्रसाराकडे होतें पण दचलोकांचे मनांत व्यापाराची

वृद्धि करावी इतकेंच होतें. पोर्तुगीजलोकांचे शिपाई सिंहलीराजानें हल्ला केला तर त्यास प्रतिबंध करून सूड उगवीत असत. परंतु दचलोकांचे अंमलदार सिंहलीराजानें जुलूम किंवा अपमान केला असतां तो सोशीत असत. दचलोकांचा उद्देश व्यापार वाढविण्याचा होता ह्मणून जोंपर्यंत व्यापारास अडथळा न येई तोंपर्यंत कोणत्याही तऱ्हेचा एका मनुष्यास उपद्रव केला तरी त्याकडे ते लक्ष देत नसत.

अशा हलकटपणानें दचलोक वागतात असें कळल्यावर दुसरा राजसिंह दचलोकांशीं उद्धटपणानें व मग्रूरीनें वागूं लागला; सर्व करार व तहाकडे दुर्लक्ष्य करून त्यानें दचलोकांचा मुलूख जमीनदोस्त केला व त्यांच्या प्रजेपैकीं कित्येकांस मारून टाकलें; तथापि दच त्यास अर्जवानें पत्रें लिहीत पण राजा त्यांस तिरस्कारानें वागवी व त्यांनीं पाठविलेले वकिलास कैद करून ठेवी व ठार मारी.

इ० स० १६७९ त जेव्हां नाकससाहेब कैदेंतून पळाला त्या वेळेस दचलोकांपैकीं पन्नास लोक राजाचे तुरुंगांत होते त्यांपैकीं पांच वकील होते, शिवाय कित्येक फ्रेंच व इंग्रज लोक होते, व त्यांस सोडविण्याकरितां पंधरा वर्षांपूर्वीं सरएदवर्दबुइंतर मद्रासेंतून आला होता परंतु त्याचा यत्न सिद्धीस गेला नाहीं.

फौज व लढाईची सामग्री नसल्यामुळें सिंहलीराजा दचलोकांवर चाल करून जाण्यास असमर्थ असतां त्यानें आपला राग आपले प्रजेवरच काढला, व जे लोक आपणास प्रतिकूळ आहेत किंवा जे दचलोकांचे संगन-

मतानें वागतात असा त्यांस वहीम येई त्यास राजा क्रूरत्वानें वागवी. शेवटीं क्यांदीचे लोकांस हें सहन होईना त्यामुळें त्यांनीं बंड करून व राजास डोंगरांत पळवून लावून त्यांनीं त्यांचा बारा वर्षांचा मुलगा होता त्यास त्याचे गादीवर बसविलें पण मुलगा भिऊन बापाकडे गेला व बंडवाले जिकडे तिकडे पळून गेले; व अशा प्रकारचें बंड होऊं नये ह्मणून राजानें आपले मुलास विष घालून मारविलें; हें बंड झाल्यावर कांहीं दिवस दृचलोकांस त्यानें उपद्रव दिला नाहीं.

**कोलंबो** हस्तगत झाल्यावर जो काळ गेला त्या काळांत दृचलोकांचें लक्ष्य मुख्यत्वेंकरून आपले मुलुखाचे बचावाकडे होतें; समुद्राचे किनाऱ्यावरचीं सर्व ठाणीं **मांतर, ग्याली, कोलंबो, निगंब, चिला** व **जापने** वगैरे तटबंदी घालून त्यांनीं मजबूद केलीं. **ब्यातिकेलो** व **त्रिकोमाली** ह्या शहरांत दालचिनी मिळत नाहीं ह्मणून तीं सोडून दिलीं. सर्व ठाण्यांत आपला बचाव होण्याकरितां तयारी ठेविली होती, दारूगोळा व शिबंदीचें पोटगीचें एक वर्ष पुरे इतकें धान्य सांठवून ठेविलें होतें; सर्व समुद्रावर आपली हुकमत राखून **बांतोत** व **निगंब** ह्यांमधील खाड्या नौका जाण्यासारख्या ठेविल्या होत्या व **क्यांदी**चे राज्याचे सरहद्दीपर्यंत दळणवळण चालावें ह्मणून **कल्याणीगंगा** नदीवर नावा ठेविल्या होत्या.

ह्याप्रमाणें हल्ला आला असतां त्याबद्दल तयारी ठेवून **ग्याली** व **कोलंबो** येथें निःशंकपणानें व्यापार चालविला होता; व माल भरून जहाजें **युरोपखंडा**-

कडेच पाठवीत होते इतकेंच नाहीं परंतु **मोका**, **इराण**, **हिंदुस्थान** व **मलुका** वगैरे **आशियाखंडां**तील ठिकाणांशीं व्यापार चालविला होता व तिकडे **सिंहलद्वीपां**तील माल जाई; हा सर्व व्यापार सरकार आपले तर्फेनें करी; घरगुती लोकांस व्यापार करण्याची अगदीं बंदी होती.

**पोर्तुगीज**लोकांस दालचिनी मिळवून देण्याकरितां **कोटाचे** राजांनीं अशी तजवीज केली होती कीं, **चालीयास** लोकांचें व त्यांच्या जमीनीचें राजानें रक्षण करावें व त्याबद्दल **चालीयास**लोकांनीं कांहीं किम्मत घेऊन दालचिनीची साल काढून विकण्यास तयार अशी करून द्यावी. जोंपर्यंत **सिंहलद्वीप पोर्तुगीज**लोकांचे ताब्यांत होतें तोंपर्यंत अशीच वहिवाट चालली होती; परंतु **दच**लोकांचे ताब्यांत जेव्हां मुलूख आला तेव्हां राजाच्या परवानगीनें ते लोक स्वतः दालचिनी मजूर लावून जमा करवूं लागले व **मातरापासून चिलापर्यंत** जे त्यांचे किल्ले होते त्यांचे सभोंवतीं दालचिनीची लागण करूं लागले; व ह्या प्रदेशांत दालचिनीही उत्तम होऊं लागली. ज्या जंगलांत दालचिनी मिळत असे तेथें **क्यांदीचे** लोक हल्ला करीत व **चालीयास** व इतर लोक **दच**लोकांस हरकत करीत ह्यामुळें त्यास फार उपद्रव होई; दालचिनी उत्पन्न होणारे प्रांताचें रक्षण करण्यास पुष्कळ सैन्य ठेवून फार खर्च लागे व दालचिनीच्या व्यापारांत नफा होत नसे. **दच**लोकांच्या कारकीर्दीच्या अखेरीस आपल्या किल्ल्यांच्या माऱ्यांत दालचिनीच्या बागा करणें भाग पडलें होतें व दालचिनीच्या झाडाचें

इतकें कडक रक्षण करीत कीं, कोणी त्या झाडास हात लावला असतां किंवा त्याची साल काढली असतां त्यास मरणाची शिक्षा देत.

दालचिनीच्या खालोखाल डचलोकांचा हत्तीचा व्यापार होता; परंतु त्यांत फार फायदा होत नव्हता व शेवटीं तोटाच झाला.

डचलोक सुपारीचे व्यापाराबद्दलही फार खबरदारी ठेवीत; व पुष्कळ सुपारी भरून आमचे देशांत पाठवीत. पूर्वीं मूरलोक ह्या जिन्नसांचा व्यापार करीत परंतु तो त्यांचा व्यापार मोडून टाकण्याकारितां डचलोकांनीं यत्न करून तो तडीस नेला.

ह्याशिवाय ह्या द्वीपांतून पतंगाचें लांकूड इराणांत जाई व चियामूळ सुरतेस जाई. दालचिनीचें तेल, मिरें व वेलदोडे आमस्तरदमकडे जात व इमारतीचें लांकूड व आऱ्याक दारू ब्यातेव्हियास जाई व गूळ मलबाड व कारोमांडल किनाऱ्याकडे जाई. सांप्रतकालीं द्वीपांतून जे पदार्थ दूर देशीं विकावयास जातात त्यांपैकीं कोणतेही डचलोकांचे वेळीं जात नव्हते. बुंद रानांत उगवत असे व त्याचीं पानें कढीस वास येण्याकरितां सिंहलीलोक तींत घालीत. वानीप्रांतांत कापूस पिकत असे परंतु तो कातावा कसा हें सिंहलीलोकांस ठाऊक नव्हतें ह्यामुळें त्याची लागवड बंद झाली होती.

डचलोकांस जो व्यापारापासून फायदा होई त्याशिवाय, मिठागराचें व समुद्रांतील शिंपल्याचें उत्पन्न होई. मोत्यांचे माशांचें ते रक्षण करीत परंतु त्यांपासून त्यांस फायदा होत नसे. क्यांदीचे राजाचे मुलुखांत मात्र रत्नें

सांपडत असत ह्यामुळें डचलोकांस त्यांपासून फायदा होत नव्हता. याशिवाय त्यांच्या उत्पन्नाच्या बाबी सांगतों; प्रत्येक मनुष्यास कांहीं लोखंडाचे दगड व गूळ द्यावा लागत असे; जमीनीचे उत्पन्नांतून लोकांस अंश द्यावा लागत असे तो; नारळाचे बागांपैकीं दशांश; नांवांचे परवाने; मासे धरल्यावर त्यांतील वांटणी; तरीचें उत्पन्न; ह्यांशिवाय उत्पन्नाच्या लहानसहान पुष्कळ बाबी होत्या. ह्या सर्व बाबींचा वसुल सिंहली सरदार करीत असत.

कोणत्याही युरोपियनास शहराचे बाहेर राहण्यासारखा सुरक्षितपणा नव्हता ह्यामुळें सिंहली सरदारामार्फतच वसूल घेणें भाग पडत असे; व सर्व डच गव्हरनरांस सरदारांची व त्यांचे हाताखालचे मुख्यांची मर्जी संपादन करावी लागे व डचलोक त्यांस किताब वगैरे देऊन खुष राखीत; ह्यांजकडे सरकारी जमिनीची नोंद, विक्री व वहिवाट असे; कर बसवणें व ते वसूल करणें, शाळांवर देखरेख ठेवणें, दिवाणी व फौजदारी खटल्यांचा निकाल व शांतता असतां सर्व राज्यकारभार चालिवणें व लढाई चालू झाली ह्मणजे सर्व फौजेस कपडा पुरविणें व दाणापाण्याची सामग्री ठेवणें हीं सर्व कामें सिंहलीसरदारांकडे सोंपवलेलीं होतीं, ह्यामुळें डचलोकांचें सिंहलीसरदारांचे मदतीशिवाय चालत नव्हतें.

ह्या बेटांत डचलोकांनीं जीं जीं कृत्यें केलीं आहेत तीं आपस्वार्थाकारितां केलेलीं आहेत. शाळा स्थापल्या होत्या पण त्यांचा उद्देश इतकाच असे कीं, त्यांतील मुलांनीं सिंहली राजाविषयीं राजनिष्ठेचा त्याग करावा व हालंदाचें महत्त्व त्यांस समजावें; देवळें बांधलीं होतीं

परंतु त्यांचा उद्देश प्रातस्तंत धर्माचा प्रसार व्हावा ह्मणजे रोमनक्याथलिक धर्माचा प्रसार होणार नाहीं; व ख्रिस्ती धर्माचा प्रसार झाल्यानें मूर व मुसलमान लोक नाउमेद होतील.

शेतकीची वृद्धि होण्यांत सरकारचें व रयतेचें हित आहे व दूरदेशांतून आपले देशांचे चारितार्थाकारितां तांदूळ आणावे लागूं नयेत अशी दचलोकांची इच्छा होती परंतु ती पूर्ण झाली नाहीं. लोकांचे कल्याणाकारितां जरी दचलोक कधीं कधीं झटत परंतु सिंहलीलोकांवर पोर्तुगीजलोकांच्या वेळीं जसा जुलूम होई तसाच दचलोकांच्या वेळीं होई ह्यामुळें ते लोक एकादे वेळीं आपल्यावर उठतील असें दचलोकांस वाटत होतें, आणि हालंददेशांतही निराशा झाली होती, कारण पूर्वी सिंहलद्वीपांतून आपणास पुष्कळ संपत्ति मिळेल असें त्यांस वाटलें होतें पण तसें झालें नाहीं व दचकंपनीचे नोकरलोक आपले पगारावर आपला निर्वाह होत नाहीं ह्मणून गाऱ्हाणें घालीत. त्यांचे पगार अतिशयच लहान होते परंतु व्यापार करूं देत व त्यापासून फायदा होईल तो त्यांनीं घ्यावा असा एक विशेष हक्क होता परंतु व्यापारापासून फायदा होईना तेव्हां त्यांस वाईट वाटूं लागलें. ही गोष्ट गव्हरनरास लागू नव्हती कारण जरी त्याचा पगार थोडा होता तरी त्यास कच्चा खर्च मिळे व त्यांस चोरून पुष्कळ पैसा मिळवितां येत असे ह्यामुळें दोनतीन वर्षांत ते गबर होत.

सिंहलद्वीपांत दचलोक आल्यापासून तों त्यांच्या राज्याचा शेवट होईपर्यंत दचलोकांनीं बेटांत आपला

अधिकार सैन्याच्या योगानें ठेविला होता, मुलूख त्यांचे ताब्यांत आला नव्हता. हिंदुस्थानांत ज्या दचलोकांच्या वखारी होत्या, त्यांचें रक्षण करण्याकरितां दूर दृष्टीनें पाहतां हें बेट उपयोगीं होतें; तसेंच मलबाडप्रांत व जावा ह्यांच्यामध्यें प्रवास करतांना हें एक मुकामास सोईचें ठिकाण होतें. परंतु फौजेचा खर्च व नोकरलोकांचा खर्च इतका होई कीं, नेहमीं जमेपेक्षां खर्च अधिक होऊन हालंदास तो द्यावा लागे ह्यामुळें तेथील राजाची निराशा होई.

इ० स० १६६४ त दुसऱ्या राजासिंहाचे प्रजेनें बंड केल्यापासून ते इ० स० १६७२ पर्यंत तो राजा उगाच राहिला होता, परंतु ह्या वर्षी जेव्हां दच व फ्रेंच लोकांत लढाई चालू झाली तेव्हां एक फ्रेंचांचें आरमार त्रिंकोमाली येथें आलें तेव्हां हे लोक आपणास दचलोकांचे त्रासांतून सोडवितील ह्मणून राजास फार आनंद झाला; ह्या वेळेस दचलोकांनीं कोतियार व ब्यातिकेलो हे दोन किल्ले सोडून दिले; परंतु फ्रेंचलोक बेटांत आपलें रक्षण करण्यास समर्थ नव्हते ह्यामुळें तेथून ते निघून गेले व दचलोकांस भीति नाहींशी झाली.

दुसरा राजासिंह मेल्यावर त्याचे पाठीमागून त्याचा मुलगा दुसरा विमलधर्म व नातू कुंदसाल हे गादीवर बसले; लढाई सुरू झाल्यापासून बुद्ध धर्म बुडत चालला होता त्याचा ऊर्जितकाळ यावा असा ह्या राजांचा उद्देश असल्यामुळें ते दचलोकांशीं सलोख्यानें वागत व दचलोकही आराकान येथून विद्वान् धर्मोपदेशक आणण्याकरितां आपलीं जहाजें राजास उसनीं देत.

सिंहलद्वीप आपले ताब्यांत राखण्याकरितां दच-लोकांस फार खर्च येत असे असें पूर्वींच सांगितलें आहे; त्यांचे राज्यकारभारांत इतकी अव्यवस्था झाली कीं त्यांच्या कामगारांच्या बेमानीपणानें व सिंहलीलोकांच्या बंडानें तें बेट दचलोकांच्या ताब्यांतून जाईल असें दिसूं लागलें; दोन गव्हरनरांस बेमानाबद्दल शिक्षा करणें भाग पडलें, व अशी प्रजा बेदिल असतां क्यांदीचा राजा मेला तेव्हां देशांत राहणारे सिंहलीलोकांस बंड करावयास फुरसत सांपडली.

इ० स० १७३९ त कुंदसाल मरण पावला व सिंहलीराजाचे घराण्याचा निर्वंश झाला; नंतर मयत राणीचा भाऊ मलबारचा राजा होता तो श्रीविजयराज ह्या नांवानें गादीवर आरूढ झाला; व त्याच्या मागून त्याच घराण्यांतील दोन राजे झाले त्याच्या कारकीर्दींत क्यांदीचे डोंगराळ प्रांतांतील लोकांनीं व देशांतील लोकांनीं एकत्र जमून हालंदाचे ताब्यांतून आपण मुक्त व्हावें ह्मणून पुष्कळ यत्न केला परंतु तो निष्फल झाला; कारण सिंहलीलोकांची फौज चांगली नव्हती व त्याजवळ लढाईची सामग्रीही नव्हती; शेवटीं दचलोकांनीं क्यांदीशहर घेऊन तें कांहीं महिने आपले स्वाधीन ठेविलें व असेंच युद्ध चाललें होतें; शेवटीं इ० स० १७६६ त तह झाला, त्याच्या योगानें दचलोकांस व्यापार करण्याची अधिक सौलत व अधिक प्रांत मिळाला.

दचलोक सिंहलद्वीपांतून आल्यापासून ते तेथून जाईपर्यंत जो इतिहास झाला त्यांत त्यांची कधीं कधीं

उदारपणाची वागणूक होती परंतु असे प्रसंग थोडेच होते. ह्यामुळें त्यांची कारकीर्द हलकटपणाची व जुलुमाची झाली असेंच समजलें पाहिजे. जेव्हां अठरावे शतकाचे अखेरीस दुसरे कांहीं किल्ले घेऊन **इंग्रजलोक** **कोलंबोचे** समोर आले तेव्हां **दचलोकांनीं** युद्ध न करितां तो किल्ला त्यांचे हवालीं केला; ह्यावरून **दचलोकांस** तो नकोसा झाला होता असें दिसतें. व **इंग्रजलोकांस** तो मिळाला असें पाहून सिंहलीलोकांस आनंद झाला. **इंग्रजलोक** ह्या बेटांत कसे आले व सर्व बेट कसें हस्तगत झालें ह्याची हकीकत पुढचे भागांत सांगितली आहे.

---

## प्रकरण दुसरें.—भाग चौथा.

### इंग्रजलोकांची कारकीर्द.

जो पहिला **इंग्रज** सिंहलद्वीपांत आला तो **कोलंबो** येथें इ० स० १५८९ त आला, त्याचें नांव **फिच** असें होतें. **हिंदुस्थानांत** जावें व तेथें व्यापाराची काय सोय आहे ती पहावी असा **टर्की** कंपनीचा हुकूम घेऊन चार धैर्यवान् व्यापारी **लीदस, न्युबेरी, स्तोरी** व **फिच** ह्या नांवाचे ह्या देशाकडे निघाले, व **सिरिया** देशामधून **तैग्रीसनदी** उतरून **बसोरा** येथें आले व तेथें जहाजांत बसून **हिंदुस्थानांत** आले; ह्यांपैकीं एक अकबरबादशहाचे चाकरीस राहिला, दुसरा **पंजाबांत** मरण पावला, तिसरा **गोंवें** येथें मठाधिवासी झाला व चवथा **सीयाम** व **मलाका** येथें भटकून **सिंहलद्वीपांत** गेला.

जरी केप ऑफ् गुड्होपचा रस्ता दोनशें वर्षें चालू होता तरी इंग्रजलोकांचें जहाज कधींही हिंदिमहासागरांत आलें नव्हतें. पोर्तुगीजलोकांनीं केप ऑफ् गुड्होपचा रस्ता पाहिल्यानें शोधून काढला होता व पोपाचे हुकुमाचें निमित्त दर्शवून हिंदिमहासागरांत जहाजें चालविण्याचा हक्क आपलाच आहे असें पोर्तुगीज ह्मणत व सैन्याच्या जोराच्या योगानें तो चालवीत व युरोपांतील दुसऱ्या राजांसही तिकडे जाण्याची जरूर नव्हती; परंतु ड्रेक जेव्हां पृथ्वीपर्यटन करून परत आला त्या वेळेस स्पेनदेशच्या लोकांस जसा हिंदिमहासागरांत जहाजें चालविण्याचा हक्क आहे तसाच आपले प्रजेसही आहे असें इलिजाबेथ राणीनें जाहीर केलें. ह्या जाहिरनाम्यास अनुसरून इ० स० १५९१ त कांहीं जहाजें इंग्लंदांतून हिंदुस्थानाकडे आलीं, त्यांचा उद्देश व्यापार करण्याचा नव्हता तर पोर्तुगीजलोकांचे जहाजांस लुटण्याचा होता. ह्या स्वारीचा परिणाम वाईट झाला. कारण मुख्य नौकाधिपति मरण पावला व त्यांपैकीं एक अंमलदार लांक्यास्तर नांवाचा आपलें बोनावेंचर नांवाचें गलबत घेऊन पाइंतदीग्याली येथें आला; हेंच इंग्रजलोकांचें पहिलें गलबत सिंहलद्वीपाचे किनाऱ्यावर आलें.

ह्यापुढें दोनशें वर्षेंपावेतों इंग्रजलोकांचें लक्ष सिंहलद्वीपाकडे नव्हतें. सुरत, मद्रास, मुंबई व बंगाल वगैरे ठिकाणीं ठाणीं बसविण्यांत व त्या संबंधांत पोर्तुगीज, दच व फ्रेंच वगैरे लोकांशीं भांडण होई त्यांत व हिंदुस्थानांतील राजांशीं लढाया करण्यांत इंग्रजलोक

गुंतले होते; अठरावे शतकाचे अखेरीस आपल्या वखारीचा बचाव करण्याकरितां व हिंदिमहासागरावर जे आपले शत्रु जे दच त्यांचा पाणउतारा करण्याकरितां त्या लोकांचीं ठाणीं आपले ताब्यांत घेणें इंग्रजलोकांस भाग पडलें.

सिंहलद्वीपाचा राजा दुसरा राजासिंह ह्यास गोरेलोक कैदेंत ठेवण्याचा शोक होता; ह्यामुळें क्यांदी येथें कांहीं इंग्रज खलाशी लोकांस त्यानें कैदेंत ठेविलें होतें त्यांस सोडविण्याकरितां इ० स० १६६४ त सर एद्वर्द बुईतर गेला होता परंतु त्याची स्वारी निष्फळ झाली.

इ० स० १७६३ त मद्रासचे गव्हरनराचे मनांत आलें कीं, सिंहलद्वीपांत आपला अधिकार असावा; ह्यामुळें त्यानें तेथील राजा कीर्तिश्री ह्याशीं दोस्तीचा तह करण्याकरितां एक वकील क्यांदीशहरीं पाठविला; त्यास राजा अनुकूळ होता परंतु पुढें इंग्रजसरकारांनीं औदासिन्य दाखविलें ह्यामुळें दोस्ती झाली नाहीं.

पुढें वीस वर्षांनीं जेव्हां हालंद व ग्रेतब्रितन ह्यांमध्यें युद्ध चालू झालें तेव्हां सर हेक्तर मनरो ह्यांनीं कांहीं फौज घेऊन त्रिंकोमाली काबीज केली; व लार्दमकारतनी ह्यांनीं दचलोकांविरुद्ध आपणास साहाय करावें ह्मणून राजाधिराजासिंह ह्याजकडे ह्युबाईद ह्यास वकिली देऊन क्यांदीचे दरबारीं पाठविलें पण इ० स० १७६३ त इंग्रजलोकांनीं राजाचा अपमान केला होता त्याचें स्मरण होतें ह्यामुळें इस्तइंदिया कंपनीशीं आह्मी तह करीत नाहीं, ग्रेतब्रितनचे राजाशींच करूं असें क्यांदीचे राजानें सांगितलें; पुढें दुसरे

वर्षीं दच व इंग्रजलोकांत तह झाला तेव्हां त्रिंकोमाली शहर दचलोकांस परत दिलें.

इ० स० १७९९ त मद्रासचे गव्हरनर लार्डहोबार्त ह्यांनीं एक फौज तयार करून तीवर कर्नल जेम्स स्तुअर्त ह्यास सेनाधिपति नेमलें व ती फौज त्रिंकोमाली येथें आली व तें शहर तीन आठवडे वेढा घातल्यावर ताब्यांत आलें; व पुढें जापने व कालिपेतन हीं शहरें हस्तगत झालीं; नंतर राजाधिराज राजासिंह ह्यानें ग्रेतब्रितनाशीं तहाचें बोलणें करण्याकरितां अदिगार ही मोठी पदवी देऊन एक वकील मद्रासेस पाठविला; पण तो वकील परत येण्याचे पूर्वीच कर्नल स्तुअर्त ह्यानें निगंब व कोलंबो हीं शहरें घेतलीं. दचलोकांचा गव्हरनर वानअंजलबेक ह्यानें पूर्वींच एक ठराव करून दिला होता त्यावरून कालतर, पाइंतदीग्याली व मातर हीं शहरें ताब्यांत आलीं होतीं.

ह्या ठरावावरून सिंहलद्वीपांतील सर्व किल्ले, दारूगोळा, तोफखाना, कागदपत्र, खजिना व सामग्री इंग्रजलोकांचे ताब्यांत आली होती. खाजगी मालास, व देवस्थानास इंग्रजलोकांनीं हात लावूं नये असें ठरवून कोलंबोकिल्लयांतील दचलोकांचे शिपाई आपलीं हत्यारें घेऊन बाहेर निघाले व तीं बाहेर ठेवून आंत आले; अदले दिवशीं रात्रीं कोलंबो किल्लयावर दचलोकांचें निशाण होतें व दुसरे दिवशीं इंग्रजांचें निशाण उभें केलेलें लोकांच्या दृष्टीस पडलें. ह्याप्रमाणें लढाई नकरितां सिंहलद्वीपाचें आधिपत्य कांहीं अंशीं इंग्रजाचे ताब्यांत आलें, व त्यांचे सत्तेस सुरुवात झाली.

डचलोकांनींही सिंहलद्वीपांत पोर्तुगीज लोकांप्रमाणेंच दीडशेंवर्षें राज्य केलें परंतु दोन्ही लोकांची राज्यकरण्याची पद्धत वेगळी वेगळी होती. डचलोकांचें लक्ष राज्याच्या स्वस्थतेकडे होतें, ह्यामुळें त्यांचे कायदे द्वीपांत अद्यापि चालू आहेत; पोर्तुगीज लोकांचें लक्ष धर्मप्रसाराकडे होतें; ह्यामुळें रोमनक्याथलिक धर्म सर्व खेडेगांवांत देखील पसरलेला आहे. डचभाषा बहुतेक कोठेंही बोलत नाहींत पण एक जातीची भ्रष्ट पोर्तुगीज भाषा बेटांतील सर्व शहरीं चालू आहे. डचलोकांचें लक्ष व्यापाराच्या योगानें पैसा मिळविण्याकडे होतें ह्यामुळें आतां त्यांचें स्मरण राहिलें नाहीं परंतु रोमनक्याथलिक धर्माचे योगानें पोर्तुगीज लोकांचा व सिंहली लोकांचा ऐक्यभाव झाल्यामुळें पोर्तुगीज लोकांतील दान ही पदवी व त्यांचीं आडनांवें सिंहलीलोकांत राहिलीं आहेत.

जेव्हां सिंहलद्वीप इंग्रजलोकांचे ताब्यांत आलें त्या वेळेस डचलोकांपैकीं ज्या लोकांस दुसरे ठिकाणीं जाण्याचें साधन होतें ते लोक द्वीप सोडून निघून गेले व ज्यांपाशीं पैसा होता ते ब्याटेवियास निघून गेले. पाद्री व न्यायखात्यांतील अंमलदार कांहीं दिवस आपले कामावर राहिले व बहुतेक सरकारी नोकर आपले जाग्यावर राहिले; त्यांपैकीं पुष्कळ लोकांनीं इंग्रजसरकारचे राज्यांत कारकूनीचा व वकीलांचा धंदा पतकरला व हल्लीं द्वीपांत प्रत्येक सरकारी कचेरींत बहुतेक कारकून डचलोक आहेत.

सिंहलद्वीप जिंकून घेतल्यामुळें इंग्रजसरकारचे ता-

ब्यांत आल्यावर त्याचा राज्यकारभार चालविण्याविषयीं विचार पडला. राजाच्या प्रधानांच्या मनांत होतें कीं, द्वीपाचे राज्यकारभाराची देखरेख आपले नजरेखालीं असावी व इस्तइंदिया कंपनीचे फौजेनें बेट काबीज केल्यामुळें कोर्त ऑफ् दायरेक्तरांचे मनांत राज्यकारभाराची देखरेख आपल्याकडे असावी असें होतें. ह्याशिवाय दचलोकांचा व इंग्रजलोकांचा तह झाला असतां बेट दचलोकांस कदाचित् परत दिलें जाईल असेंही वाटत होतें. मध्यंतरी बेटाचे राज्यकारभाराचें काम मद्रासचे गव्हरनर इनकौंसलाकडे सांगितलें होतें.

ह्या व्यवस्थेचा परिणाम वाईट झाला. मिस्तर अंद्रुज मद्रासइलाख्यांतील सिविलियन ह्यास पूर्वीं क्यांदीचे राजाचे विनंतीवरून इ० स १७९६ त वकील करून पाठविलें होतें, त्यासच सिंहलद्वीपाचे वसुलाचे कामावर देखरेख करून वसूल घेण्याचे वहिवाटींत फेरफार करण्यासही अधिकार दिला होता. हा गृहस्थ फार उतावळा व आळशी होता; ह्यास सिंहली कायद्याची व रीतीभातीची माहिती नव्हती; त्यास मद्रासेंत वसूल करण्याची रीति होती तेवढीच माहीत होती ह्यामुळें त्यानें पूर्वींचे कर व ते वसूल करण्याची तऱ्हा मोडून टाकली, व मद्रास इलाख्यांतील वसूल घेण्याची तऱ्हा चालू केली व तो गोळा करण्याकरितां मलबाडाहून लोक आणिले. पूर्वीं चाकरी करावी व जमीन खावी असा संप्रदाय असे तो मोडून जमीनीचे उत्पन्नाचे अंदाजानें वसूल मागण्याचा क्रम त्यानें सुरु केला व नारळीचे बागांवर कर बसविला;

जकातीचे मक्ते मूर, पार्शी व चेटी ( शेट ) लोकांस दिले. पूर्वीं मुदलियार व सिंहली कामदार होते त्यांस काढून मलबाडचे लोक ठेवले; त्यांस सिंहलीलोक आपले धर्माचे शत्रु, व आपल्या रीतिभातीचे गैरमाहितगार व जुलूम करून पैसा गोळा करण्याकारितां आले आहेत असें समजत. शिवाय ह्या नवीन उपलाणू लोकांस वाटे कीं, आपला रोजगार चार दिवस चालेल व सिंहलद्वीप दचलोकांच्या हातीं परत जाईल, ह्यामुळें अंद्रुजसाहेब ह्यांच्यावर जसा अंमल चालवावा तसा चालवूं सकत नव्हते; व हे लोक इतकीं अघोर व क्रूर कृत्यें करूं लागले कीं, तीं सांगितलीं असतां त्यांवर विश्वास बसणार नाहीं; अशा वागणुकीचा परिणाम स्पष्टच आहे; सिंहलीलोकांस सहन होईना इतका राग आला, त्यांचे सरदारांस आपला अधिकार काढून घेतला ह्मणून मानहानि झाली असें वाटलें व हलक्या जातीचे मद्रासचे दुभाषीलोकांचे लुटारुपणानें ते त्रस्त झाले; असा त्रास झाला असतां त्यांतून मुक्त करण्यास फ्रेंचलोक मदत देतील असें दचलोक सिंहलीलोकांस सांगत. ह्या सर्व कारणांनीं सिंहलीलोकांनीं बंड करून निरनिराळ्या ठिकाणीं ठाणीं पकडलीं; हा प्रसंग फार अणिबाणीचा होता; कारण इंग्रजलोक येऊन पांच महिने झाले नाहींत तों तीन गव्हरनर मेले. बंडवाल्यास जिंकण्याकरितां कांहीं फौज पाठविली तिनें बंडवाल्यास शरण आणलें पण त्या कामांत पुष्कळ लोक मारले गेले. मध्यंतरी मद्रासचे गव्हरनर लार्ड होबार्ट ह्यांनीं असा बखेडा होण्याचीं कारणें काय व तीं मोडण्यास उपाय

काय करावा ह्याचा तपास करण्याकरितां एक कमिशन नेमिलें, व त्यावर कर्नल दी म्युरन ह्यास मुख्य अधिकारी नेमिला होता.

वरील अरिष्ट आलें तेव्हां राजाचा प्रधान पिट ह्यानें सिंहलद्वीपाची व्यवस्था पुढें कशी व्हावी ह्याबद्दल लागलाच विचार ठरविला, व तेथील राज्यकारभारावर देखरेख राजाचीच असावी असें ठरवून नामदार नार्थसाहेबास गव्हरनर करून पाठविलें व इतर कामगारांच्या नेमणुकाही राजाकडूनच झाल्या व हिंदुस्थानचे गव्हरनर जनरलाचे हुकुमानें सिंहलद्वीपाचा राज्यकारभार चालवावा अशी व्यवस्था केली, व ही व्यवस्था सिंहलद्वीप इ० स० १८०२ त इंग्रजसरकारचे राज्याशीं सामिल होईपर्यंत चालू होती.

कर्नल दीम्युरन ह्यास कमिशनाचा अध्यक्ष नेमला होता. त्यानें अशी शिफारस केली कीं, कर्नाटकांतील वसूल घेण्याची रीति चालू केली आहे ती बंद करावी. मलबाडचे दुभाषी लोकांस परत हिंदुस्थानांत पाठवावें व मुदलियार जसे पूर्वीं कामावर होते तशीं त्यांस कामें द्यावीं; जुलुमाचे कर सोडून द्यावे व दुसरी चांगली व्यवस्था होईपर्यंत दचलोकांचीच व्यवस्था ठेवावी, ह्या शिफारशी केल्यावर त्या अंमलांत आणण्याचे वेळींच नार्थसाहेब आले, व त्यांनीं त्या अंमलांत आणल्या; त्यांनीं आपल्या अभिप्रायांत असें लिहून ठेविलें आहे कीं, ही व्यवस्था देशाची संपत्ति वाढण्यास अथवा लोकांस सुख होण्यास प्रतिकूळ आहे खरी पण कोणत्याही लोकांस ज्या संवयी झाल्या असतात त्या मोडण्यास

पुष्कळ काळ लागतो व कोणत्याही सुधारलेल्या सरकारानें कायद्यांत व राज्यव्यवस्थेंत एकदम फेरफार करून लोकांची समज वाढेल, किंवा उद्योगास उत्तेजन येईल किंवा त्यांची भरभराटी होईल असें समजूं नये; परंतु ज्या लोकांस भिकारपणानें राहण्याची संवय आहे किंवा अधिकाऱ्यांचा त्रास झाला असतां भोगण्याची संवय आहे त्यांची सुधारणा हळूहळूच झाली पाहिजे.

मद्रासइलाख्यांतील सिविलखात्याचे नोकर होते ते लांचखाऊ, खेटकेखोर, व गैरवाकबगार होते ह्यामुळें वसुलाची व्यवस्था करणें गव्हरनर साहेबास अधिक कठीण झालें व त्यांपैकीं कित्येकांस नोकरीवरून महकूब करणें व कित्येकांचा जबरीनें राजिनामा घेणें, व कित्येकांस नोकरींतून दूर करणें गव्हरनरसाहेबांस भाग पडलें.

गव्हरनर साहेबांस त्रासाचें दुसरें एक कारण झालें तें असें कीं, दचलोकांचीं कोर्डतें राहण्याची मुदत संपली व दावे तर फैसला होण्याचे राहिले, व दचकामगारांनीं न्यायखात्यांतील जागा पतकरण्याचें नाकबूल केलें. हा त्रास नाहींसा करण्याकरितां नार्थसाहेबांनीं बंगाल्यांतून कामगार आणविले व दाव्यांचा फैसला करण्याकरितां द्वीपांत फिरतीं कोर्तें केलीं.

ह्यापुढें क्यांदी येथें ज्या चमत्कारिक गोष्टी घडून येत होत्या त्यांकडे गव्हरनरसाहेबांचें लक्ष गेलें. इंग्रजलोक बेटांत आल्यावर दोन वर्षांनीं राजाधिराज राजसिंह पदच्युत होऊन मरण पावला; व त्यास संतति नव्हती ह्मणून पिलामीतिलावे नांवाचे मुख्य प्रधानानें

मागील वहिवाटीप्रमाणें राणीचा पुतण्या अठरा वर्षांचा होता त्यास गादीवर बसविलें व त्यानें विक्रमराजसिंह हें नांव धारण केलें; राजकुळांतील हा शेवटचा राजा झाला.

ह्या नवीन राजांत व इंग्रजांत दोस्ती होती व गव्हरनरसाहेब राजाचा सन्मान करण्याकरितां वकील पाठविणार होते इतक्यांत त्यांच्यांत व राजाचा कारभारी पिलामीतिलावे ह्यांच्यामध्यें गुप्त पत्रव्यवहार चालू झाला. त्याचा उद्देश इतकाच कीं, राजास ठार मारून किंवा पदच्युत करून आपण गादीवर बसावें असा कारभाऱ्यानें उद्देश दाखविला. नार्थसाहेबासही क्यांदींत फौज ठेवून आपला अंमल बसविण्यास हा चांगला प्रसंग आहे असें वाटलें; नंतर राजाचा अधिकार काढून घेऊन पिलामीतिलावे ह्यास प्रतिनिधि करावा व इंग्रजाची फौज क्यांदींत ठेवावी व तिचा खर्च पिलामीतिलावे ह्यानें द्यावा असें नार्थसाहेबाचे मतें ठरलें.

वरील बेत अंमलांत आणण्याकरितां क्यांदीचे राजाकडे एक वकील पाठवावा व त्याजबरोबर रक्षणाचे निमित्तानें मोठी फौज द्यावी व वकिलाचे स्वारीबरोबर जो लवाजमा जातो त्यापेक्षां ही फौज अधिक होती ती आंत येऊं देण्यास राजाची परवानगी घेण्याकरितां अदिगरक्यांदीशहरास गेला व वकिलाबरोबर एक हजार लोक आंत जाऊं देण्याची परवानगी घेऊन आला, परंतु गव्हरनराचे हुकुमावरून वकील अठराशें लोक घेऊन गेला; तेव्हां राजास भीति वाटली तेव्हां राजानें इंग्रजाचे फौजेस सरहद्दीवर थांबण्यास हुकूम दिला, व

डोंगरांतील रस्ता वाईट असल्यामुळें कित्येक तोफा मागें राहिल्या व वकील जनरल म्याकदोनल जेव्हां क्यांदीशहरीं गेला तेव्हां त्याची थोडीच फौज त्याचे दृष्टीस पडली. क्यांदीशहरांत आल्यावर तहाचें बोलणें चालावयास फार उशीर लागला ह्यामुळें वकिलास कंटाळा आला; इंग्रजांची फौज आपले शहरीं ठेविण्याचें राजानें कबूल केलें नाहीं व तह करण्याचें काम दिवसगतीवर घातलें तेव्हां वकील निराश होऊन व त्रासून आपली उणी झालेली फौज घेऊन कोलंबोस परत गेला.

पिलामितिलावे अदिगर ह्याचा बेत राजास बाहुली करून बसविण्याचा होता परंतु तो सिद्धीस गेला नाहीं; तेव्हां त्यानें बंडें उठविण्याचा क्रम सुरू केला व लुटारू लोक इंग्रजांचे हद्दीवर त्रास देऊं लागले व शेवटीं राजाच्या कामगारांनीं, कांहीं व्यापारी लोक इंग्रजांची प्रजा क्यांदीहून पतलमास येत होती त्यांस लुटलें; त्याबद्दल इंग्रज नुकसान भरून मागत असतां तें टाळाटाळीवर घातलें तेव्हां जनरल म्याकदोनालद ह्यानें तीनहजार लोक घेऊन क्यांदी शहर आपले ताब्यांत घेतलें; राजा राजवाड्यास व देवळास आग लावून पळून गेला. इंग्रज सरकारानें विश्वासघातकी जो अदिगर ह्याच्या सल्ल्यानें राजघराण्यांतील मुतुसामी ह्यास गादीवर बसविलें, व ह्यानें इंग्रजांची फौज आपलें रक्षण करण्याकरितां घेतों असें कबूल करून इंग्रजास पुष्कळ मुलूख दिला; परंतु अदिगर ह्यानें ह्या वेळेस इंग्रजांशीं वेगळा करार केला, त्यांत पळून गेलेल्या राजास इंग्रजाचे ताब्यांत द्यावा, नवीन राजास योग्य नेमणूक

करून देऊन त्यास जापने येथें पाठवावें व पिलामी-तिलावे अदिगर ह्यानें सर्व राज्यकारभार पहावा असं ठरविलें होतें. असा ठराव करून क्यांदी येथें ३०० गोरे लोक व ७०० मलाय लोक ठेवून जनरल म्याक-दोनालद कोलंबोस परत गेला.

ह्यानंतर अदिगरास वाटूं लागलें कीं, आपण इंग्र-जाचे ताब्यांत वागूं नये तर गव्हरनरास पकडून आपले हातीं घ्यावें व इंग्रजाची फौज मारून आपण स्वतंत्र व्हावें; त्याचा गव्हरनरास पकडण्याचा बेत सिद्धीस गेला नाहीं परंतु त्यानें फौजेस मारून टाकिलें.

ह्या वेळेस इंग्रजांचे फौजेपैकीं पुष्कळ लोक आ-जारी पडले होते ह्यामुळें थोडेच लोक लढाऊ होते; शिवाय चारशें मलेय लोक होते त्यांच्यावर जो अंम-लदार होता तो गैरमाहितगार होता असें असतां क्यांदीशहरास शेंकडो हत्यारबंद लोकांनीं वेढा घालून कित्येकांस ठार मारलें. तेव्हां बाकीचे लोक शरण गेले. अदिगरानें त्यांचे व मुतुसामीचे जिवास धक्का लागा-वयाचा नाहीं असें वचन देऊन त्रिंकोमालीचे रस्त्या-वर तीन मैल महावेलीगंगा नदीचे कांठापर्यंत जाऊं दिलें; तेथें नदीस पूर आला होता ह्यामुळें दोन दिवस खोटी झाली, तेव्हां अदिगरानें फौजेवर जुलूम करून राजपुत्रास आपले ताब्यांत घेऊन त्यास पहिल्यानें मा-रून टाकलें; मेझर देवीस ह्यास कैद करून क्यांदीस नेलें व इंग्रज व मलेय शिपाई लोकांची ताशिरा क-रून डोकीं उडविलीं.

ह्या कत्तलींतून आपले सोबत्यांची कथा सांगण्यास

एक शिपाई वांचला; क्यांदीचे पूर्वेस अठरा मैलांवर एक अंमलदार होता त्यानें आपले तोफेचे कान्यास खिळा मारून आपले अजारी लोक सोडून बाकी लोक घेऊन त्रिंकोमालीस गेला, दुसरा अंमलदार दांबेदिनीया येथें आपली जागा धरून राहिला पण थोडक्याच काळांत क्यांदीचे राज्यांत इंग्रजांचा शिपाई नाहीं असें झालें.

ह्या दुष्टाचरणांकरितां सूड उगवावा असें इंग्रजांचे मनांत आलें परंतु तसें होण्यापूर्वीं कित्येक वर्षें लोटलीं; कारण इंग्रजांचे शिपाई अजारानें ग्रस्त होऊन थोडेच शिलक राहिले होते व जे राहिले होते ते त्यांचीं स्वतःचीं ठाणीं रक्षण करण्याकरितां हवे होते.

अदिगरास असा जय मिळाल्यामुळें तो अधिकच चेतावला; त्यास वाटलें कीं, आपली शक्ति फार आहे व आपला देश अजिंक्य आहे; तेव्हां त्यानें देशांत राहणारे सिंहलीलोकांसही चिडविलें व थोडक्याच काळांत सर्व द्वीपांत जिकडे तिकडे लोक हत्यारें घेऊन इंग्रजलोकांवर उठले व क्यांदीचे लोकांनीं मातर, चिला, पुतलम, मुलतिवु, जापने, ब्यातिकेलो, कोतियार ह्या शहरांवर हल्ला केला. कोलंबोस वेढा घालण्याकरितां राजा स्वतः फौज घेऊन त्या शहरापासून अठरा मैलांवर हंगवेलीपर्यंत आला, परंतु तेथें इंग्रजांचे शिबंदीनीं त्यास मागें हटवून लावून मेजरदेवीच्या शिपायांपासून ज्या बंदुका हिरावून घेतल्या होत्या त्या परत घेतल्या. दुसऱ्या सर्व ठिकाणीं असाच पराजय झाला तेव्हां राजा आपले डोंगरांतील किल्ल्यांत जाऊन

राहिला व इंग्रजलोक देशांत राहिले ते लढाई करून इतके थकून गेले होते कीं, सर्व शिपाई कोलंबोंतून गेल्यामुळें चौकीपाहऱ्याचें काम पेनशनदार व अजारी लोकांस सांगितलें होतें.

नार्थसाहेबांनीं क्यांदीचे लोकांचा सूड घेण्याकरितां ह्या देशांतील गव्हरनरजनरलापाशीं तीन हजार शिपाई मागितले; परंतु इंग्लंड व फ्रान्स ह्या दोन देशांत लढाई चालू असल्यामुळें फौज देण्यास सवड नव्हती; ह्यामुळें दोन वर्षेंपावेतों क्यांदीचे प्रांतांतील खेडीं व देवळें जाळणें व पिकाचा व फळांचे झाडांचा नाश करणें इतकें मात्र नार्थसाहेबांनीं चालविलें होतें. ह्या वेळीं नार्थ साहेबांचे मनांत तह करावयाचा होता व इंग्रजांचे अंमलदारांस व लोकांस ठार मारणें ह्या अघोर कृत्याबद्दल राजानें समजूत केली असतां आपण तह करूं असा त्यास निरोप पाठविला परंतु राजानें उत्तर पाठविलें कीं, त्याबद्दल मजकडे कांहीं नाहीं, तें सर्व अदिगरानें माझ्या हुकुमावांचून केलें व तेव्हांपासून आपण त्यावर विश्वास ठेवीत नाहीं. इ० स० १८१५ त जेव्हां राजानें अशींच अघोर कृत्यें केलीं तेव्हां राजास पदच्युत केलें.

नार्थसाहेबांच्या राजकारस्थानांत चुका झाल्यामुळें कांहीं इंग्रजलोक मारले गेले खरे परंतु त्यांनीं राज्याच्या व्यवस्थेंत फार सुधारणा केली. धर्माची स्थापना झाली, विद्या व व्यापार वाढला, न्यायाचीं कोर्टें स्थापन झालीं. वसुलाची सुधारणा झाली व शेतकी व कारागिरीची वृद्धि झाली. इ० स० १८०५ पासून इ० स०

१८२० पर्यंत त्याचे मागून जे तीन गव्हर्नर झाले त्यांचे कारकीर्दीतही अशीच सुधारणा झाली.

ह्या काळांत क्यांडीचे राजाची वर्तणूक फार बिघडली होती; तो लोकांवर फार जुलूम व अघोर कृत्यें करी, त्यामुळें लोक बंडें करीत व कांहीं सरदार राजास अनुकूल असत खरे परंतु त्यांचें लोकांत फार वजन असे हें राजास आवडत नसे ह्यामुळें त्यांचा तो द्वेष करी; शेवटीं पिलामीतिलावे राजास गुप्त रीतीनें ठार मारण्याचे यत्नांत सांपडल्यामुळें राजानें त्याचा शिरच्छेद करविला व त्याचा पुतण्या अहिलापोल ह्यास अदिगराचीं वस्त्रें दिलीं.

अहिलापोलही पिलामीतिलावेप्रमाणें महत्त्वाकांक्षी होता; त्यानें राजा नावडता आहे असें पाहून बंड करण्याचा बेत केला व इंग्रजांस त्याकडे काना डोळा करा अशी विनंति केली परंतु त्याचा बेत उघडकीस आला व त्यास आपला जीव वांचविण्याकारितां कोलंबोस पळून जावें लागलें. ह्यापुढें मोठाच अनर्थ झाला त्याची कथा ऐकली ह्मणजे अंगावर शहारे उठणार नाहींत व डोळ्यांतून अश्रु येणार नाहींत असा पाषाणहृदयी मनुष्य क्वचित्. क्यांडीचे राजानें अहिलापोल पळून गेला ह्मणून त्याच्या ऐवजीं त्याच्या कुटुंबांतील माणसांचा नाश करण्याचा निश्चय केला व त्याची बायको, मुलें व त्याचा भाऊ व त्या भावाची बायको इतक्यांस मारून टाकण्याचा हुकूम केला; त्यांत पुरुषांचा ताशिरा व बायकांस बुडवावें असेंही ठरविलें. हीं अघोर कृत्य नत व महाविष्णु ह्या दोन देवळांमध्यें राजाच्या वा-

ह्यासमोर झालीं. अहिल्यापोलाची बायको व मुलें ह्यांस तुरुंगांतून आणून फांशीं देणारे लोकांचे ताब्यांत दिलें, तेव्हां ह्या बाईनें मोठ्या निकरानें सांगितलें कीं, आपण आपलीं मुलें व पति निर्दोषी आहों पण राजाची इच्छा असेल तर त्यानें आपणांस व आपले मुलांस ठार मारवावें परंतु आपले पतीस जीवदान द्यावें; हें भाषण मोठ्यानें करून तिनें आपले वडील मुलास डोकें उडवून घेण्यास पुढें हो अशी आज्ञा केली; परंतु तो अकरा वर्षांचा बाळ अगदीं भयानें गलित होऊन आक्रोश करूं लागला व त्यानें आपल्या आईस घट्ट मिठी घातली तेव्हां तिचा दुसरा मुलगा नऊ वर्षांचा होता तो वीराप्रमाणें पुढें झाला व आपले भावास भिऊं नको, कसें मरावें हें तुला दाखवितों, असें बोलून तो मरण्यास सिद्ध झाला तेव्हां त्याचें डोकें तरवारीनें उडविलें व तें तसेंच रक्तबंबाळ रक्त वाहत असें उखळींत घातलें व मातेस तें कुटावयास सांगितलें व तिनें त्याप्रमाणें केलें नाहीं तर तिला यमयातना करूं असें सांगितलें; ह्याप्रमाणें एक एक मुलाचा तरवारीनें शिरच्छेद करविला. त्यांत शेवटचें मूल तान्हें होतें परंतु त्यासही जीवदान दिलें नाहीं, पण मातेचे अंगावर पीत असतां त्यास ओढून काढून त्याचें शिर उडविलें! त्या वेळेस त्याचें नुकतेंच प्यालेलें दूध रक्ताबरोबर बाहेर आलें! हीं अघोर कृत्यें झालीं तेव्हां तेथें जे लोक हजर होते त्यांस जो शोक व दुःख झालें तें सहन करवेना; ते एकसारखे फुंदके येऊन रडत होते. पालीहापानी कामगार इतका भयग्रस्त झाला कीं त्यास मूर्च्छा आली! तेव्हां तो

कोमळ मनाचा ह्मणून राजानें त्यास नोकरीवरून बड-तर्फ केलें. ह्या क्रूर राजाचा वाडा खेरीज करून शोकाग्नि इतका भडकला होता कीं, जठराग्नि मंद पडला व क्यांदी येथील लोकांनीं दोन दिवस आपले घरीं अन्न शिजवलें नाहीं व ते अगदीं उपाशीं राहिले! मुलांचा ताशिरा खलास झाल्यावर माता लवकरच शोकसागरांतून पार पडली. तिला व तिच्या जावेस क्यांदीनजीकचे बोगंबर नांवाचे तलावांत नेऊन बुडवून टाकिलें.

अशाप्रकारचीं अघोर कृत्यें राजानें केलीं तीं लोकांस सहन झालीं नाहींत. त्यांनीं बंडें केलीं तेव्हां राजानें आणखी कित्येक लोकांस ठार मारलें. शेवटीं असें झालें कीं कांहीं व्यापारी लोक इंग्रजांची प्रजा त्या क्यांदी-शहरीं व्यापार करावयास गेले असतां त्यांस पकडून त्यांचे हात, नाकें व कान कापले व कापलेले अवयव त्यांचे गळ्यांत बांधून त्यांस कोलंबोकडे पाठविलें. हें पाहून इंग्रजांस राग आला व त्यांनीं राजास पकडून कैद करण्याकारितां इ० स० १८१५ चे जानेवारी महिन्यांत फौज पाठविली व क्यांदीशहर हस्तगत करून घेतलें व त्या जुलमी राजास कैद करून कोलंबोस आणलें व तेथून वेलूरच्या किल्ल्याचावर नेऊन ठेविलें व पुढें त्याच सालीं मार्च महिन्यांत क्यांदी येथील राजवाड्याचे दिवाणखान्यांत सर्व सरदारांचा व इंग्रजांचा तह झाला त्यांत त्यांनीं राजास पदच्युत केलें आहे असें ठरवून सिंहलद्वीपावर इंग्रजांचें अधिपत्य आहे असें कबूल केलें, व त्यांनीं इंग्रजांकडून असा करार करून घेतला कीं, त्यांनीं धर्माचे बाबतींत हात घालूं नये, व

न्याय निःपक्षपातानें करावा व त्यांचे पूर्वींचे हक्क व अधिकार राखावे. अहिलापोल ह्यास वाटत होतें कीं आपणास राज्यपद मिळेल परंतु तसें झालें नाहीं व त्याची निराशा झाली. इंग्रज लोक त्यास मोठी जागा देत होते परंतु त्यानें ती पतकरली नाहीं.

इंग्रज लोकांनीं बेटाचें राज्य ताब्यांत घेऊन दोन वर्षं लोटलीं नाहींत इतक्यांत पुनः सिंहली लोकांनीं बंड केलें; ह्याचें कारण असें होतें कीं, इंग्रजलोकांची सत्ता स्थापित झाल्यापासून आपला अधिकार कमी झाला; आपला स्वदेशचा मूर्तिमंत राजा जाऊन त्याचे ठिकाणीं आपला राजा दूर देशीं आहे अशी कल्पना करणें हें लोकांस बरें वाटेना. ह्या बंडाचा अधिकारी उवाचा सरदार होता, जिकडे तिकडे इंग्रजलोकांविरुद्ध सिंहली लोक उठले व इंग्रजलोकांस वाटूं लागलें कीं, ह्या प्रसंगीं आपला टिकाव लागत नाहीं व आपल्यास बेटांतील मध्यदेश सोडून किनाऱ्यावर जाणें भाग पडतें; इतक्यांत इंग्रजांनीं सिंहली लोकांचीं खेडीं जाळलीं व गुरें मारलीं व दहाहजार लोक लढाईंत पडले हें पाहून ते नाउमेद झाले व इंग्रजांस शरण आले; ज्या ज्या सरदारांनीं बंडें केलीं होतीं त्यांस कैदी केलें व उवाचा सरदार राजा बनला होता तो पळून गेला; बुद्धाचा दांत बंडवाल्यांपासून हिरावून घेऊन क्यांदींत नेऊन ठेविला व इ० स० १८१८ चे अखेरीस बंडें मोडून जाऊन सर्व बेटांत शांतता झाली.

ह्याप्रमाणें शांतता झाली खरी परंतु सिंहली सरदारांस इंग्रजांचें राज्य आवडत नव्हतें, कारण दिव-

सानुदिवस त्यांचा अधिकार कमी होत चालला. पूर्वी रयतेपासून ते पाहिजे ते कर घेत, पाहिजे तसें काम करून घेत; सारांश सरदार लोक प्रजेस अगदीं गुलामाप्रमाणें वागवीत. इंग्रजांची सत्ता प्रबळ झाल्यावर त्यांनीं वेठ घेणें बंद केलें व जमिनीबद्दल सरदारांची नोकरी न करतां रयतेपासून उत्पन्नापैकीं एकदशांश घ्यावा असें ठरविलें व दिवाणी व फौजदारीचा अधिकार सरदार लोकांकडे होता तो त्यांचे हातांतून काढून त्या कामावर मुलकी खात्यांतील गोरेलोक नेमिले; व पूर्वी सरदारांस पगाराबद्दल वसुलापैकीं हिस्सा मिळत असे तो बंद करून त्याचे ऐवजीं पगार ठरवून दिला; ह्याप्रमाणें सरदारलोक निर्बळ होऊन इंग्रज सरकारची सत्ता पूर्णपणीं स्थापित झाली.

ह्याप्रमाणें इंग्रज सरकारची सत्ता स्थापित झाल्यावर कोणतेही प्रकारचें बंड झालें नाहीं व त्यांचे सत्तेस बळकटी येण्यास एक मोठें कारण झालें. क्यांदी प्रांतांतील डोंगराळ प्रदेशांतील लोकांस वाटत होतें कीं, आपण बंड केलें असतां आपणास जेर करण्याकरितां आपले देशांत फौजेचा शिरकाव होणार नाहीं. कोलंबोपासून क्यांदीपर्यंत चांगला रस्ता करण्याचें काम इ० स० १८१९ त सुरु झालें; पुढें बंड झाल्यामुळें तें काम कांहीं दिवस बंद पडलें होतें परंतु आणखी शांतता झाल्यावर सर एद्वर्ड बार्नेस साहेबांनीं आपले कारकीर्दींत पुष्कळ पैसा खर्च करून मोठ्या श्रमानें तो रस्ता तडीस नेला; त्या वेळेस डोंगराळ प्रांतांतील लोकांस वाटलें कीं आतां मात्र आपलें कांहीं चालणार नाहीं.

आतां इंग्रजसरकारचे ताब्यांत बेटाचें राज्य आल्यावर त्यांनीं तें कोणत्या प्रकारें केलें, देशांत कोणकोणत्या सुधारणा केल्या व सर्व सांप्रतची स्थिति कशी आहे हें सर्व पुढल्या प्रकरणांत सांगितलें आहे.

---

## प्रकरण तिसरें.—भाग पहिला.

### इंग्रजलोकांनीं हें बेट ताब्यांत घेतल्यापासून सत्तर वर्षांत झालेली सुधारणा.

ह्या बेटांत सांप्रत १११ टपाल हापिसें व १६ तारहापिसें आहेत, व ११०० मैल तारायंत्राची तार आहे. टपालहापिसांत ठेव ठेवण्याचें काम सुरू व्हावयाचें आहे. हल्लीं एकच सरकारी सेव्हिंग ब्यांक आहे, त्यांत ९३२० लोकांनीं मिळून एकवीस लक्ष रुपये ठेव ठेविली आहे. सत्तर वर्षांपूर्वीं टपालहापीस किंवा तारहापीस एकही नव्हतें व सेव्हिंग ब्यांकही नव्हती.

इस्पितळें, डिस्पेन्सरी मिळून १११ आहेत. त्यांत दरवर्षास दीडलक्ष लोकांस औषध पोहोंचतें. डाक्टर तयार करण्याकरितां एक कॉलेज आहे, त्यावर एक प्रिन्सिपाल व सात लेक्चरर (गुरु) आहेत; व त्यांत तयार झालेले लोक बेटांत कित्येक सरकारी नोकरी करीत आहेत व कित्येकांनीं खासगी दवाखाने घातले आहेत.

ह्या बेटांतील विद्याखात्याचीही पुष्कळ सुधारणा झाली आहे; हल्लीं ह्या बेटांत २८ मनुष्यांस शाळेंत एक विद्यार्थी आहे; आपले हिंदुस्थानदेशांत १६० मनुष्यांस एक विद्यार्थी शाळेंत आहे, व ग्रेटब्रिटनमध्यें दर ७

किंवा ८ मनुष्यांस एक विद्यार्थी आहे. ह्या बेटांत प्रवास करणाऱ्या लोकांचें असें दृष्टीस पडतें कीं, पुष्कळ लोकांस इंग्रजी बोलतां येतें व त्यांतून घरकाम करणारे नोकर लोकांपैकीं पुष्कळांस तर येतच असतें.

आपले देशाप्रमाणेंच ह्या द्वीपांतही इंग्रजी शिकलेले लोकांस चाकरी मिळणें कठीण झालें आहे. ह्यामुळें पुष्कळ लोक वकिलीचा, नोटरीचा, आटरनीचा व ब्यारीस्टरचा धंदा करूं लागले आहेत, व कांहीं न्यायाधीशाही झाले आहेत. हल्लीं बेटांत जन्मलेल्या एका सिंहलीगृहस्थास तेथील सुप्रिमकोर्टांत जज्ज नेमलें आहे; व कित्येक सिंहलीलोक प्रांतांतील जज्ज, ब्यारिस्टर व सॉलिसिटर झाले आहेत.

कोर्टांत जाऊन दावे चालविण्याचा सिंहलीलोकांस शोक आहे व एका नारळीचे झाडाचा लहानसा थोडा हिस्सा मिळण्याकरितां कोर्टांत दावे लावतात. बेटांतील तुरुंगांत सुमारें १८०० कैदी सरासरीचे मानानें असतात व ह्यांपैकीं पुष्कळ गुन्हे क्षुल्लक चोरीचे व मारामारीचे असतात व फौजदारीकोर्टें व तुरुंग ह्यांचा सालीना खर्च सुमारें दहा लक्ष रुपये आहे.

---

## प्रकरण तिसरें—भाग दुसरा.

### निरनिराळ्या गव्हरनरांच्या कारकीर्दींत बेटांतील कायद्यांत व लोकरिवाजांत झालेले फेरफार.

ह्या बेटांत सर्व यमयातनेच्या शिक्षा बंद केल्या आहेत. इ० स० १८११ त फौजदारी खटल्याची चौकशी

पंचांनीं करावी असा ठराव झाला. व इ० स० १८४४ त सर्व गुलामगिरी बंद झाली व पंच कोणत्याही जातीचा असला तरी चालेल असा ठराव झाला.

इ० स० १८३० व इ० स० १८४० ह्या दोन सालांमध्यें ज्यांत सरकारी नोकर नाहींत असे कांहीं सभासद असणारी कायदे करणारी मंडळी स्थापन झाली; वेठ बंद झाली; वर्तमानपत्रांस पाहिजे तें लिहिण्यास स्वातंत्र्य मिळालें; दालचिनीचा मखूता बंद झाला; लोकांस ठेव ठेवण्यास सरकारी पेढी स्थापन झाली; व कोलंबोशहरीं मोठें विद्यालय स्थापन झालें.

पुढें सरकारानें मासोळीवर दशांश कर घेण्याचा बंद केला; तशीच गुलामगिरी अगदीं बंद केली. शाळाखातें व दवाखाने वाढविण्यास पुष्कळ यत्न केला व ह्याच कालांत निरनिराळ्या जिनसांची लागवड होऊं लागली. ह्यानंतर असा एक कायदा ठरविला कीं, अठरापासून पंचावन वर्षांचे आंतील सर्व लोकांनीं रस्ते सुधारण्याकरितां आपण सहा दिवस फुकट मजूरी करावी किंवा सहा दिवसांचे मजूरीची किंमत सरकारांत भरावी. ह्या कायद्यापासून वेटाची फारच सुधारणा झाली आहे.

इ० स० १८५० त खबुत्रास डांक नेण्याचे कामास लावलें व सिलोन आब्झरवर वर्तमानपत्राची डांक नेणारीं खबुत्रें ग्याली व कोलंबो ह्या दोन शहरांत डांक नेत असत. आपले देशांत डांक नेण्याचें काम खबुत्राकडून करविल्याचें ऐकण्यांत आलें नाहीं. इ० स० १८५५ चे पूर्वीं प्रजेचा जो बौद्धधर्म ह्याशीं सरकारचा संबंध असे परंतु त्या सालांत त्यांनीं धर्मांतून आपलें

अंग काढलें. ह्याच कालांत सरकारांनीं कालव्याचीं व तलावांचीं कामें दुरुस्त केलीं. मोठे रस्ते केले, आगगाडी सुरू झाली व पेनी ( आठ पै ) किमतीचें टपालाचें टिकिट चालू केलें. सर्व बेटासभोंवतीं आगबोटी सुरू झाल्या व बेटांतील मुख्य शहरांत तारायंत्र चालू झालें. एका स्त्रीनें पुष्कळ पति करण्याची नीच चाल बेटांत पुष्कळ ठिकाणीं चालू होती असें मागेंच सांगितलें आहे, परंतु ह्या सालीं क्यांदी येथील लग्नाचे कायद्यांत सुधारणा होऊन पुष्कळ नवरे करण्याची चाल बंद केली.

इ० स० १८६० व १८७० ह्या दोन सालांमध्यें लग्नें, जनन, मरण व जमीनीचे हक्क ह्यांची नोंद सुरू झाली; व क्यांदी शहरापर्यंत आगगाडी सुरू झाली; लोक सिंहली व तामिलभाषेंत वर्तमानपत्रें छापूं लागले; कोलंबो, क्यांदी व ग्याली ह्या शहरांत म्युनिसिपालिटी स्थापन होऊन त्यांत कांहीं सभासद सरकारी कामगार व कांहीं सभासद लोकांनीं निवडलेले असावेत असा ठराव झाला. ह्याच वेळीं गांवसभा स्थापन होऊन लोकांत विद्यावृद्धि व्हावी ह्मणून गांवठी व घरगुती शाळांस मदत देण्याचा ठराव झाला व वैद्यक शिकण्याकरितां शाळा स्थापन झाली.

इ० स० १८७० पासून इ० स० १८८० पर्यंत पुष्कळ सुधारणा झाली. पहिल्यानें इ० स० १८७१ त खानेसुमारी व लोकसंख्येची गणती झाली; जंगलाची सुधारणा होण्याची व्यवस्था होऊन हत्ती, हरणें वगैरे जनावरांचा नाश न होण्याबद्दल बंदोबस्त केला. जमिनीचे व इतर हक्कांची नोंद ठेवण्याची तजवीज केली.

कोलंबो, क्यांदी व ग्याली ह्या शहरांत पुष्कळ सुधारणा होऊन तेथें पाण्याचा चांगला बंदोबस्त केला. न्युरेलिया हें जें हवा खाण्यास जाण्याचें ठिकाण तेथें व इतर लहान लहान शहरीं लोकांनीं निवडलेल्या सभासदांच्या सभा स्थापन झाल्या; गांवसभेंत पुष्कळ सुधारणा झाली. व दर सालास शंभर गांवचीं तळीं सुधारावीं असें ठरल्यानें भाताचे लागवडीस फार उत्तेजन आलें. सिंहलद्वीपांतील प्रजेच्या हिताकरितां एक प्रांत नवीन करून उत्तरेकडील व पूर्वेकडील प्रांतांत चांगले रस्ते केले. अनुराधपूर ही प्राचीनकाळीं राजधानी होती, त्यांतील जंगल काढून टाकिलें व तेथें जिल्ह्याचें ठाणें ठेविलें. तुरुंग, दवाखाने व शाळा ह्यांत सुधारणा केली; व लोकांचे आरोग्यास जत्रांपासून उपद्रव होतो ह्मणून त्या बंद केल्या; यांत्रिक ज्ञानाचें शिक्षण मिळण्याची तजवीज केली. दारूचे पिठे घालण्यास कमी परवाने देण्याचा ठराव केल्यामुळें दारू पिण्याचा प्रचार कमी झाला. कोलंबोशहरांत धुराचे दिवे लावले व वसुलापैकीं धर्मांचे सहायार्थ पैसा देऊं नये असें ठरविलें. इ० स० १८७५ त जेव्हां महाराणीचे ज्येष्ठ पुत्र कोलंबो येथें आले तेव्हां तेथें धक्का बांधण्याकरितां पायाचा दगड त्यांनीं बसविला व तो धक्का हल्लीं तयार झाला आहे. तो आह्मी पहावयास गेलों होतों.

## प्रकरण तिसरें—भाग तिसरा.

### सिंहलीलोकांचे शेतकीची सुधारणा.

ह्या बेटांत तांदूळ, सावा, तीळ वगैरे बारीक धान्यें व निरनिराळ्या जातींचीं कडधान्यें, दालचिनी, ककों, सुपारी, आंबे, अननस, कंवठें, भाकरीचें फळ व फणस वगैरे फळें; गोराडू, बटाटे वगैरे कंदमुळें; उणाख साखर, रोशेलतेल, इमारतीचें लांकूड, रंग, कापूस, तंबाखू, मिरें, व्यानिला[1], कोरफड, वेलदोडे, सिंकोना, चाहा व बुंद हे पदार्थ उत्पन्न होतात. ह्यांपैकीं बुंदाचें उत्पन्न सर्वांत अधिक आहे. ह्यांपैकीं कांहीं पदार्थांबद्दल मात्र विशेष माहिती पुढें लिहिली आहे.

ह्या द्वीपांत फार दिवसापासून तांदूळ उत्पन्न होतात परंतु लोकांस जितके तांदूळ खर्चास लागतात तितके उत्पन्न होत नसल्यामुळें आपल्या देशांतून तांदूळ तिकडे विकावयास जातात. तामिललोकांत व सिंहलीलोकांत कृषिकर्म करणें हें अब्रूचें काम आहे असें समजतात, व फळें किंवा मुळें उत्पन्न केल्यापासून जरी अधिक फायदा होतो तथापि लोक भात लावतात. लोकांची वहिवाट बदलणार नाहीं असें समजून सरकारांनीं तलाव व कालवे करण्याकरितां पुष्कळ पैसा खर्च केला आहे. हल्लीं साडेसहा लक्ष एकर जमीनींत भाताची लागवड आहे व दीडलक्ष एकर जमीनींत इतर धान्यें आहेत.

ह्या बेटांत दालचिनी फार दिवसांपासून उत्पन्न होत

---

१ एक झाड आहे त्याच्या शेंगा मिठाईस वास येण्याकरितां तींत घालतात.

आहे व येथील दालचिनी सर्व जगांतील दालचिनीपेक्षां उत्तम आहे. डचलोकांचें राज्य असतां दालचिनीचा मखता होता, परंतु डचसरकारास दालचिनीपासून फायदा होत नसे. सांप्रत इंग्रजसरकारांनीं व्यापारास अटक न ठेविल्यामुळें दालचिनी पुष्कळ उत्पन्न होऊन परदेशांत जाते. हल्लीं पस्तीस हजार एकर जमिनींत दालचिनीची लागवड आहे व वीस लक्ष रत्तल दालचिनी परदेशास जाते.

ह्या देशांत दालचिनीचे खालोखाल ताडाचें उत्पन्न आहे. श्रीमंत लोकांनीं नारळ, सुपारी व इतर ताडांचीं लाखों झाडें लाविलीं आहेत. समुद्राचे किनाऱ्यावर पाव मैलापासून कित्येक मैल रुंद जाग्यावर नारळांचीं झाडें लाविलीं आहेत व जाफने द्वीपकल्पांत दुसऱ्या जातीचे ताड लाविले आहेत. हे ताड थोडेसे तांदूळ व कापसाचा थोडासा कपडा एवढ्याच्या योगानें सिंहलीलोकांचा चारितार्थ होतो. नारळाचे व इतर ताडांचे उपयाग किती आहेत हें मागेंच सांगितलें आहे. दारू ही ताडापासून कारितात. नारळाचे कोणकोणते पदार्थ व किती किंमतीचे परदेशीं जातात तें पुढें सांगतों.

तेल २९,००,००० रुपयांचें; काथ्या ४,८०,००० रुपयांचा; आराक दारू १,९०,००० रुपयांची; खोबरें ३,६०,००० रुपयांचें; नारळ ८०,००० रुपयांचे व इतर किरकोळ पदार्थ ९०,००० रुपयांचे एकूण ३६,२०,००० रुपयांचे पदार्थ जातात; ह्यांशिवाय दोन कोट रुपये किंमतीचे नारळाचे पदार्थ देशांतच खर्च होतात. बेटांत तीन लक्ष एकर जमिनींत नारळाची लागवड आहे. व

त्यांत दोन कोट साठ लक्ष नारळाचीं झाडें आहेत. खो-बऱ्याचें तेल काढण्याचे वीस हजार घाणे बैलांनीं चालविलेले आहेत. ह्यांशिवाय वाफेचे यंत्रानें चालविलेले खोबऱ्याचें तेल काढण्याचे कित्येक कारखाने आहेत.

नारळाचे खालोखाल पालमयरा हा ताड आहे. दोन्हींसही फळें यावयास आठपासून बारापर्यंत वर्षें लागतात. परंतु पालमयरा १५० पासून २०० वर्षांपर्यंत जगतो. जापने द्वीपकल्पांत ८०,००,००० पालमयरा ताड आहेत. ह्याचे उपयोग किती होतात हें मागेंच सांगितलें आहे. ह्या ताडांचा सुमारें साडेबारा हजार खंडी गूळ परदेशीं जातो व ह्यांची ५०,००० एकर जमिनींत लागवड आहे.

कितूल ह्मणून एक जातीचा ताड आहे त्यापासून गूळ व दारू करितात. त्याचीं जीं उत्तम झाडें असतात त्यांतून चोविस तासांत सुमारें आठ शेर रस निघतो. क्यांदी प्रांतांत प्रत्येक घराजवळ हा वृक्ष आहे ह्याची लागवड सुमारें तीस हजार एकर आहे.

पोफळीचीही लागवड पुष्कळ आहे. जेव्हां पोर्तुगीज लोक राज्य करीत होते त्या वेळेस सुपारी आपल्या देशांत विकावयास येत असे, व त्याचे बद्दल दक्षिण हिंदुस्थानांतून धान्य जात असे. बुंदाची लागवड करणारे कांहीं मालकांनीं आपले बागेसभोंवतीं हद्दीवर सुपारीचीं झाडें लाविलीं आहेत. द्वीपांत ही सुपारीचा खर्च पुष्कळ आहे. सुमारें ४०,००० एकर जमिनींत सुपारीची लागवड आहे व बारा लक्ष रुपयांची सुपारी परदेशीं विकावयास जाते.

ह्याशिवाय आणखी शेंकडों जातींचे ताड आहेत; ह्यांपैकीं ताडपत्र हा प्रख्यात आहे, ह्यास साठ किंवा ऐशीं वर्षांनीं मोहोर येतो; व नंतर तो वृक्ष मरतो; ह्याचे पानांचा छपरावर घालण्यास, छत्र्या करण्यास व लिहिण्यास उपयोग करितात.

भाकरीच्या फळांचें झाड, फणस, नारिंग, आंबा, केळीं व अननस ह्यांचीही लागवड आहे.

शेरोल तेल व दालचिनीचें तेल परदेशीं विकावयास जातें, व त्याची किंमत सुमारें पांचपासून सहा लक्ष होईल. सुमारें २९,००० एकर जमिनींत तंबाखूची लागवड आहे व आपले देशांत सिंहलद्वीपांतून नऊ लक्ष रुपयांचा तंबाखू विकावयास येतो. कापूस व ऊंस ह्यांचीही थोडीशी लागवड आहे.

---

## प्रकरण तिसरें—भाग चौथा.

### बुंदाचे लागवडीची उत्पत्ति व तिचा भरभराट.

आपल्या देशांत व सिंहलद्वीपांत आरबलोकांनीं प्रथमतः बुंद लाविले व पोर्तुगीज किंवा दचलोक ह्यांनीं द्वीपांत पाऊल ठेवण्याचे पूर्वींच बुंद द्वीपांत होते. परंतु ह्या पदार्थाचा पिण्याचे कामांत उपयोग करीत नव्हते. सिंहलीलोक बुंदाचीं पानें कढींत घालीत व फुलें देवावर वहात असत.

इ० स० १८७० त दचलोकांनीं पहिल्यानें बुंदाची लागवड केली परंतु त्याचें विशेष फळ आलें नाहीं. इ० स० १८१२ त हें द्वीप जेव्हां इंग्रजलोकांचे ताब्यांत आलें त्या वेळीं ३,००० हंड्रेडवेट (१८७½ खंडी) पेक्षां

अधिक बुंद परदेशीं विकावयास जात नसे. जेव्हां डोंगराळ प्रांतांत व समुद्राचे किनाऱ्यावरून रस्ता झाला तेव्हां बुंदाचे लागवडीस भरभराटी आली व इ० स० १८३७ त ३०,००० हंड्रेडवेट बुंद परदेशीं जाऊं लागले. तेव्हांपासून ह्या धंद्याची वृद्धि होऊं लागली व इ० स० १८४५ त दोन लक्ष हंड्रेडवेट बुंद परदेशीं विकावयास गेले. पुढें इंग्लंदांत जेव्हां दिवाळीं निघालीं व व्यापाराची मंदी झाली त्या वेळेस बुंद लावण्याचा धंदा चांगला चालला नाहीं. इ० स० १८९४ पासून सिंहलीलोकही बुंदाच्या बागा करूं लागले, त्यामुळें त्यांची वृद्धि इतकी झाली कीं, इ० स० १८७० त दहा लक्ष हंड्रेडवेट बुंद परदेशीं विकावयास गेले. पुढें बुंदाचे झाडावर एकतऱ्हेचा रोग पडला व ते कमी उत्पन्न होऊं लागले परंतु जोंपर्यंत बुंदाची किंमत फार होती तोंपर्यंत ही गोष्ट समजली नाहीं. पुढें बुंदावरचा रोग नाहींसा करण्याकरितां पाहिजे ते उपाय केले, पण ते व्यर्थ झाले. आतां बुंद इतके कमी उत्पन्न होऊं लागले आहेत कीं पूर्वीं दहा लक्ष हंड्रेडवेट बुंद परदेशीं जात असे परंतु हल्लीं सुमारें त्याचा चौथा हिस्सा ह्मणजे अडीच लक्ष हंड्रेडवेट बुंद परदेशीं जातात.

---

## प्रकरण तिसरें—भाग पांचवा.

### सिंकोना, चहा, कको व लायबेरियन बुंद.

ह्या बेटांत चाहा उत्तमप्रकारें वाढेल असें सुमारें ४० वर्षांपूर्वीं समजलें; व इ० स० १८६७ त चहा लाव-

ण्याचे उद्योगाची बढती कोणत्या प्रकारें होईल ह्याचा तपास करण्याकारितां **सिंहलद्वीपाचे** सरकारांनीं एका शेतकी करणारे गृहस्थास हुकूम दिला; व त्याच वर्षी त्यांचें लक्ष **सिंकोना**कडे लागलें. त्यानंतर बुंदाचा दर वाढल्यामुळें **सिंकोना**कडे कोणी मन देत नव्हते. जेव्हां **सर वुइल्यम ग्रेगरी** साहेब गव्हरनर झाले तेव्हां नवीन नवीन उत्पन्नाचे पदार्थ लावणें जरूर आहे असें त्यांस वाटून **चहा, सिंकोना, ककौ, बुंद** व **रबर** ह्यांचे लागवडीचे वृद्धीकडे त्यांनीं लक्ष दिलें; जेव्हां ते गव्हरनर होऊन द्वीपांत आले तेव्हां पांचशें एकर सिंकोनाची लागवड होती व ते आपली जागा सोडून गेले त्या वेळीं **सिंकोना**ची लागवड सहा हजार एकरपर्यंत झाली होती व लागवड करणारे शेतकरी लोकांस ह्या जिनसांची लागवड करणें फायद्याचें आहे असें समजून आलें होतें. हल्लीं **सिंकोना**ची लागवड चाळीस हजार एकरपर्यंत वाढली आहे. इ० स० १८८२ त पंधरा लक्ष शेर सिंकोनाची साल ह्या द्वीपांतून बाहेर विकावयास गेली. व इ० स० १८८३ त तीस लक्ष शेर सिंकोनाची साल परदेशीं जाईल असा अंदाज होता.

अनुभवाअंतीं असें समजून आलें आहे कीं ह्या द्वीपाची हवा चहास चांगली मानते. येथें बारा मास पाऊस पडतो तो चहास हितावह होतो. इ० स० १८७३ त २५० एकर चहाची लागवड होती ती इ० स० १८८३ त वीस हजार एकर झाली आहे. इ० स० १८७६ त साडेअकरा शेर चहा परदेशीं विकावयास गेला होता, परंतु इ० स० १८८२ त तीन लक्ष शेर

चहा परदेशीं विकावयास गेला व आतां साडेसात लक्ष शेर जाईल असा अंदाज आहे.

ह्या बेटांत बुंद, सिंकोना किंवा चहा ह्यांची लागवड जशी वाढली त्याप्रमाणें ककोची होणार नाहीं, कारण ककोे लावण्यास जमीन चांगली लागते व आश्रा लागतो. हल्लीं हजारों एकर ककोची लागवड आहे; व दहा वर्षांनीं वीस हजार एकरपर्यंत होईल असा अंदाज आहे.

दक्षिण अमेरिका व आफ्रिका खंडाचा पूर्वभाग येथून सिंहलद्वीपांत रबराचीं झाडें आलीं. हल्लीं रबराचीं लाखों झाडें लावलीं आहेत व ह्या पदार्थाचा व्यापार थोडक्याच दिवसांत वाढणार आहे.

लायबेरीयनबुंद आफ्रिकाखंडांतील लायबेरीया या संस्थानांतून ह्या द्वीपांत आले परंतु त्यांची वृद्धि व्हावी तशी होत नाहीं.

बुंदाचे झाडावर रोग पडल्यामुळें द्वीपांतील शेतकरीलोक वेलदोडे, मिरें व आफ्रिकेंतील ताडाचीं झाडें लावूं लागले आहेत. ह्यामुळें बुंदावर रोग पडला हें संकट द्वीपांतील लोकांस फायद्याचें कारण झालें आहे.

---

## प्रकरण तिसरें—भाग साहवा.

### शेतकी व इतर धंद्यांची सांप्रत स्थिति.

ह्या भागाचे अखेरीस कोष्टक दिलें आहे त्यावरून द्वीपांतून परदेशीं कोणते पदार्थ जातात हें समजेल. ह्या देशांत जे खनिज पदार्थ उत्पन्न होतात त्यांत प्लंबेगो

हा फार उपयोगी आहे. ह्याचा उपयोग शिसपेन्सिली करण्याकडे होतो. ह्याच्या खाणी सिंहलीलोकांचे ताब्यांत आहेत. ते शंभरपासून तीनशें फूट खोल खाणी खणतात व त्यापासून उत्तम प्लंबेगो उत्पन्न होतो. हल्लीं ३५ लक्ष रुपये किंमतीची ही धातु परदेशीं जाते. सोनें कोठें कोठें सांपडतें परंतु फायदा होण्यासारखें निघत नाहीं; लोखंडाचे दगड पुष्कळ आहेत परंतु दगडी कोळसा नाहीं.

खोबरेल, दालचिनी वगैरेचा व्यापार सिंहलीलोक करतात; तो व्यापार भरभराटींत आहे परंतु बुंदाचे व्यापारास मंदी आहे; पूर्वीं सुमारें चारपांच कोट रुपयांचे बुंद परदेशीं जात असत. ते हल्लीं कोट सव्वाकोट रुपयांचे मात्र जातात. बुंद कमी उत्पन्न झाल्यापासून जें नुकसान झालें आहे तें चहा, सिंकोना व कको ह्यांचे उत्पन्नाचे वृद्धीपासून भरून येत आहे. ह्याशिवाय रबराचें व दुसरें किरकोळ पदार्थांचें उत्पन्नही भरीस पडत आहे.

---

## प्रकरण तिसरें—भाग सातवा.

### इंग्रजलोक शेतकीच्या उद्योगांत शिरल्यामुळें सिंहलद्वीपास काय काय फायदा झाला आहे.

इ० स० १८३७ त जेव्हां इंग्रजलोकांनीं बुंदाचे लागवडीचें काम सुरू केलें त्या वेळीं बेटांत सुमारें पंधरा लक्ष लोक होते, व त्यांचें रक्षण करण्याकरितां काळी

व गोरी मिळून सहा हजार फौज लागत असे; पण आतां २७ लक्ष लोक असतां १२०० लोकांची फौज बेटाचें रक्षण करिते. लोकांचे खाण्याचा, वस्त्राचा व औषधाचा चांगला बंदोबस्त केलेला आहे. पूर्वीं परदेशांशीं सुमारें ९० लक्ष रुपयांचा व्यापार होत असे तोच हल्लीं आठ किंवा दहा कोट रुपयांचा होतो. आपल्या देशांत जेव्हां इ० स० १८७७–७८ त दुष्काळ पडला होता त्या वेळीं सुमारें दोन लक्ष लोक सिंहलद्वीपांत गेले व तेथें मजूरी करून पोट भरीत होते.

सिंहलद्वीपाचे गव्हरनरांनीं असें कबूल केलें आहे कीं, ह्या बेटांत बुंदाची लागवड झाली ही गोष्ट ह्या बेटाच्या संपत्तीच्या वृद्धीचें मुख्य कारण आहे; ह्याच्याच योगानें रस्ते करण्यास, पूल व धक्के बांधण्यास, विद्याखात्यास पैसा देण्यास वसूल वाढून शिल्लक रहात आहे.

---

## प्रकरण तिसरें—भाग आठवा.

### व्यापाराची सोय.

कोणी सावकार लोक ह्या बेटांत येऊन राहतील तर त्यांस मोठी सोय आहे. जावा, मॉरिशियस व बंगालचे उपसागरांत जशी तुफानांची भीति आहे तशी ह्या बेटास नाहीं. ह्या बेटाची राजधानी जी कोलंबो ही पूर्वेकडे जाणाऱ्या व तिकडून येणाऱ्या आगबोटींच्या नाक्याची जागा आहे; चोहोंकडे रस्ते चांगले आहेत, आगगाडी झाली आहे, कालवे आहेत व जहाजें चाल-

णाऱ्या नद्या आहेत, त्यामुळें मध्य देशांत व बंदरांत व्यापार होण्याची सोय आहे.

---

## प्रकरण तिसरें—भाग नववा.

### बेटांतील जमाखर्चाची हकीकत.

इ० स० १८२८ त ह्या बेटांतील वसुलापेक्षां खर्च अधिक होता. इ० स० १८२९ पासून ते तों इ० स० १८३६ पर्यंत मोत्यांचें उत्पन्न पुष्कळ झाल्यामुळें खर्चापेक्षां जमा अधिक होती. इ० स० १८३७ पासून इ० स० १८४२ पर्यंत जमेपेक्षां खर्च अधिक होता; तसेंच इ० स० १८४६ पासून इ० स० १८४९ पर्यंत ही जमेपेक्षां खर्च अधिक होता. परंतु ह्या वर्षापासून बुंदाची व इतर जिनसांची लागवड झाल्यामुळें पंचवीस वर्षांत वसूल चौपट झाला व त्याची अखेर वाढ इ० स० १८७७ पर्यंत झाली. त्या वेळेस एक कोट सत्तर लक्ष रुपये वसूल झाला; त्या सालापासून नापीक झाल्यामुळें आतां वसूल एक कोट पस्तीस लक्ष रुपये आहे.

ह्या वसूलाचे बाबींपैकीं मुख्य बाब बेटांत येणारे तांदुळांवरची जकात ही होय. ह्याशिवाय दारूवर, कापसाचे कापडावर व धातूंचे केलेल्या जिनसांवर जकातीपासूनही उत्पन्न आहे. ह्याप्रमाणें जकातीचें उत्पन्न सर्व वसुलाचे चतुर्थांशापेक्षां अधिक आहे. कांहीं वर्षेंपावेतों सरकारी जमिनी विकून जकातीइतकाच पैसा येत असे परंतु अलीकडे ह्या बाबीचें उत्पन्न फार कमी झालें आहे. जमिनी विक्रीचें उत्पन्न व आगगाडीचें उत्पन्न

कांहीं दिवस एकीकडे ठेवून उत्पन्न वाढणाऱ्या कामाकडे खर्च केलें असतें तर बरें झालें असतें. परंतु जमिनीचे विक्रीचें जें उत्पन्न तें कायम उत्पन्न समजलें जाऊन जो खर्च वाढला हें वाजवी झालें नाहीं. जकात, धान्यावरचा कर, जमिनीची विक्री, आगगाडीचा नफा, दारूवरचा कर, स्टांपाचा कर व मिठावरचा कर ह्या वसूलाच्या मुख्य बाबी आहेत, व कधीं कधीं एकपासून पांच लक्ष रुपयेपर्यंत मोत्यांचें उत्पन्न होतें.

इ० स० १८८३ त जमाखर्चाचा तपशील खालीं लिहिल्याप्रमाणें आहे.

## जमा.

| | रुपये. | सेंट्स. |
|---|---|---|
| मागील सालची बाकी. | ४०००००० | |
| जकात. | २७३०००० | |
| बंदरावरची जकात. | ४५०००० | |
| जमिनीची विक्री. | २५०००० | |
| जमिनीचा सारा. | ८७५००० | |
| जमिनीखेरीज बाकीचें भाडें. | ३६०००० | |
| परवाने. | १५००००० | |
| स्टांप. | ८४०००० | |
| कर. | ३०००० | |
| पोष्टखात्याकडील उत्पन्न. | २४०००० | |
| दंड, जप्ती व कोर्टफी. | ५०००० | |
| सरकारी जहाजें. | ६०००० | |

| | रुपये. | सेंट्स. |
|---|---|---|
| सरकारच्या मालाची विक्री. | १०५०००० | |
| सरकारांनीं खर्च केलेला पैसा परत जमा. | ३००००० | |
| तारायंत्र. | ६५००० | |
| किरकोळ उत्पन्न. | ३५०००० | |
| व्याज. | १००००० | |
| विशेष उत्पन्न. | १०००० | |
| आगगाडी. | २७५०००० | |
| एकूण. | १२४१०००० | |

## खर्च.

| | | |
|---|---|---|
| मुलकी खातें. | १११६०९७ | ७५ |
| मतसद्दर खातें. | ४९२० | |
| न्यायखातें. | ६०६१९० | |
| धर्मखातें. | ८७२०० | |
| विद्याखातें. | ३७७५० | |
| दवाखातें. | ८५०५० | |
| पोलिसखातें. | २३५०० | |
| तुरुंग. | १०६५० | |
| तुरुंगावरचे कामगार शिपाई वगैरेचा पगार. | १२८४० | |
| द्वीपांतील सामान खरेदी. | २६२७१ | २५ |
| धक्का बांधण्याकरितां कर्ज काढलेल्या पैशाचें व्याज. | २०८७३४ | |

| | रुपये. | सेंट्स. |
|---|---|---|
| लष्करखात्याकडे मदत. | १२४०००० | |
| रेलवेचें व्याज व कर्ज फेडण्याकरितां शिलक. | ६१३९३० | |
| सदरील खात्याशिवाय इतर खात्याबद्दल कायदेकौन्सिलांनीं अधिक ठरवून दिलेली रक्कम. | ८२२२१२३ | ६५ |
| शिल्लक. | ११९१४३ | ३९ |
| एकूण. | १२४०९९९८ | |

## प्रकरण तिसरें—भाग दहावा.

सिंहलद्वीपाच्या राज्यकारभारावर राणीसरकारचे सेक्रेटरी ऑफ् स्टेट फॉर धी कॉलनीज ह्यांची देखरेख आहे. द्वीपाचें राज्य राणीसरकारांनीं नेमलेले गव्हरनर दोन कौन्सिलांचे (मंत्रीसभासदांचे) मदतीनें चालवितात. ह्यांपैकीं एक एग्झिक्युटिव कौन्सिल (राज्यकारभार चालविणारे) हें गव्हरनर व सरकारांतून नेमलेले पांच कौन्सिलर ह्यांचें बनलेलें आहे. दुसरें लेजिस्लेटिव कौन्सिल (कायदे करणारे मंत्री) ह्यांत एग्झिक्युटिव कौन्सिलांतील सभासद असून आणखी तीन सरकारी कामगार असतात व सहा सभासद लोकांचे तर्फेनें असतात. ते येणेंप्रमाणें. तामिललोकांचे तर्फेनें एक; इंग्रजलोकांचे तर्फेनें एक; सिंहलीलोकांचे तर्फेनें

एक; व्यापारीलोकांचे तर्फेनें एक; नवीन लागवड करणारे लोकांच्या तर्फेनें एक; व शहरांच्या तर्फेनें एक एकूण सहा.

मुलकीखात्याचे संबंधानें बेटाचे सात भाग केले आहेत; उत्तरदेश; पश्चिमदेश; पूर्वदेश; दक्षिणदेश; वायव्यदेश; मध्यदेश; व उत्तर मध्यदेश. देवीखातें—इ० स० १७६३ त सिंहलद्वीपांत कायदा केलेला आहे त्याच्या योगानें तेथील कोणी लोक आपल्या व आपल्या मुलांच्या अथवा मुलींच्या देवी न काढवील त्यास एक पौंड ह्मणजे दहा रुपये दंड होतो. ह्यामुळें द्वीपांत सर्व लोक देवी काढलेलेच आहेत.

**नाणें.**— हल्लीं ह्या द्वीपांत रुप्याचें व तांब्याचें नाणें चालू आहे. आपल्या देशांतील रुपयाच द्वीपांत चालतो व तांब्याचीं पावसेंट, अर्धासेंट, एक सेंट व पांच सेंट अशीं चार नाणीं चालू आहेत. सेंट ह्मणजे रुपयाचा शंभरावा हिस्सा. एका रुपयास शंभर सेंट मिळतात.

**स्टांप.**— स्टांपाचे कागद नाहींत पण त्यांबद्दल टिकिटें आहेत. जशीं आपले देशांत हल्लीं कोर्टफीचीं टिकिटें आहेत त्याप्रमाणें प्रत्येक कागदास जेथें स्टांप जरूर असतो तेथें टिकिटें चिकटवावीं लागतात.

**जकात.**— द्वीपांत जो माल येतो त्यापैकीं दारूगोळा, हत्यारें, आसफालटी, बीरदारू, मेणबत्त्या, सन्ला कापसाचें कापड, सरक्या, मासे, कणीक, धातु, कांदे, अफीण, भात, पेरू, बटाटे, तांदूळ वगैरे धान्यें; शिवाय मीठ, सोरमीठ वगैरे पुष्कळ मालावर जकात घेतात व

द्वीपांतून बाहेर जाणाऱ्या मालापैकीं फक्त फ्लंबेगोवर मात्र जकात आहे.

**आगगाडी.**— सांप्रत कोलंबोपासून क्यांदीपर्यंत व क्यांदीपासून नवलपीतियापर्यंत व क्यांदीपासून मातेलीपर्यंत व कोलंबोपासून कलुतरापर्यंत आगगाडी आहे. ह्याची सर्व व्यवस्था सरकारचे देखरेखखालीं आहे. एकंदर १२० मैल आगगाडी तयार आहे. व आगगाडीकरितां जो खर्च झाला आहे त्यावर शेंकडा सालीना सहा रुपये व्याज पडतें.

**टपालहांशील.**— द्वीपांतील एके ठिकाणाहून दुसरे ठिकाणीं पत्र जाण्यास लखोट्यास अर्ध्या अंसापर्यंत ह्मणजे सव्वारुपया वजनापर्यंत चार सेंटांचें टिकिट लावावें लागतें, व त्यापेक्षां अधिक वजन असल्यास दर अर्ध्या अंसास चार सेंटप्रमाणें टिकिटें लावावीं लागतात. पोष्टाच्या कार्डही चालू आहेत. एकंदर सुमारें ९६ टपालहापिसें आहेत.

**तारायंत्र.**— द्वीपांत तारायंत्र आहे व निरोप पाठविण्यास पत्ता धरून दर वीस शब्दांस एक रुपया पडतो व पुढें दहा शब्दांस ५० सेंट्स ह्मणजे आठ आणे पडतात. द्वीपाचे द्वीपांत तार करण्यास वर लिहिलेलें हंशील पडतें परंतु द्वीपाचे बाहेर तार करणें झाल्यास त्याबद्दल दर वेगळाच आहे.

**सेव्हिंग्ज ब्यांक.**— द्वीपांत सेव्हिंग्ज ब्यांकही आहे; त्यांत २५०० रुपये पर्यंत ठेवूं देतात; १००० रुपयेपर्यंत दर शेंकडा सालीना सहा रुपये व्याज देतात व हजारावर दर शेंकडा सालीना पांच रुपये व्याज

